# प्रस्तावना

प्रस्तुत ग्रंथ सन १९३१ मध्यें लिहून तयार होता. १९३२ फेब्रुवारी-मध्यें लेखक, आमचे वडील, हे कालवश झाले. त्यांच्या पश्चात् चार-वर्षेपर्यंत हा ग्रंथ प्रसिद्ध होऊं शकला नाहीं, याबद्दल वाईट वाटते. मध्यंतरीच्या कालांत आमचे ज्येष्ठ बंधु श्री. यशवंतराव, मु. बेलापूर, यांनीं तीर्थरूप वडिलांचे बरेचसे सुटे निबंध व त्यांचें एक अल्प चरित्र आत्मबोध, भगवद्गीता, पुरुषार्थ इत्यादि मासिकांतून मूळ प्रत संपादून प्रसिद्ध केलें. ते निबंध एकत्र मिळण्याची शोध ते करीत आहेत. भारत इतिहास संशोधक मंडळाचें त्रैमासिक, महाराष्ट्र साहित्य पत्रिका, रामदास रामदासी, व जुनें लोकशिक्षण या मासिकांतून आमचे वडिलांचे कांहीं लेख त्यांच्या हयातींत प्रसिद्ध झालेले आहेत.

आमचे वडील प्रथमपासून राष्ट्रीय सनातनी पक्षाचे. चिपळूणकर उत्सव श्रीशिवराज्याभिषेकोत्सव, वक्तृत्वोत्तेजक सभा व पुण्यास बॅप्टिस्टांचे अध्यक्षतेखालीं भरलेली प्रांतिक सभा यांचे ते चिटणीस होते. पुणें मराठी ग्रंथसंग्रहालयाचे ते व पंत पराडकर हे पहिले चिटणीसद्वय होते. पुणें म्युनिसिपालिटींत ते बरींच वर्षे सभासद होते. धार्मिक बाबतींत ते पूर्ण सनातनी होते. त्यांच्या ऐन उमेदींत या त्यांच्या वृत्तीमुळें घरच्या बऱ्याच लोकांना त्रास झाला. पुढें तिची कांहीं धार बोथट झाली, परंतु आंतून आंच जास्त भडकतच होती. मी परदेशीं असतांना वसंतव्याख्यानमालेंत त्यांनीं पुनर्विवाहास अनुमति दर्शविली असें ऐकिलें आहे. परंतु अगदीं अलीकडे, म्हणजे बनारसस्थ पंडित पितापुत्र द्राविड यांच्या दौऱ्यापासून, पक्षाभिनिवेशानें ते अधिक सनातनी झाले. श्री.गो.म.चिपळूणकर यांचीं व श्री.गोविंदराव जोशी यांचीं व्याख्यानें वगैरे ऐकून सनातनी पक्षास शास्त्रीय पायाचा आधार आहे असें त्यांस वाटूं लागलें. त्याच सुमारास पुण्यास स्थापन झालेल्या एका समाजविचारमंडळाचे ते उपाध्यक्ष झाले. अग्निहोत्री राजवाडे यांचेकडे त्यांचीं बरींच व्याख्यानें झालीं. थोडासा चमत्कारिक इतिहास असा आहे

र्ती, माझ्या लग्नप्रसंगीं मी कीट कापसरहिंग यांनीं संपादिलेलें लग्नासंबंधीं अनेक पुढाऱ्यांच्या विचारांचें पुस्तक मागविलें. अठरा रुपयांचें एवढें पुस्तक मागविल्याबद्दल प्रथम त्यांना थोडा राग आला, परंतु त्यानंतर त्यांनीं त्याचीं पारायणें केलीं आहेत. इतरही पुस्तकें त्यांनीं मग वाचलीं. याच सुमारास त्यांना वेदांच्या अभ्यासाचा नाद लागला. प्रथमपासून श्रुतिबोध वगैरे मासिकें आमचेकडे येत, परंतु स्वतः विद्यार्थी वा संशोधक बनून वेदांचा अभ्यास त्यांनीं अलिकडे सुरू केला. प्रि. राजवाडे यांचे दर्शनवर्गाखालीं टिळक महाराष्ट्र विद्यापीठांत कांहीं दिवस चाललेला वर्गही यास थोडा-बहुत कारणीभूत आहे. असो. घरच्या अनेक मानसिक त्रासाच्या भानगडी असूनही त्यांनीं अखेरचीं हीं पांच चार वर्षे खोल अभ्यासांत घालविलीं व त्याचेंच फळ हें पुस्तक आहे. अलीकडे त्यांचीं मतें जास्त जास्त सनातनी होत चाललीं होतीं हें वर लिहिलेंच आहे. याचें एक उदाहरण म्हणजे डॉ. श्री. व्यं. केतकर हे आमचे घरीं आले असतां त्यांना चहा दिल्यावर वडिलांनीं त्या कपबशांस घरच्या इतर माणसांस शिवूं दिलें नाहीं. मोलक-रणीनें त्या घांसून दिल्यावर त्यांवर पाणी टाकून नंतर त्या घरांत घेतल्या गेल्या. परदेशगमनार्थ प्रायश्चित्त केल्यानंतरही माझा पाट श्रावणी, मंहारा, श्राद्ध, इत्यादि करीत नाहीं म्हणून आडवा असेच. परंतु एकदां American Graduates Club च्या सभेस मी कुटुंबास घेऊन गेलों वगैरे कारणांनीं त्यांनीं बरेच दिवस अन्न वर्ज्य केलें होतें. त्यामुळें त्यांस बराच थकवा आला होता. त्यांतच त्यांस सावंतवाडीस जावें लागलें.तेथें त्यांच्या पायास जखम झाली व त्यांस मधुमेहाची व्यथा असल्यानें त्या जखमेनेंच त्यांचा अंत केला. त्या जखमेनें अतिशय त्रस्त असतांना सुद्धां त्यांचा कोश वगैरे काढून एखाद्या शब्दाचा मूळ धातु शोधून अर्थ लावण्याचा क्रम चालूच असे. हा स्वतंत्र ग्रंथ लिहून तयार असल्यामुळें तो प्रसिद्ध करण्याची त्यांनीं बरीच खटपट केली; ती त्या वेळीं सफळ झाली नाहीं. तें त्यांचें राहिलेलें काम आज पुरें करीत आहें.

हें पुस्तक लेखकाचे पश्चात् प्रसिद्ध होत असल्यामुळें अनेक अडचणी आल्या. कुठल्याही तऱ्हेनें मूळ लेखाचें 'संपादन' होऊं नये अशी माझी इच्छा! तितकेंच, स्वतःला संस्कृतादि विषयाची माहिती नसल्यामुळें

मुद्रितें तपासण्याची अपात्रता; अशा अडचणींत असतांना रावसाहेब नानासाहेब चापेकर यांनीं व्यक्तिशः मुद्रितें तपासण्याची सर्व जबाबदारी घेतल्यामुळें हा ग्रंथ खरोखरी प्रसिद्ध होऊं शकत आहे. त्यांतल्या त्यांत हें लक्षांत घ्यावयाचें कीं, ग्रंथकर्त्यांचीं मतें व रावसाहेब नानासाहेबांचीं मतें कांहीं बाबतींत भिन्न आहेत तरीही त्यांनीं फार श्रम घेतले. अशी सहिष्णुता फार क्वचित् आढळते. तेव्हां त्यांचे आभार कोठवर मानावे ? पुस्तक आज प्रसिद्ध होत आहे याचें पुष्कळ श्रेय त्यांनाच आहे.

पुस्तकाचें प्रसिद्धीकरण हें श्राद्ध या दृष्टीनें केलें असल्यामुळें पुस्तकविक्रीचें उत्पन्न श्री. दत्तोपंत लिमये यांच्या रसायननिधीस देण्याचें ठरविलें आहे.

मु. जमशेटपूर, त्र्यंबक वामन तळवलकर
ता. १३।४।१९३६.

# अनुक्रमणिका

## चातुर्वर्ण्य : त्याची उत्पत्ति, स्वरूप, विकास आणि काल

---

# चातुर्वर्ण्य

## उत्पत्ति, स्वरूप, विकास आणि काल



### उपोद्घात

हिंदुस्थानांतील हिंदूंची 'चातुर्वर्ण्य संस्था' ही एक अलौकिक आहे. तें एक जगांतील आश्चर्य आहे. इतरत्र चातुर्वर्ग्य असेल यें नाहीं. चातुर्वर्ण्य आणि चातुर्वर्ग्य यांत भेद आहे. दोनहि मूळ मागासारख्या तत्त्वावरच उत्पन्न होतात. पण चातुर्वर्ग्य हें केवळ कक आहे तर चातुर्वर्ण्य ही सामाजिक संस्था आहे. क गुणाचे व पराक्रमाचे जोरावर चातुर्वर्ग्यांतील व्यक्तीस वाटेल ती पदवी संपादन करतां येते तर चातुर्वर्ण्यांतील व्यक्तीस कांहीं विशिष्ट देच्या–आपल्या वर्णाच्या मर्यादेच्या–पलीकडे सहसा उडी मारतां नाहीं. चातुर्वर्ग्यांत जन्मश्रेष्ठत्व नाहीं किंवा आनुवंशिक वैशिष्ट्य मानीत तात[1]; पण चातुर्वर्ण्यानें आनुवंशिकता किंवा जन्मजाति उत्पन्न होतात णि त्यांमध्यें आनुश्रमिकता किंवा श्रेष्ठकनिष्ठ भाव आढळतो. अलीकडे प्रजाजननशास्त्र निघून जन्मजात गुणश्रेष्ठता तज्ज्ञ मानूं लागले आहेत. र्वी ती आर्यांत तर मानीतच पण आर्येतरांत किंवा हिंदुस्थानाबाहेर हि ती

---

१ असें आपण समजतों. पण पाश्चात्यांत तरी जन्मश्रेष्ठत्व किंवा आनुवंशिक श्रेष्ठत्व मानीत नव्हते अगर नाहींत असा भाग नाहीं. थर्लीकडे तर शास्त्रज्ञांत वांशिक रक्ताची श्रेष्ठता सर्वत्र कबूल केली जाते आणि ती पूर्वीहि–सु. १०० वर्षांपूर्वी–प्रत्यक्ष आचरणांत होती असें शास्त्रज्ञ सांगतात असें या निबंधांत पुढें दर्शविलें आहे.

मानांत नसत असें नाहीं. परंतु तो अलिखित समजुतीचा किंवा सामाजिक चालीरीतींचा ( Convention म्हणा पाहिजे तर ) किंवा आचाराचा भाग असे. हिंदुस्थानांत त्याला शास्त्राचें बंधन व आचारांचें जोखड प्राप्त झालें. चातुर्वर्ण्यांत अधरोत्तरता मुळींच नसे असेंहि नाहीं. परंतु ते वर्ग संपत्तीवर आणि समजुतीवर आधारलेले असत. हिंदुस्थानांत ते शास्त्रावर बसविलेले आढळतात.

२ असो. अशा या चातुर्वर्ण्याची उत्पत्ति हिंदुस्थानांत केव्हां, कां व कशी झाली, त्याचा विकास व विस्तार कसा झाला, तो पूर्ण केव्हां झाला वगैरे प्रश्न फार मनोरंजक व महत्त्वाचे आहेत. निरनिराळ्या लोकांनीं त्यासंबंधानें आपले विचार प्रकट केले आहेत. परंतु ते इतके परस्परभिन्न आहेत कीं, त्यांपासून निश्चित, सुसंगत इतिहास किंवा बोध होत नाहीं. अर्थात् ते केवळ ज्याचे त्याचे वैयक्तिक उद्गार आहेत असें दिसून येतें. हा प्रश्न वाटतो इतका सोपा नाहीं. त्याचा निर्णय अनेक गुंतागुंतीच्या प्रश्नांचे निर्णयावर अवलंबून आहे. या गुंतागुंतीचा उलगडा करणें हा या निबंधांतील चर्चेचा विषय आहे.

३ 'चातुर्वर्ण्य' शब्दाचा उलगडा करतांना त्यांतील 'वर्ण' या शब्दाच्या अर्थाचा प्रथम निश्चय करावा लागतो. वर्ण या शब्दाचे उघड उघड दोन अर्थ दिसतात. ( १ ) रंग आणि ( २ ) निवड. आजपर्यंतच्या बहुतेक लेखकांनीं आपलें विवेचन पहिल्या अर्थावर बसविलें आहे, तर दुसऱ्या अर्थावर या निबंधांतील विवेचन आधारलेलें आढळून येईल. निवड म्हणजे Choice, separation, selection किंवा classification वर्गीकरण, विभाग किंवा निवड. त्यावरून 'पथ किंवा संप्रदाय' असाहि एक अर्थ उत्पन्न होऊं शकेल. तिसरा एक अर्थ श्री. ना. गो. चापेकर करतात. त्यांचें म्हणणें चातुर्वर्ण्य म्ह. चार वर्णांचा धर्म (आपटे कोश पहा).

४ वर्ण म्हणजे रंग असा अर्थ गृहीत धरून चातुर्वर्ण्याची सिद्धता करणाऱ्यांची विचारप्रणालिका अशीः–हिंदुस्थान मूळ 'चहमुद'[1] जातीच्या लोकांचा देश. हे लोक विशेषतः बंगाल, मध्यप्रांत व मद्रासेकडे आढळ-

[1] एन्सायक्लोपीडिया ब्रिटानिका यांतील 'इंडिया' हा लेख पहा. ( वि. का. राजवाडे यांचा सप्तशतींतील निबंध ( पहा. पा. १७ )

सात. हे वर्णाने काळे, नकटे किंवा फेंदऱ्या नाकाचे आणि संस्कृतीनें कनिष्ठ दर्जाचे लोक. त्यांच्यांत असमयीकडून 'द्रविड' किंवा असुर' लोक हिंदुस्थानांत प्रथम येऊन घुसले व त्यांनीं हा सर्व देश आक्रमण केला व मूळच्या अत्रस्थ ( autochthonous ) मुंड लोकांना त्यांनीं पादाक्रांत करून दऱ्याखोऱ्यांतून हांकून दिलें. हे द्रविड लोक मूळ कोठून, केव्हां व कसे आले सांगता येत नाहीं अशी कित्येकांची समजूत आहे. ते वर्णानें काळे, जाड ओठाचे, वाटोळ्या किंवा रुंदट चेहऱ्याचे आणि संस्कृतीनें श्रेष्ठ लोक.[२] ऋग्वेदांत वर्णन केलेले दास व दस्यु[३] ते हे लोक. अंय लोक यांनाच केव्हां केव्हां असुर व राक्षस या नांवांनीं संबोधतात. हे किल्ले किंवा शहर वगैरे बांधण्यांत आर्यांपेक्षां अधिक प्रविण. इंद्रानें धुमाचे शेकडो ( नव्याण्णव म्हणा ) आयसी पुः. लोखंडी किल्ले फोडून आर्यांना एथें वसाहत करू दिली[४].आर्यांना असे लोखंडी किल्ले बांधण्याचें कौशल्य नव्हतें,म्हणजे रा. सा. चापेकरांच्या मताप्रमाणें त्यांचीं शस्त्रास्त्रें हलकीं आणि आर्यांचीं श्रेष्ठ. त्यामुळेंच आर्योंनीं त्यांना पादाक्रांत करून देश जिंकला व त्या द्रविडांना-त्या राक्षसांना-दक्षिणेकडे हकललें!! बहुतेक पाश्चात्य व अलीकडील पौर्वात्य तज्ज्ञ लोकहि- ही 'हिंदुस्थान जिंकल्याची कथा'[५] ग्राह्य समजतात.

---

१ कै. राजवाड्यांचे मतानें हे मूळ असूर्य ( Assyria ) देशांतून एथें आले. असूर्य देशांत वसति होण्यापूर्वी ते आणि देव ह्या लढाया लढले त्यांचें वर्णन वेदांत आहे ( कित्ता ) हे दैत्यांहून भिन्न ( कित्ता ).

२ रिस्ले, मुंड व द्रविड एकच समजतो किंवा निदान एकाच प्रकारचे(people) समजतो असें रामप्रसाद चांद म्हणतात

३. मि. राजवाडे दस्यू आर्य समजतात त्यांचा ( Indra's enemies ) हा निबंध पहा.

४ इंद्रानें आर्यांकरितां भूमीचा विस्तार केला ( ऋ. ७-३३-५ )

५ गतवर्षी व तिगस्ता इंडियन हिस्टॉरिकल क्वार्टर्ली मध्यें या विषयावर चार लेख आले असून त्यांत हिंदुस्थान जिंकल्याची कथाच खरी अशा नानासाहेब वैद्य यांचा लेख आला आहे आणि जैनायपति यांनीं मूळ लेख व उत्तर लिहिले आहे ( व्हा. ४।५।६ पहा ). ते हिंदुस्थान जिंकल्याची कथा खोटी Invasion of India a myth ) मानतात.

क्वचित् एकादा अविनाशचंद्र दास, जैनायपति किंवा मी ती कथा अग्राह्य व खोटी समजतों. आम्ही मूळचेच अग्रस्थ असून परदेशांतूनहि पसरलों असें आमचें म्हणणें आहे. असो. नानासाहेब पावगी यांनीं भारतीय साम्राज्य पु. १ लें यांत आम्ही मूळ पंजाबांतले असून हिंदुस्थान जिकला असें म्हटलें आहे. पण ८ व्या भागांत आम्हीं आर्यावर्तांतले[१] असें ते प्रतिपादतात. वरील तज्ज्ञांच्या मताप्रमाणें या देशांतील आजची प्रजा ही या तीन भिन्नभिन्न वंशांच्या लोकांच्या वर्णसंकरामुळें झालेली प्रजा आहे. या देशांतील लोकांच्या कातडीचे जे भिन्न रंग आढळून येतात त्याचें कारण हा वर्णसंकर. आर्य हा लांबट चेहऱ्याचा, सरळ नासिकेचा आणि गौरवर्णाचा. तो पंजाबांत आणि राजपुतान्यांत मुख्यतः आढळतो. दक्षिणेंत बहुतेक द्रविड व द्रविडमिश्र लोक आहेत. बाकी इतरत्र असलेले आर्य म्हणविणारे बहुतेक लोक मिश्रसंततीचे.

५ या वरील विचारपरंपरेंत चातुर्वर्ण्याचा उलगडा होत नाहीं. आर्य-द्रविड आणि संकर ( गौर, कृष्ण व संकर ) असे तीनच प्रकार आढळून यावे; पण आहेत चार. बहुतेक पाश्चात्य विद्वानांचा असाच रोख आहे. आमच्याकडील कांहीं विद्वानांनीं अलीकडे चातुर्वर्ण्याचा उलगडा करण्याचा प्रयत्न केला आहे. त्यांत कै. राजवाडे हे प्रमुख होते. महाभारतांत एके ठिकाणीं ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र हे चार रंगाचे श्वेत, रक्त, पीत आणि कृष्ण—लोक होते असा अभिप्राय प्रकट केला आहे. तो आधाराला घेऊन राजवाडे असें म्हणतात कीं, गौरवर्णाचे जे ब्राह्मण त्यांस रक्त वर्णाचे भिन्न असें क्षत्रिय आणि पीत वर्णाचे भिन्न असे वैश्य हे पामीरचे पठारावर ( हिमालयाचा अत्युच्च पण वसति होण्यासारखा भाग ) भेटले. ते संघटित होऊन त्यांचें त्रैवर्ण्य बनलें व ते दक्षिणेकडे हिंदुस्थानांत आले. त्यांस हिंदुस्थानांत शूद्र भेटले; आणि त्यांस त्यांनीं चातुर्वर्ण्यांत गोवून घेतलें. अशा या चार भिन्न भिन्न लोकांचें चातुर्वर्ण्य ( चार रंगांच्या लोकांचें ऐक्य ) बनलें असून त्यांनीं सर्व देश व्यापला आहे. हे तीन भिन्न वर्णाचे लोक कोठून व कसे येऊन एकत्र झाले व त्यांची एक संस्कृति, भाषा, धर्म, सर्व

१ आर्यावर्तांतले किंवा हिंदुस्थानांतले असेंहि म्हणतात मग आर्यावर्त व हिंदुस्थान ते एकच समजतात कीं काय अशी शंका येते.

एक कसें हें राजवाड्यांनीं अगर त्यांचे मताचे रा. रा. चापेकरांनीं सांगितलें नाहीं. यांनीं शूद्रांत कोणकोणत्या लोकांचा – द्रविड, मुंड वगैरे समावेश केला हें समजून येत नाहीं. शूद्र हे अन्त्यज अशी राजवाडे, चापेकर व पावगी यांची समजूत दिसते (पावगी त्रैवर्णिक आर्यहि अन्त्यजच समजतात). असुर, राक्षस, दास, दस्यू आणि शूद्र यांचा परस्पर संबंध काय व हे एथें आले कोठून याचाहि उलगडा यांनीं केलेला नाहीं. देव, असुर आणि मानव अशी मूळ[1]–पण कोठें राहणारी ?–तीन प्रकारची प्रजा असें चापेकर एके ठिकाणीं म्हणतात. आजची हिंदुस्थानांतील बहुतेक प्रजा संकर असा राजवाडे यांचा तसाच नानासाहेब वैद्य यांचा आशय दिसतो. त्रैवर्णिक लोक आग्नेयेकडून (किंवा कचित् उत्तरेकडून–चिंतामणराव वैद्य) आले आणि त्यांनीं हा देश जिंकला असा अभिप्राय के. पंडित, राजवाडे, आणि श्री. वैद्य, चापेकर, पावगी (?) या सर्वांचा आहे. तथापि त्यांतल्या त्यांत पावगी यांचें असें म्हणणें आहे कीं, आर्य हे 'उत्तर हिंदुस्थान व त्याच्या आसमंतांतील वायव्य दिशेकडील प्रांत एथील मूळचे राहणारे लोक. आर्यांनीं हा देश प्रथम व्यापला आणि सर्व भरतखंड जिंकलें आणि नंतर एथून ते आर्क्टिक प्रदेशापर्यंत पसरले. नानासाहेब पावगी यांनीं चातुर्वर्ण्य कसें बनलें व त्याचा शरीराच्या रंगाशीं काय संबंध आहे, याचा उलगडा केलेला दिसत नाहीं. "ही वर्णव्यवस्था केवळ धंदेवाईकांच्या संबंधानेंच झाला असल्याचें दिसतें" असें ते भारतीय साम्राज्य पूर्वार्ध पुस्तक २ रें पा. ४२ यांत म्हणतात.

---

१ (मत्स्य अ. ५३ श्लो. ६७-६८) वायुपुराण (वैदिक निबंध पा. १८७-१८८).

२ तथापि पा. २९ वर 'वेदकाळीं इतर्हीप्रमाणेंच ब्राह्मणक्षत्रियादि वर्णव्यवस्था असावी असें अनुमान होतें' असेंहि म्हणतात. या दोन विधानांत आम्हांला पुष्कळच फरक वाटतो. पुरुषसूक्त १२ व पंचजन शब्द यावरून त्यांनीं हीं दोन अनुमानें काढलीं आहेत. चातुर्वर्ण्यांत हमखास बेटीव्यवहार होई आणि वर्णांतर सुखेनैव होऊं शके असें ते पा. ४३ वर प्रतिपादतात ! । पूर्वार्ध पुस्तक २ रें भाग ११ यांत त्यांनीं चातुर्वर्ण्यसमाजरचना कशी बनली असावी तें थोडक्यांत दिलें आहे (पा. ५१-५५) अनार्यहि सारस्वतोम करून आर्य होई. अनुलोम प्रतिलोमविवाह ते परस्पर बेटीव्यवहार समजतात. ययातीच्या कर्थीच्या एका उदाह-

६ उलटपक्षीं शरीराच्या रंगांचा आणि चातुर्वर्ण्याचा संबंध नाहीं असें मी एथें प्रतिपादन केलें आहे. वर्ण म्हणजे निवड. ते एका मूळ समाजाचें विशिष्ट ध्येयामुळें विभजन (selection, classification) होऊन बनत बनत बनलें. हा वर्ण शब्दाचा अर्थ अत्यंत प्राचीन आहे, आणि पूर्वपरंपरागत आहे. याच धर्तीचे वर्ण म्ह. संप्रदाय किंवा पक्ष असा अर्थ प्राचीन पार्शियन वाङ्मयांतहि आढळून येतो.

७ मूळ अत्यंत प्राचीन कालीं उत्पन्न झालेला एक अविभक्त समाज; त्याला पूर्वीच्या लोकांनीं आसुर किंवा ब्रह्म असें नांव दिलेलें आढळून येतें. त्यांत एक विशिष्ट विचार उत्पन्न होऊन ते विशिष्ट विचाराचे लोक वेगळे झाले व त्यांनीं आपल्यास 'देव' ही संज्ञा घेतली. हे संख्येनें थोडे पण विचारी, बुद्धिमान् आणि निवृत्त वृत्तीचे लोक होते. बाकी राहिलेला जो फार मोठा समाज त्याला मूळचें 'असुर' हेच नांव कायम राहिलें. हे देवांच्या दृष्टीनें प्रवृत्त वृत्तीचे लोक. दोघांमध्यें स्पर्धा उत्पन्न झाली. प्रत्येक जण आपण श्रेष्ठ असें म्हणूं लागले. दोघांच्या लढाया सुरू झाल्या — कदाचित् हीं युद्धें शस्त्रास्त्रांनीं युक्त असतील किंवा वाग्युद्धेंच असतील.

८ देवांच्या मागून पितर आणि तदुत्पन्न मानव किंवा मनुष्य नांवाचा एक संघ उत्पन्न होऊन तो देवांचें अनुकरण करूं लागला. 'त्वे नः पूर्वे पितरः नवग्वा सप्त विप्रासः वाजयंत — ऋ. ६-२२-२ असें ऋग्वेदांत म्हटलें आहे. असे हे देव, मानव आणि असुर असे तीन समाज उत्पन्न झाले. पितर हे मानवाचे पूर्वज आणि देव आणि मानव यांतील दुव्यासारखे होते. असुरांतून आणखी भिन्न भिन्न कारणांनीं भिन्नभिन्न

रणावरून प्रतिलोम विवाह मान्य समजतात. अनार्य मिळ मालूम होऊं शके असा त्यांचा अभिप्राय दिसतो. एकाच समाजाचे चार तुकडे केले. शूद्र हा आर्यांपैकीं ब्राह्मणक्षत्रियवैश्य होऊन राहिलेला शेष काल्पनिक वर्ग असा स्वरूपाचें हें त्यांचें प्रतिपादन आहे. विभजन प्रकारानें एक होत गेले. ब्राह्मण वर्ण झाल्यावर क्षत्रिय वगैरे प्रत्येक व्यक्ति कशी व केव्हां वर्णांत समाविष्ट होई, वर्णांतर कसें व केव्हां होई वगैरे विवेचन नाही. अनार्य म्हणजे एके ठिकाणीं भिल्ल कोळ वगैरे तर दुसरे ठिकाणीं (पु. २ भा १० पा. २०) ते पुराणीं लोक असें म्हटलेलें आढळतें (हे रामायणांतील राक्षस की काय?)

समाज उत्पन्न झाले. अहि, राक्षस, यक्ष, गंधर्वाप्सरस्, पिशाच, दानव, असुर, दास, दस्यु वगैरे नांवें त्यांस प्राप्त झालीं. या प्रत्येकाचें वैशिष्ट्य काय हें समजण्यास आज मार्ग राहिलेला दिसत नाहीं. त्या सर्वांचें सामान्य वर्णन असुर किंवा यातुधान या शब्दांनीं करितां येईल.

९ आसुर समाजांत जशी विभजनाची क्रिया चालू होती त्याप्रमाणेंच देव व मानव समाजांतहि चालू होती. प्रथम देवसमाजांत चातुर्वर्ण्य उत्पन्न झालें असें बृहदारण्यकोपनिषदावरून दिसतें. मानवांतहि तें तसेंच उत्पन्न झालें. दोन भिन्न समाज उत्पन्न होऊन त्यांच्यांत द्रोह आणि स्पर्धा उत्पन्न झाली म्हणजे प्रत्येकास स्वयपूर्ण बनावेंच लागतें. त्या प्रत्येकास संरक्षणाची व पोषणाची स्वतंत्र आवश्यकता उत्पन्न होते आणि त्यामुळें त्यांतल्या त्यांत क्षत्रिय व वैश्य समाजाची उत्पत्ति होते किंवा करावी लागते. मूळ निवृत्तिप्रधान म्हणून आसुर समाजांतून बाहेर फुटून निघालेल्या लोकांना स्पर्धा, द्रोह, युद्धें वगैरे कारणांमुळें समाजसंरक्षणार्थ फिरून प्रवृत्त बनावें लागलें असा याचा अर्थ होतो. तथापि त्यांचें समानाधिकरण मूळचें निवृत्तिप्रधान किंवा पारलौकिक होतें. आसुर समाजाचें मुख्य समानाधिकरण ऐहिक उपभोग व वर्चस्व हेंच होतें आणि त्यामुळें एक प्रकारची चुरस उत्पन्न होऊन समाजांत प्रत्यक्ष युद्धें उत्पन्न होणें ही गोष्टहि संभवनीय आहे. निवृत्तवृत्तीनें वेगळे झालेल्या लोकांत कांहीं अल्प लोक केवळ निवृत्तच राहिले असावे यांत आश्चर्य नाहीं. देवांप्रमाणेंच हे 'अद्रोही' राहिले व त्यांनीं ऐहिक ऐश्वर्याची बिलकुल पर्वा केली नाहीं. त्यामुळें त्यांमध्यें एक प्रकारचें वैशिष्ट्य आणि श्रेष्ठत्व उत्पन्न झालें. हेंच ब्राह्मण. त्यांना पुढें 'भूदेव' असें म्हणूं लागले. 'सर संवत्सर हे व्रताचरण' करूं लागले असें यांचें ऋग्वेदांत वर्णन आलें असून त्यांचें 'भूदेव' असें वर्णन बहुधा अथर्ववेदांत व क्वचित् ऋग्वेदांत आढळून येतें. समाजसंरक्षणाचें कार्य अंगावर पडल्यामुळें दुसऱ्या विशिष्ट वर्गाला क्षत्रिय हें नांव आणि आपल्या स्वतंत्र समाजाचे पोषणार्थ इतर व्यवसाय करणारांना विश् किंवा वैश्य असें नांव पडलें. आणि हा मूळ सत्त्वप्रधान जो एक समाज होता त्याचेच तीन पोटभेद पडून त्रैवर्णिक समाज उत्पन्न झाला.

१० त्रैवर्णिक समाज हा मूळ निवृत्तिप्रधान अशा मानव समाजांतच उत्पन्न झाला. दुसरा प्रवृत्तिप्रधान समाज. या दोन समाजांचीं मूळचीं नांवें

देव आणि असुर. त्यापुढें त्यांचे पितर आणि असुर आणि त्यानंतर मानव आणि असुर असे विभाग झाले. प्रथम दोन दोनच विभाग. या असुरांनाच केव्हां केव्हां दास आणि दस्यू हीं नांवें पडलेलीं आढळतात, तर मानवांनीं आपल्याला अर्य किंवा आर्य हें नांव धारण केलेलें आढळतें. अर्थात् देवासुरांप्रमाणें प्रथम मानवांत आर्य आणि असुर किंवा आर्य आणि दास असे दोनच विभाग झालेले होते. अशा या दोन विभागांना प्रथम वर्ण हें नांव ऋग्वेदांत दिल्याचें आढळतें. चमत्कार असा कीं, प्राचीन इजिप्शियन व पर्थियन लोकांतहि प्रथम असेंच द्वैवर्ण्य किंवा द्वैवर्ग्य आढळून येतें आणि नंतर चातुर्वर्ग्य किंवा चातुर्वर्ण्यहि आढळून येतें. या दोहोंमधली पायरी किंवा दुवा म्हणजे त्रैवर्ग्य असें वाटण्यासारखें आहे. परंतु तसा अर्थ नव्हे. द्वैवर्ण्यांतील प्रत्येक समाजांत विभजनाचें कार्य चालूच होतें. आर्यसमाजांतील विभजनास त्रैवर्ण्याचें स्वरूप प्राप्त झालें तसेंच असुर समाजांतहि पुढें त्रैवर्ग्य उत्पन्न झालेंच असलें पाहिजे. आणि असे कांहीं उल्लेख वेदांत सांपडतातहि. तथापि त्यांच्या विभजनास आर्यांच्यासारखें त्रैवर्ण्याचें विशिष्ट स्वरूप प्राप्त झालें होतें कीं नाहीं सांगवत नाहीं. एथें असें मात्र सांगण्यासारखें आहे कीं, आर्यांप्रमाणेंच ( आर्यसदृश असे ) समाज इतरत्र आढळून येतात. कदाचित् त्या आर्यांच्याच वसाहतीहि असतील. कदाचित् आर्यांमध्यें व त्यांचेमध्यें कांहीं साम्यें तशींच वैधर्म्यहि आढळतील. असे हे प्राचीन लोक म्हणजे ॲटलँटिस खंडांतले, मिसर ( इजिप्त ) देशांतले, मद ( medes ) लोक, आणि प्राचीन पर्थियन लोक होत. यांच्यांत त्रैवर्ण्य व चातुर्वर्ण्य आढळतें. असुरियन लोकांतहि तें असावें. तथापि त्याबद्दल असावा इतका आज मजजवळ आधार नाहीं. त्यांच्यांत दोन वर्णांचेच घाट झाली आणि त्यांच्या समाजास निराळें वळण लागलें असेंहि शंका येते.

११ निवृत्तिधर्में श्रेष्ठ ठरवूनच देव, पितर आणि मानव एकामागून एक आसुर समाजांतून बाहेर पडले ( मानव हे पितरांचे वंशज असतील असा संभव अधिक दिसतो ). परंतु समाजांतून बाहेर पडण्याचें कारण नव्हतें. निवृत्त समाज स्वतःस उच्चधास किंवा श्रेष्ठ मानूं लागला याचाच अर्थ प्रवृत्त समाजास तो सरेश दृष्टीनें कनिष्ठ ( नेचाशास ) मानूं लागला व दोघांत त्यामुळें द्रोह उत्पन्न होऊन उच्चधासीय म्हणविणारांना स्वतंर-

रक्षणार्थ त्रैवर्ण्य उत्पन्न करावें लागलें, वगैरे वर सांगितलेंच आहे. वैयक्तिक, ऐहिक उन्नतीचे विचार सर्वस्वीं सोडून ज्यांनीं समाजांतील पारलौकिक कार्य तेवढें आपलें स्वकर्म म्हणून पतकरलें, त्यांना साहजिकच या समाजांत श्रेष्ठत्व प्राप्त झालें. त्यांनीं हें काम अखंड पतकरलें म्हणून किंवा या लोकांत 'आनुवंशिक वर्चस्वा'ची जागृति झाली म्हणून त्यांत जातीचें तत्त्व उत्पन्न झालें. इतर समाजांत जातीचें तत्त्व दिसून येतें. परंतु तें इतक्या उन्नत किंवा उत्तान स्वरूपाचें किंवा प्राचीन कालीं नव्हतें. सामाजिक विकासाचीं तत्त्वें–इतर शास्त्रांतील तत्त्वांप्रमाणेंच–या आर्यांनीं निश्चित करून त्याप्रमाणें वागण्याचें–आचरण्याचें–ठरविलें आणि म्हणून

तमित् च्यौत्नैः कृतेभिः आर्यन्ति ॥ ऋ. ८

अशी ऋग्वेदांत आर्य शब्दाची एक प्रकारें व्याख्याच दिलेली आहे. एकादें कार्य अखंड पतकरणें ही फार जोखीम आहे. तथापि ती **जोखीम उत्साहानें पतकरून** कांहीं लोकांनीं समाजांतील 'ब्रह्म' (श्रेष्ठ) पदाचा मान प्राप्त करून घेतला व त्यामुळें त्यांस 'ब्राह्मण' म्हणूं लागले. सर्व देशांतून पारलौकिक कार्यार्थच देह वाहणारांना श्रेष्ठत्व प्राप्त होत असतें, त्याप्रमाणेंच तें एथेंहि आलें. त्यांतून देव, पितर आणि ब्राह्मण अशी यांची प्रणालिका असल्यामुळें यांना साहजिक श्रेष्ठत्व आलें. ब्राह्मणांनीं आनुवंशिक तत्त्व पतकरलें याची साक्ष त्यांच्या **वांशिक श्रेष्ठतेच्या अभिमानांत** दिसून येते. ते आपणांस पितरांचे–सप्तर्षींचे–वंशज असें मानीत असें ऋग्वेदांत आढळतें आणि त्यांच्याप्रमाणें पारलौकिक कल्याणार्थच ते घडपडत. एकदां आनुवंशिक तत्त्व शिरलें म्हणजे तें सर्वत्र शिरतें. समाजाच्या पारलौकिक सुरक्षिततेकरितां जसें ब्राह्मणांनीं आपल्यास वाहून घेतलें त्याप्रमाणेंच समाजाच्या ऐहिक सुरक्षिततेकरितां ज्यांनीं आपल्यास अखंड वाहून घेतलें व तें काम स्वकर्म म्हणून पतकरलें आणि तद्विशिष्टगुणसंपन्न राहण्याचें योजिलें त्या **'वीरविशांचा'** (ऋ.) क्षत्रिय वर्ण–आणि आनुवंशिक तत्त्वामुळें क्षत्रिय जाति–ठरली. ऐहिक उन्नतीकरितां ही सर्वश्रेष्ठ जबाबदारी पतकरल्यामुळें त्यांना ब्राह्मणांच्या खालचें म्हणजे दुसरें स्थान मिळालें. कारण पारलौकिक श्रेष्ठत्वाचें स्थान पहिलें असेंच सर्वत्र आढळतें. ज्यांनीं समाजानें क्षेम आणि स्वास्थ्य स्वकर्म म्हणून अखंड पतकरलें त्यांना वैश्य ही पदवी मिळाली व त्यांस तिसरें स्थान प्राप्त झालें. विश या **शब्दाचा मूळ अर्थ**

संकर होत असून तो वर्णसंकराइतकाच त्याज्य आहे अशी रामायणांत कल्पना आहे. जाति, वर्ण, स्वकर्माची जोखीम आणि कर्मभूमीची कल्पना अशी ही चातुर्वर्ण्याची चतुरंग कल्पना आहे. या चतुरंग कल्पनेमुळें त्यास ( चातुर्वर्ण्यास ) चमत्काराचें स्वरूप प्राप्त झालें आहे. कर्तव्यतत्परतेच्या जडजोखमामुळेंच या समाजास तुटकपणाचें ( Exclusiveness ) स्वरूप प्राप्त होणें अपरिहार्य होतें.

१२ अखिल मानवजातींत अलीकडील शास्त्रज्ञ चार पांच वंश मानतात. हे वंश मुद्दाम नसले तरी सहजगत्या शारीरिक रंगावर बसले गेले आहेत. उदा. आर्य हे गौर, अमेरिकन इंडियन रक्त, चिनी अ. मंगोलियन पीत, आणि नीग्रो आफ्रिकन् कृष्ण. 'कर्मधर्मसंयोगानें आमच्यांतहि पूर्वाचार्यांनी हेच चार रंग अलंकारार्थी-चार वर्णांस लावले. पण वरील वंश आणि आमचे वर्ण एक नव्हत. श्वेतसमुद्र, (रक्त) तांबडा समुद्र, पीत समुद्र आणि काळा समुद्र किंवा दधि, क्षीर, दुग्ध व घृत समुद्र हीं चार नांवें त्या रंगावरून किंवा त्या त्या पदार्थावरून पडलेलीं नव्हत. त्या प्रमाणेंच आमच्यांतील गौरादि रंगावरून वर्णांची नांवें पडलेलीं नव्हत.तथापि युरोपीय नामसाम्यावरून आमचे वर्णहि त्याच स्वरूपाचे असावेत अशी कल्पना कै. राजवाड्यांनीं केली. वास्तविक महाभारताच्या शांतिपर्वांत हा वाद भृगुभारद्वाज संवादांत (अ. १८०।१८१) उल्लेखलेलाच आहे. त्याचा निर्णय तेथें असा दिला आहे कीं, शरीराच्या रंगावर वर्ण बसविलेले नसून शुद्धाशुद्ध कर्मावर ते बसविलेले आहेत. हा निर्णय अमान्य ठरवून राजवाड्यांनीं चार भिन्न भिन्न रंगांच्या लोकांचें चतुर्वर्ण्य होतेंच अशी मनाशीं कल्पना कायम करून त्या कल्पनेचा विस्तार केला आहे. पण याचा अर्थ असा होतो कीं, नीग्रो हाच एथील मूळचा वसति करून राहणारा मनुष्य! अति प्राचीन काळीं-कीं ज्या वेळीं दक्षिण हिंदुस्थान, अफ्रिकाखंड, आणि आस्टेलेशिया खंड एकच भूमिखंड होतें, म्हणजे कदाचित् लाखो वर्षांपूर्वी-दक्षिण हिंदुस्थानांतील लोक कदाचित् या वंशाचे असतीलहि, नाहीं कोणी म्हणावें? अशा लोकांचें वानरांशीं साम्य होतें म्हणतात व त्या भूमिखंडास वानरखंड ( Lamuria ) असेंच तज्ज्ञ लोक म्हणत असतात. रामायणांत या लोकांस 'नंदीमुख' असेंहि नांव दिलेलें आढळतें. पण शातकालांत या वानरखंडाचीं तीन किंवा बहु

शकलें होऊन त्यांत हिंदुस्थान अलग झालें व दक्षिण व उत्तर हिंदुस्थान सांधलीं गेलीं. ह्या दक्षिण हिंदुस्थानांतील वानर लोक आज मितीस कोठें राहिलेले दिसत नाहींत अशी समजूत आहे. हे द्रविड लोकांचे पूर्वज वानर लोक हिंदुस्थानांत वा इतरत्र आतां आढळत नाहींत असें म्हणतात. ज्यांना मुंड म्हणतात ते हे लोक नव्हत. दक्षिणेंतील लोक उत्तरेकडे पसरले अशी प्रथाहि नाहीं. द्रविड लोकांविषयीं आजच्या युरोपियांची समजूत अशी कीं, तेहि आर्यांप्रमाणें बाहेरूनच आले आणि आर्य लोकांनीं त्यांना दक्षिणेकडे दडपलें. आजचे द्रविड कोणीकडून, कोठून कसे आले व त्यांचें मूलस्थान कोणतें याचा पत्ता नाहीं, असा याचा अर्थ होतो. दक्षिणेकडचे रामायणांतील राक्षस तेहि हे नव्हत.* अशा स्थितींत राजवाड्यांच्या किंवा चानेकरांच्या कल्पनेंतील अवंत्य शूद्र कोणते, ते कोठून आले, वगैरे गोष्टींचा मागमूस लागत नाहीं. जसे वेदांत तसेच इतरत्र दास किंवा अहि किंवा सर्प असलेमुळें किंबहुना दास ज्यू लोकांच्या ईश्वराविरोधी सैताना-सारखा आढळून येत असल्यामुळें दास किंवा दस्यू हा असुरहि नव्हे आणि शूद्रहि नव्हे असा निष्कर्ष निघतो. असा हा शूद्र नैसर्गिकांना हिंदुस्थानांत भेटला या म्हणण्यास प्रमाण नाहीं. तसेंच रक्तवर्णाचा क्षत्रिय तरी पामीरपठारावर कोठून आला ? हिंदुस्थानांत आढळून येणारा पीत वर्ण हा तर केवळ हिंदुस्थानांतच आढळून जगांत इतरत्र कोठेंच आढळून येत नाहीं असें महाभारतउपसंहारांत नानासाहेब वैद्य म्हणतात. अशा स्थितींत हे परतत विभिन्न त्रैवर्णिक पामीरपठारावर कोठून आले, त्यांची एकी किंवा संघटन कसें झालें, त्यांची भाषा, त्यांची संस्कृति, त्यांच्या प्राचीन पौराणिक कथा एक कशा व्हाव्या या सर्वच गोष्टी चिंत्य ठरतात.

१३ अशा स्थितींत कोठल्या गौर व कोठल्या कृष्ण वर्णाच्या (रंगाच्या) लोकांच्या संकरापासून आजची भिन्न भिन्न वर्णांची प्रजा उत्पन्न झाली हें सांगतां येणें शक्य आहे काय ! आर्यांच्या भाषेवरून किंवा भाषांतील साम्यावरून आर्य हे आशिया खंडांतील कॉकेशस अथवा युरल पर्वतानजीक किंवा कृष्णसमुद्रा ( Black sea ) पाशीं कोठें तरी मूळ असावे आणि कांहीं तरी कारण उत्पन्न होऊन कोणी पूर्वेकडे व कोणी

१ अलीकडे जाणा मुख्य दक्षिण रशियांतील युक्रेनिया हा प्रांत असावा अशी प्रामाण्य विद्वानांची समजूत झाल्याचें दिसतें. The home of the Indo

पश्चिमेकडे फिरत फिरत गेले अशी कल्पना सर इलियट स्मिथ, मॅक्समुल्लर इत्यादींनी केली आहे. असे हे गीर्वाणपूर्व अशी एकच समान्य भाषा बोलणारे आर्य लोक, सर्व गौरवर्णाचे होते याला काही प्रमाण काय ? लोकमान्यांचें 'आर्यांचें आर्तिक मूलस्थान' मान्य केले आणि वेदिदादि ग्रंथांत सांगितल्यामुळें भिन्नभिन्न युगांत (काली) [illegible] उत्पन्न केलेल्या संकटांमुळें भिन्नभिन्न देशांतून आर्य लोक [illegible] नांत आणि कांहीं इराणांत गेले असें म्हणावें तर एवढ्या मोठ्या कालांतः भिन्नभिन्न स्थलीं राहूनहि त्या सर्वांचा हिंदुस्थानांत येईपर्यंत एक गौरवर्णच कायम राहिला; तेथपर्यंत कोणाशीं संकर न करितां राहिलेल्या लोकांनीं हिंदुस्थानांत मात्र संकर प्रजा उत्पन्न केली (कारण जर्मन वगैरे देशांतून अद्याप असल आर्य आहेत असें कित्येक पाश्चात्य लेखक प्रतिपादितात) असें मानणें धाडसाचें होईल! आमच्या पौराणिक व वैदिक ग्रंथांवरून पाहिलें तर देवासुरयुद्धें अगदीं प्रथमपासून आहेत. अर्थात् एकाच मूळ स्थानीं राहात असलेले देवासुर किंवा देवासुरमानव हे परस्पर भिन्नभिन्न रंगाचे होते असें कसें मानावें ? समस्थलीन (शीत, ऊष्ण किंवा समशीतोष्ण अशा एकाच कटिबंधांत राहणारे लोक भिन्नभिन्न वर्णाचे कां निपजावे ? अर्थात् समस्थलीन व समकालीन देवदानव, सुरासुर, आर्य व दास, स्वाभाविकपणेंच एकाच रंगाचे असले पाहिजेत. त्यांच्यांत भिन्न वर्ण उत्पन्न होऊं शकणार नाहीं. ज्या लोकांनीं दास अवश्य असें मानलें त्यांना दासाविषयींची ही कल्पना नव्हती किंवा द्रविड लोकहि वायव्येकडून हिंदुस्थानांत आले अशी कल्पना नव्हती. त्यामुळें आजपर्यंतच्या तज्ज्ञ म्हणविल्या जाणाऱ्या सर्व लोकांचीं मतें परीक्षून घेणें अवश्य आहे. उलटपक्षीं आम्ही म्हणतों अशी तरी काय खात्री कीं, वैदिक आर्य हे गौरच होते ? किंबहुना वैदिक आर्य गौर होते याला तरी पुरावा आहे काय ? हें निव्वळ अनुमान नव्हे काय ? परंपरा पाहिली तर सर्व गौर ही कल्पना पूर्वकल्पांतल्या लोकांसंबंधानें. या कल्पांत एकटे ब्राह्मण तेवढे गौर, बाकी क्षत्रिय रक्त वर्णाचे आणि वैश्य पीत वर्णाचे. त्यांतहि मतभेद आहेतच. वाचक

---

Europeans by Harold A Bender स. १९२२ हें पुस्तक पहा. परंतु मूळ मानववंशावरून मानलेला हा 'वंश' (Race) वगैरे अस्तित्वात नव्हताच असें अलिकडे युरोपीय म्हणूं लागले आहेत. परिशिष्टांतील इंग्रजी उतारे पहा.

संहितेंत क्षत्रिय धूम्रवर्णाचे आणि वैश्य शुक्ल वर्णाचे असें म्हटलेलें आढळतें. ऋग्वेदांत आर्यांत कांहीं कृष्ण किंवा श्याव वर्णाचे आणि कांहीं पिशंग वर्णाचे आर्य लोक आढळतात. अश्विनी हे तर मधुवर्णाचे देव आहेत. सूक्ष्म विचार केल्यास आजचे सर्व वर्ण किंवा रंग ऋग्वेदीय आर्यांत आढळतील. सारांश एक निश्चित कल्पना मांडलेली नाहीं किंवा होऊं शकत नाहीं. अशा स्थितींत आर्य झाडून सारे गौर वर्णाचे आणि आर्येतर झाडून सारे कृष्ण वर्णाचे ठरविणें आणि त्यांचा संकर झाला व आजचे भिन्नभिन्न रंग उत्पन्न झाले असें अनुमान काढणें किती धाडसाचें आहे!

आर्य आणि असुर, दास व दस्यू यांचें हाडवैर होतें असें म्हणतात. त्यांचीं सदा युद्धेंच चाललेलीं दिसतात! आफ्रिका किंवा अमेरिका देशांतल्याप्रमाणें त्या दोघांत वर्णविद्वेष होता व त्यामुळें हीं युद्धें उत्पन्न झालीं असेंहि कोणी म्हणतात! हे दास आपल्या घरीं सुखासुखीं कोण बाळगील? एकाद्यानें ब्राह्मणाला दास दिले तर त्याची स्तुति कोण करील ती वास्तविक शिक्षाच! पण अशा दासांचीहि स्तुति केलेली आढळते. (शतं दासे बल्बूथे आददे इ.) अशा दासांशीं किंवा दासस्त्रियांशीं 'अतिपरिचय' कोण करीत बसेल? पण अशा परिचय केल्याचें वर्णन यजुर्वेदांत आढळून येतें. त्याअर्थी वर्णभेद किंवा वर्णविद्वेष तरी नव्हताच किंवा अतिपरिचयाची संकराची कल्पना तरी खोटी! सारांश कोणत्याहि दृष्टीनें पाहिलें तरी या सर्व कल्पना 'लंगड्या' ठरतात.

(१४) आतांपर्यंत केलेल्या एकंदर विवेचनाचा मथितार्थ असाः—

(१) आर्य झाडून सारे गौर वर्णाचे ही कल्पना चुकीची व असिद्ध. त्यांच्यांत गौर, कृष्ण, श्याव, पिशंग असे अनेक रंगांचे लोक होते. अर्थात् कृष्ण वर्ण संकरानेंच त्यांच्यांत उत्पन्न झाला ही कल्पना खोटी. (त्यांचें गौरादि वर्णन पोषाखावरून केलें असण्याचा संभव आहे. इतरत्र इजिप्तांत हि तसेंच आढळतें). महाभारतांत हे त्याच्या अंतरंगाचे किंवा शरीराबाहेरील वलयाचे रंग असल्याची कल्पना केली आहे तीच सयुक्तिक दिसते.

(२) ते परस्पर शत्रु असले तरी समकालीन व समस्थलीन असल्यामुळें — एकाच कटिबंधांत राहणारे असल्यामुळें — त्यांच्यांत भिन्न वर्णाची शक्यताहि नव्हती. वेदांत आर्य आणि आर्येतर यांचे शारीरिक रंग एकच असल्याचेंहि आढळून येतें. तसेंच पुराणांत.

( ३ ) असुर, राक्षस, दानव, दास व दस्यू यांच्या शारीरिक कृष्णवर्णाचें वर्णन अलंकारिक असण्याचाच अधिक संभव आहे. एक तर ते आकाशांतील दग मानल्यास सर्वच ग्रंथ आटोपला! पण ते मानव असल्यास त्यांचा कृष्णवर्ण शरीराचा नसून अंतःकरणाचा होता. कृष्ण शब्दाचा हा अलंकारिक अर्थ प्राचीन परंपरेवरून, आवेस्तिक ग्रंथावरून हिंदुस्थानांतील व बाहेरच्या देशांतील आजच्या उपयोगावरून सिद्ध होऊं शकतो.

( ४ ) भृगु-भारद्वाज संवादावरून ( भारत ) हे रंग उत्तानार्थी नव्हते असें निदान २००० वर्षांपूर्वीच ठरून गेलें होतें. त्यावेळींच आर्यांतील ब्राह्मणांत कृष्ण वर्णाचे आणि शूद्रांत गौरवर्णाचे लोक होते! किंबहुना—खुद्द पांडवकालीं—खुद्द पांडवांत आणि कौरवांत कृष्णवर्णाचे बहुत लोक राजघराण्यांतूनहि होते.

( ५ ) गौर व कृष्ण यांच्या संकरापासून रक्त व पीत वर्ण होणें शक्य नाहीं.

( ६ ) तीन भिन्न रंगांच्या लोकांचें संघटण पामीर खिंडीवर—या खिंडींत अशी कितीशी वस्ती राहूं शकेल?—झालें किंवा खुद्द या अवरच लोकांशीं त्यांचें मिळून संकरण झालें याला कल्पनेवांचून भारतांतील रंगाच्या किंवा वेनाच्या कथेवांचून आधार नाहीं. वेनाचीहि दंतकथाच! तिला कल्पनेवांचून आधार नाहीं. भारतांत वर्णन केलेल्या मिश्र संततीचाहि संबंध शारीरिक वर्णाशीं आहे अशी साक्षी देतां येत नाहीं. शिवाय भारतांतच रंगांची कल्पना अग्राह्य-त्याज्य ठरविली आहे ती विचारपूर्वकच ठरविली आहे.

( ७ ) चार वर्णांच्या ( रंगांच्या ) भाषा, आचार, विचार-संस्कृति ही भिन्न असतां त्यांच्यांत संघटण होणें शक्य नव्हतें.

( ८ ) आर्य आणि आर्येतर यांजमधील विजय राजकीय नसून धार्मिक व नैतिक आहे. तो राजकीय संक्रमणाचा नसून विचारसंक्रमणाचा आहे, व तो तात्त्विक आहे.

( ९ ) मुंडाच्या नाकाचा चपटेपणा, नकटेपणा किंवा आखुडपणा याचा वैदिक आर्यांपूर्वी संबंध नाहीं. मुंडांचें वर्णन वेदांत नाहीं. किंबहुना वेदांत नाकाचा आखुडपणा, चपटेपणा अगर फेंदरेपणा कोठेंहि वर्णिलेला नाहीं. 'अनास' शब्दावरची ही कसरत व्यर्थच आहे.

(१०) आर्य आणि आर्येतर यांजमधील भेद दैवासुरसंपत्तीचा आहे. वर्णभेद नाहीं.

(११) आर्य आणि आर्येतर दोघेहि यज्ञ करीत. पण भिन्न हेतूनें करीत.

(१२) चातुर्वर्ण्याचा भेद कर्मभेदाचा व संस्कारभेदाचा आणि जबाबदारीचा आहे. ही भूमि किंवा हा लोक भोगभूमि नसून कर्मभूमि आहे असें मानणारांचा आहे.

असा निष्कर्ष आमच्या एकंदर विवेचनाचा निघणार आहे. कांहीं विवेचन अंशतः वर दिलें आहे. साधार व विस्तृत पुढें येणार आहे.

## काल व स्वरूप

१५. चातुर्वर्ण्य वेदकालपूर्व बनलेलें आहे किंवा निदान वेदकालाचे पूर्व व उत्तर असे भाग पाडल्यास पूर्वभागांत तें बनलें आहे असा आमचा अभिप्राय आहे. या कालींच त्यास आनुवंशिक स्वरूप प्राप्त झालें होतें, त्यांत आनुक्रमिकता होती आणि सर्वथा बेटीबंद नसलें तरी सर्वथा अनुलोम विवाह बंद होते. अनुलोभ विवाह देखील क्वचित् होत. अर्थात् तें ४ ते ८००० वर्षांपूर्वींचें तरी आहे. तें इजिप्शियन, मीड किंवा मद, आणि पर्शियन लोकांत दिसून येतें त्याअर्थी तत्पूर्वकालींच किंवा त्यांचेबरोबर आमचेकडेहि होतें. आम्ही या लोकांचे पूर्वींचे आहोंत उत्तरकालांतील नाहीं.

असें यापुढील निबंधाचें सामान्य स्वरूप असून त्यांत शक्य तेथें आधार दिले आहेत. 'नामूलं लिख्यते किंचित्' असा बाणा इतक्या प्राचीन गोष्टीसंबंधानें सर्वथा ठेवतां आला नाहीं, तरी मुख्य मुख्य गोष्टी आधारावांचून लिहिल्या नाहींत. उलटपक्षीं यापूर्वींचे बहुतेक लोकांचें लिखाण केवळ कल्पनाच्या साम्राज्यांतलें आहे.

## विपर्यास

पूर्वपक्षाचे सिद्धांत गृहीत धरल्याचे विपरीत परिणाम कांहीं दाखवितां येण्यासारखे आहेत. (१) हाना वगैरे जर्मन व तत्सम फ्रेंच स्कँडेनेवियन पाश्चात्यांनीं आर्य हे केवळ गौर किंवा गौर पिंगं (Blond white)

म्हणजे तांबुस गौर वर्णाचे असें समजून खरे आर्य कायते इंग्लंड, जर्मनी, स्कँडेनेविया वगैरे देशांतच आहेत, हिंदुस्थानांत केवळ संकर व नीच दर्जाचीच प्रजा आहे असें विधान अभिमानपूर्वक केलें आहे. किंबहुना, आर्य लोक अशा थंड प्रदेशांतच जिवंत राहूं शकतात. त्यामुळें इराण, हिंदुस्थान वगैरे देशांत त्यांचें बीज नष्टच झालें आहे असें टेलर वगैरे ग्रंथकार म्हणतात. (The influence of the climate has exterminated the Aryan race in India, Persia, Greece, Italy, Spain, France and Southern Germany. Because the Northern race which is prolific in cold climates becomes sterile in southern latitudes and ultimately dies out. ). मग दक्षिण अफ्रिकेंत, ऑस्ट्रेलियांत, मध्य अमेरिकेंतले युरोपियन जगणार कीं मरणार ?

( २ ) वेदभाषांतरकार ग्रिफिथ यानें चातुर्वर्ण्य हें वेदकालांत उत्तरकालीन असें समजून यजुर्वेदाच्या भाषांतराचे प्रस्तावनेंत खालील विधान केलें आहे – 'दी रँकिग् सेकंड् इन् दि इंडियन् एन्युमरेशन् ऑफ् दि वेदाज् अँड् कंटेनिंग् मच् दँट् ईज् ऑफ व्हेरि पन्शंट् ओरिजिन् इट्स् कंप्लीशन् इन् इट्स् प्रेझेंट् फॉर्म, एग्झिबिटिंग् अँज् इट् डज् दि ऑल्मोस्ट् कंप्लीट् डिव्हलपमेंट् ऑफ् कास्ट्स् अँड् मिक्स्ड् रेसेस् अड् कन्सिडरेबल् अँडव्हॅन्सेस् इन् आर्टस् अँन्ड् सायन्सेस्, ट्रेड्स्, हँडि-क्रॅफ्ट्स् अँड् ऑक्युपेशन्स, इज् एव्हिडेंट्ली ऑफ् ए लेटर डेट् दॅन् दॅट् ऑफ् अथर्ववेद (जाड टाइप आमचा). सारांश, यजुर्वेद अर्वाचीन; कां ? तर त्यांत चातुर्वर्ण्य आणि मिश्र जाती यांचा पूर्ण विकास दिसतो म्हणून ! ( २ ) कलाकौशल्य, व्यापार, हस्तव्यवसाय इ. यांची विशेष प्रगति दिसते म्हणून !! पण याच गोष्टी ऋग्वेदांतच दिसून आल्या तर हीं सर्व अनुमानें अर्थात् कवडीमोल ठरतील त्यांची वाट काय ? पैकीं पहिलें कारण सपशेल चुकलें आहे हें या निबंधावरून दिसून येईल.

( ३ ) उलटपक्षीं असुर म्हणजे असीरियन ( असुरियन ) व पर्शियन,

---

१ परकीय भाषेंतील सगळें लिखाण मराठींत नागरी लिपींतच लिहावें अशी लेखकाची इच्छा.

दानव म्हणजे डेन्स, राक्षस म्हणजे रशियन्स, इजिप्शियन्स म्हणजे पांड्य, खाल्डियन्स म्हणजे चोल, फिनिशियन्स् इ. वगैरे हीं विधानें आमच्याकडील विद्वानांनीं केलीं आहेत. तीं केवळ नामसादृश्य किंवा ध्वनिसादृश्य यावरून करणें धोक्याचें व चिन्त्य आहे असें वाटतें.

(४) चवथा प्रकार म्हणजे चातुर्वर्ण्य या शब्दाचा अर्थ चार वर्णांना समाज असा आजपर्यंतचा अर्थ चुकीचा असून तो चार वर्णांचा धर्म असा करावा असें अलीकडे रा. रा. चापेकर यांनीं सुचविलें आहे. हा मुद्दा अर्थातच गौण आहे. मूळ वाद वर्ण शब्दाच्या अर्थाविषयींचाच मुख्यतः आहे. चातुर्वर्ण्याचा येथवर इतिहास झाला. आतां चातुर्वर्ण्याचें भवितव्य काय दिसतें आणि काय असावें असा दुसरा महत्त्वाचा प्रश्न. हा प्रश्न व्यवहारदृष्टीनें अधिक महत्त्वाचा, पण तो विचार स्वतंत्र रीतीनें केलेला बरा. तथापि त्याचें इष्टत्व अलीकडे गेल्या २५।३० वर्षांत समाजशास्त्र, प्राणिशास्त्र आणि वनस्पतिशास्त्र यांना पट्टू लागलें आहे. त्यामुळें त्यांतील मतांचा उल्लेख येथें मधून मधून–विशेषतः आर्यसमाजिष्टी 'जातिव्यवस्था'या पुस्तकांतील विरर्यांसाचा विचार करतांना–केलेला आढळून येईल. चातुर्वर्ण्याचे विषयींचे इष्टतेविषयीं अलीकडील कांहीं पाश्चात्य शास्त्रज्ञांचीं मतेंहि अखेर परिशिष्टांत देत आहों, त्यांवरून चातुर्वर्ण्य टाकाऊ तर नाहींच असें दिसून येईल. तथापि कोणतीहि जुनी किंवा जीर्ण संस्था झाली म्हणजे त्यात कांहीं दोष उत्पन्न होणें स्वाभाविक आहे. निदान तिऱ्हाइतपणाचा आव आणून त्यांकडे दोषैक दृष्टीनें पाहावें कर्से हें दाखवून भेद वाढविणें शक्य असतें. घर कितीहि उत्तम प्रकारच्या साधनांनीं बनविलें असलें तरी तें स्वच्छ व दुरुस्त ठेवण्याची खटपट न केल्यास तें घाणीचें माहेरघर बनून राहतें; किंबहुना उंदीर, घुशी, मुंगूस, सर्प, पाकोळ्या यांचें वसतिस्थान होऊन मनुष्यघातकहि बनतें. त्याचप्रमाणें समाजांत उत्पन्न होणारे दोष घालविण्याचा किंवा गुणांचा परिपोष करण्याचा प्रयत्न न केल्यास तो समाज परस्परविघातक होण्याचा संभव असतो; आणि आज प्रत्यक्ष होतहि आहे. त्यांतून भिन्न भिन्न संस्कृतींचा शेजार आणि परस्परस्पर्धा, किंबहुना धर्मांतर करविण्याची आणि राजकीय दृष्टीनें मतांतर करविण्याची लालसा यां-मुळें समाजाच्या चिंधड्या चिंधड्या बनविण्याची खटपट सुरू असते त्या.

वेळीं समाज संघटित ठेवण्याची जबाबदारी सुशिक्षितांवर फारच मोठ्या प्रमाणावर पडते. तशी ती आज पडलेली आहे. अशा वेळीं समाजाचे घटकच मोडून कोसळून पडतील किंवा त्याचे आधारच खिळखिळे होतील – आणि दुसरे घटक किंवा आधार मात्र तेवढ्याच काळांत आत्मसात् करणें अशक्य असेल – तर ह्यासारखी शोचनीय स्थिति दुसरी कोणतीच नाहीं. आपल्या सर्व शक्ति आपल्याच उपयोगी पडाव्या असें मनांत असेल तर आहेत त्यांचेंच पोषण करणें ( Consolidate ) अवश्य. अर्थात् चातुर्वर्ण्य टिकविणें हीच गोष्ट शक्य आणि इष्ट वाटते.

---

# विषयप्रवेश

**चातुर्वर्ण्य—शब्दार्थ, विषयप्रवेश, भिन्न मतें**

१. चातुर्वर्ण्य हा शब्द आपल्यांत इतका रूढ झाला आहे कीं, त्या शब्दाचे अर्थाविषयीं आपण क्वचितच विचार करतों. चातुर्वर्ण्य म्हणजे चार वर्ण इतकाच वास्तविक अर्थ आहे[1]. पण सामान्यतः ' चार वर्णांनीं युक्त समाज ' असा अर्थ आपण व्यवहारांत समजतों. तथापि चातुर्वर्ग्य आणि चातुर्वर्ण्य यांतील भेद आपण क्वचितच लक्षांत घेतों. श्रमविभागाचे तत्त्वावर कोणत्याहि समाजाचे चार वर्ग पाडतां येण्यासारखे असतात. पुरोहित, लढवय्ये, शेतकरी व कलाकुसरी आणि मजूर असे वर्ग प्रत्येक समाजांत असतातच. परंतु यांपैकीं कोणत्या वर्गांत शिरावयाचें हें ज्या त्या व्यक्तीच्या खुषीवर व बुद्धिसामर्थ्यावर अवलंबून असावें. परंतु चातुर्वर्ण्यांतील व्यक्ति जन्मतःच त्या त्या वर्गांत किंवा वर्णांत समाविष्ट होत असते. अर्थात् चातुर्वर्ग्य खरें पण जेथें तें आनुवंशिक तत्त्वानें बद्ध असतें, केवळ व्यक्तीच्या पराक्रमावर अवलंबून नसतें, त्या समाजास चातुर्वर्ण्यघटित समाज असें म्हणावयाचें. परंतु रा. सा. चापेकर यांच्या मतानें चातुर्वर्ण्य म्हणजे चार वर्णांचा व आश्रमांचा धर्म ( वैदिक निबंध. चातुर्वर्ण्य पा. ७० ). असाहि अर्थ कोशांत सांपडतो. असें हें चातुर्वर्ण्य अथवा चार वर्णांनीं युक्त असा समाज आर्यांत कधीं स्थापन झाला, त्याचा विकास कसकसा होत गेला, त्यांत कमी अधिक निर्बंध कोणते व कसे घालण्यांत आले, त्याचें पर्यवसान काय, तें टिकविणें योग्य होईल किंवा अयोग्य होईल — या सर्व गोष्टींचा विचार या निबंधांत करणें योग्य होईल. तथापि त्याची उत्पत्ति, स्वरूप, विकास आणि काळ एवढ्याच गोष्टींचा मुख्यतः येथें तूर्त विचार करण्याचें योजिलें आहे.

---

१ चत्वार एव वर्णाः चातुर्वर्ण्यम् असा हा समास सोडवून येथील तद्धित प्रत्यय स्वार्थी आहे असें शांकर व इतर भाष्यांत सांगितलें आहे. चार वर्णांचा भाव किंवा कर्म असा येथें अर्थ नाहीं.

त्याच्या भावी इष्टानिष्टतेसंबंधानें उपसंहारांत थोडें विवेचन व परिशिष्टांत कांहीं मतें दिलीं आहेत.

**कालविषयक भिन्न भिन्न मतें**

२ अ. आज जें चातुर्वर्ण्य आपणांत आढळून येतें त्याची उत्पत्ति कधीं झाली याविषयीं प्राचीन आणि अर्वाचीन तसेंच पाश्चात्य आणि पौरस्त्य विद्वान् यांच्यांत अत्यंत मतभेद दिसून येतो. ( १ ) वेद हे ईश्वराचें निश्वसित[1] अशी ज्यांची भावना आहे त्यांच्या दृष्टीनें 'वेदपूर्व' अशी कोणतीहि दुसरी वस्तु असूं शकणार नाहीं. त्यांच्या दृष्टीनें 'धाता यथापूर्वं अकल्पयत' या ऋचेप्रमाणें चातुर्वर्ण्य ब्रह्मदेवानें यथापूर्व यथाकालीं प्रत्येक युगचतुष्काचे प्रारंभीं किंवा योग्य कालीं उत्पन्न केलें. ( २ ) जवळ जवळ याच कल्पनेस अनुसरून 'चातुर्वर्ण्यं मया सृष्टम्.' असें भगवान् श्रीकृष्ण म्हणतात. ( ३ ) वेदांतील पुरुषसूक्तांत विराट् पुरुषाचें यज्ञकर्मीं चतुर्विधा विभजन झाल्याचें वर्णन असून त्या विराट् पुरुषाचें मुख हें ब्राह्मण, बाहु हे राजन्य, मांड्या ह्या वैश्य आणि पायांपासून शूद्र उत्पन्न झाले असें म्हटलें आहे. ( ४ ) बृहदारण्यकोपनिषदांत मूळ देवांतच ब्रह्मानें चातुर्वर्ण्य स्वतःचे पूर्णत्वासाठीं व वैभवासाठीं उत्पन्न केलें आणि तें चातुर्वर्ण्य सिद्ध झालें तेव्हां तो स्वयंपूर्ण झाला असें दर्शविलें आहे. ( ५ ) विकासवादी जगदुत्पत्तीबरोबर चातुर्वर्ण्योत्पत्ति झाली असें कबूल करणार नाहीं तरी त्या चातुर्वर्ण्याचीं बीजें मनुष्योत्पत्तीबरोबर उत्पन्न झालेलीं होतीं हें कबूल करील. भगवानांची उक्ति या दृष्टीनें अधिक सुगम होते. भगवद्वाक्यांतील कर्मणि प्रयोग तेंच दर्शवितो. ( ६ ) वैदिक वाङ्मय — मंत्र ब्राह्मण आरण सुद्धां — हें एकामागून एक मानवांनीं ( ऋषींनीं )च उत्पन्न केलें असें जे म्हणतात त्यांपैकीं कांहींच्या

---

१ वेद अपौरुषेय आहेत ही कल्पनाहि फार फार प्राचीन खुद्द शुक्ल यजुर्वेदांत आढळते. त्यांत "वेदोऽसि, येन त्वं वेद, देवेभ्यो वेदो अभवः । तेन मह्यं वेदो भूयाः" असें म्हटलें आहे. अर्थात् देवांनीं वेद केले अशी प्रथा तेव्हांपासून आहे. हे देव म्हणजे भूदेव जे ऋषी ते तर नव्हेत, असा फार तर प्रश्न राहील.

मतानें चातुर्वर्ण्य वेदपूर्वच स्थापित झालें होतें तर कांहींच्या मतें तें ऋग्वेदोत्तरकालीं स्थापित झालें आणि कांहींच्या मतें तें चातुर्वर्ण्य या स्वरूपांत वेदपूर्वकालीं झालें असलें तरी तें भारतीय युद्धाचे सुमारास पूर्णत्वास गेलें (नानासाो वैद्य) आणि कांहींच्या मतें तें महाभाष्यकार पतंजलि याचे सुमारास पूर्णत्वास गेलें (कै. राजवाडे) किंवा त्यास आजचें स्वरूप प्राप्त झालें. कित्येकांच्या मतानें यजुर्वेदकालीं तें पूर्णत्वास गेलें असलें (मॅक्डोनाल्ड आणि कीथ. वेदिक इंडेक्स् ऑफ् नेम्स् अँड् सब्जेक्टस्) तरी ऋग्वेदकालीं त्यास आनुवंशिक स्वरूप प्राप्त झालें होतें (कित्ता). वुइंटरनिट्झच्या मतानें तें अथर्ववेदकालीं पूर्णत्वास गेलें (हिस्टरि ऑफ् इंडियन् लिटरेचर्, पा. १२३ व १९८). नानासाो वैद्य यांच्या मतानें अथर्ववेदाचा संहिताकाल खि. पू. ३००० ते २५०० तर यजुर्वेदाचा ३१००; वुइंटरनिट्झच्या मतें वेदकाल खि. पू. २५० ते ५०० आणि पतंजलि खि. पू. २००. अर्थात् या एकंदर कालांत कित्येक शतकेंच काय पण कित्येक सहस्रकांचें अंतर आहे. रा सा. ना. गो. चापेकर यांच्या मतानें तें स्मृतिकालीन. तथापि ते एकदां स्मृतिकाल आणि वेदकाल एकच असें ध्वनित करतात तर एके ठिकाणीं तो वेदोत्तर असें म्हणतात.

२ आ. चातुर्वर्ण्याच्या उद्भवासंबंधानेंहि भिन्न भिन्न मतें आढळतात.

**चातुर्वर्ण्याच्या उद्भवासंबंधानें भिन्न भिन्न मतें**

मूळ एका अविभक्त समाजाचें जें विभजन होत गेलें त्यास पुढें चातुर्वर्ण्याचें स्वरूप प्राप्त झालें असें प्राचीन मत. याचे अगदीं उलट म्हणजे चार भिन्न भिन्न वंशांच्या व समाजांच्या एकीकरणाचा तो एक अभूतपूर्व प्रयत्न असें कै. राजवाडे आणि श्री. चापेकर यांचें मत आहे. (राजवाडे : राधामाधवविलासचंपू प्र. पा. १४०, १४१. रा. सा. चापेकर: वैदिक निबंध, चातुर्वर्ण्य, पा. ८४ पाहा). तिसरा पक्ष ज्ञानकोशकारांचा. त्यांच्या मतानें चातुर्वर्ण्य हा एकीकरणाचा तसाच पृथक्करणाचा (असे दोनहि) प्रयत्न होय. हें मत आम्हांस मान्य असलें तरी त्या पृथक्करणाचा व एकीकरणाचा काल 'वेदपूर्व' असें आमचें म्हणणें आहे.

कर्मभिर्वर्णतां गतम् ॥

वर्ण शब्दाच्या अर्थाविषयीं भिन्न भिन्न मतें.
कर्मभिर्वर्णतां गतम्

१. चातुर्वर्ण्य या शब्दांतील वर्ण शब्दाच्या अर्थाविषयींहि फार भिन्न अशीं मतें आढळतात. त्या शब्दार्थाच्या निर्णयावर हा वाद बव्हंशीं अवलंबून आहे. वर्ण म्हणजे मनुष्याच्या शरीराच्या कातडीचा रंग असा अर्थ कै. शं. पां. पंडित, कै. राजवाडे, श्री. नानासाहेब वैद्य, श्री. नाना पावगी आणि रा. सा. चापेकर करतात. असाच अर्थ कित्येक युरोपीय पंडित करतात. उलटपक्षीं वर्ण म्ह. निवड किंवा निवडलेला वर्ग असा अर्थ येथें केला आहे. वर्ण म्ह. पक्ष, संप्रदाय असा अर्थ शब्दकोशकार करतात. चातुर्वर्ण्याचा कातडीच्या रंगाशीं संबंध असावा कीं काय अशी शंका फार प्राचीन काळापासून आलेली दिसते. महाभारताच्या शांतिपर्वांतील १८८।१८९ अध्यायांत या वादाचा उगम दिसतो. त्यांत वर्ण म्ह. रंग असा पूर्वपक्ष करून तसा अर्थ नाहीं असा सिद्धांत स्थापिला आहे.

चातुर्वर्ण्याच्या उद्भवासंबंधानें आणखी एक प्रश्न

२. चातुर्वर्ण्याच्या उद्भवासंबंधानें आणखी एका गोष्टीचा विचार व निर्णय करणें अवश्य आहे. आर्य लोक मूळ अग्रस्थ कीं परस्थ ? आणि एकजात कीं मिश्र, असे प्रश्न युरोपीय पंडितांनीं उत्पन्न केलेले आहेत. आमच्याकडील बहुतेक विद्वानांनीं पाश्चात्य विद्वानांची कल्पना मान्य करून आर्य हे हिंदुस्थानाच्या बाहेरून आले व त्यांनीं हिंदुस्थान बाहुबलानें जिंकला असें ठरविलें आहे. त्या प्रश्नाबरोबरच हिंदुस्थानचे मूळचे लोक (अग्रस्थ) कोणते याचाहि निश्चय करावा लागतो. चातुर्वर्ण्याचे घटक कोणते हे ठरवितांना या प्रश्नाचा निर्णय करावाच लागतो. विशेषतः 'वर्ण' शब्दाचा 'रंग' असा अर्थ करणारे असें गृहीत धरतात कीं (१) आर्यांचा रंग गोरा. ते असेंहि आणखी गृहीत धरतात कीं, ते (२) नाकेले असून (३) अग्रस्थ लोक हे कृष्णवर्णाचे आणि नकटे किंवा बसक्या आणि चपट्या नाकाचे. या तीन गृहीत कृत्यांवर ते पुढें असें अनुमान बांधतात कीं, आज हिंदुस्थानांत जे मुख्य मुख्य शरीराच्या रंगाचे भेद दिसतात ते

कर्मभिर्वर्णतां गतम् ॥

१. चातुर्वर्ण्य या शब्दांतील वर्ण शब्दाच्या अर्थाविषयींहि फार भिन्न अशीं मतें आढळतात. त्या शब्दार्थाच्या निर्णयावर हा वाद बव्हंशीं अवलंबून आहे. वर्ण म्हणजे मनुष्याच्या शरीराच्या कातडीचा रंग असा अर्थ कै. शं. पां. पंडित, कै. राजवाडे, श्री. नानासाहेब वैद्य, श्री. नाना पावगी आणि रा. रा. चापेकर करतात. असाच अर्थ कित्येक युरोपीय पंडित करतात. उलटपक्षीं वर्ण म्ह. निवड किंवा निवडलेला वर्ग असा अर्थ येथें केला आहे. वर्ण म्ह. पक्ष, संप्रदाय असा अर्थ ज्ञानकोशकार करतात. चातुर्वर्ण्याचा कातडीच्या रंगाशीं संबंध असावा कीं काय अशी शंका फार प्राचीन काळापासून आलेली दिसते. महाभारताच्या शांतिपर्वांतील १८८।१८९ अध्यायांत या वादाचा उगम दिसतो. त्यांत वर्ण म्ह. रंग असा पूर्वपक्ष करून तसा अर्थ नाहीं असा सिद्धांत स्थापिला आहे.

वर्ण शब्दाच्या अर्थाविषयीं भिन्न भिन्न मतें. कर्मभिर्वर्णतां गतम्

२. चातुर्वर्ण्याच्या उद्भवासंबंधानें आपणांस एका गोष्टीचा विचार व निर्णय करणें अवश्य आहे. आर्य लोक मूळ अत्ररय कीं परस्य ? आणि एकजात कीं मिश्र, असे प्रश्न युरोपीय पंडितांनीं उत्पन्न केलेले आहेत. आमच्याकडील बहुतेक विद्वानांनीं पाश्चात्य विद्वानांची कल्पना मान्य करून आर्य हे हिंदुस्थानांत बाहेरून आले व त्यांनीं हिंदुस्थान बाहुबलानें जिंकला असें ठरविलें आहे. त्या प्रश्नाबरोबरच हिंदुस्थानचे मूळचे लोक ( अत्ररय ) कोणते याचाहि निश्चय करावा लागतो. चातुर्वर्ण्याचे घटक कोणते हे ठरवितांना या प्रश्नाचा निर्णय करावाच लागतो. विशेषतः 'वर्ण' शब्दाचा 'रंग' असा अर्थ करणारे असें गृहीत धरतात कीं (१) आर्यांचा रंग गौर. ते असेंहि आपणांस गृहीत धरतात कीं, ते (२) नाकेले असून (३) अत्ररय लोक हे कृष्णवर्णाचे आणि नकटे किंवा आखूड आणि चपट्या नाकाचे. या तीन गृहीत कृत्यांवर ते पुढें असें अनुमान बांधतात कीं, आज हिंदुस्थानांत जे मुख्य मुख्य शरीराच्या रंगाचे भेद दिसतात ते

चातुर्वर्ण्याच्या उद्भवासंबंधानें आपली एक प्रश्न

या परस्थ गौर आणि नाकेले असे आर्य आणि अप्रस्थ कृष्णवर्ण व नकटे किंवा चपटे नाकाचे लोक यांच्या संकरामुळे उत्पन्न झाले आहेत. या अप्रस्थ म्हणून यांनी ठरविलेल्या लोकांचे वैदिक नांव (४) 'दास किंवा दस्यु असेंहि त्यांनी गृहीत धरलें असून त्यानाच हल्लीं भिल्ल, कोळी वगैरे म्हणतात असें त्यांचें म्हणणें आहे (कै. शं. पां. पंडित वेदार्थयत्नांतील टीपा पाहा.). चातुर्वर्ण्यापैकीं शूद्र म्हणून जे म्हणतात ते या अप्रस्थ लोकांपैकींच (कै. राजवाडे, श्री. नानासो वैद्य, चापेकर, पावगी). वृत्र हा अप्रस्थ लोकांचा राजा. हिंदु हे आर्य व दास यांची संकर प्रजा (हिस्टरी ऑफ् संस्कृत लिटरेचर–वैद्य, पान ८६।८७). यांनाच द्रविड, असुर वगैरे नांवें पडलीं अशा ध्वन्यर्थ दिसतो. कारण द्रविड हे दक्षिणेंतून उत्तरेकडे वायव्य कोनापर्यंत पसरले होते व त्यांना आर्यांनीं जिंकून दक्षिणेकडे हकललें अशा त्यांचा निष्कर्ष आहे. चातुर्वर्ण्यापैकीं तीन वर्ण हे हिंदुस्थानाबाहेर एकत्र झाले त्यांत शूद्रांचा समावेश हिन्दुस्थानांत आल्यावर झाला असेंच वरील सर्व पंडित म्हणतात.वरील पंडित आणि नानासो पावगी यांमध्यें एक मतभेद आहे तो इतकाच कीं, त्रैवर्णिक हे हिन्दुस्थानांतलेच पण मूळचे पंजाब व गांधार म्हणजे सप्तसिंधु प्रांतांतले आणि त्यांतहि सरस्वती तीरावरले किंवा आर्यावर्तांतले (हिंदुस्थानांतले ?) राहणारे, परस्थ नव्हेत (वायव्येकडून आलेले नव्हेत). आर्य हिंदुस्थानाबाहेर कधीं नव्हते असें मात्र नव्हे. हिंदुस्थान (? पंजाब व गांधार किंवा आर्यावर्त) हें त्यांचें मूलस्थान असून हिंदुस्थानाबाहेर त्यांच्या वसाहती आर्तिक समुद्रापर्यंत पसरलेल्या होत्या. बंगालमधील 'ऋग्वेदिक इंडिया' पुस्तकाचे कर्ते अविनाशचंद्र दास यांचें म्हणणें असें कीं, आर्य हे मूळ चतुःसमुद्रपरिवेष्टित अशा आर्यावर्तांतील रहिवाशी होत. तेथें प्रथम हिमालय नव्हता. पुढें तो उद्भवला व त्यानंतर पूर्वसमुद्र, पश्चिमसमुद्र, हिमालय आणि विंध्य या त्या आर्यावर्ताच्या चतुःसीमा बसल्या. पणी, दास व दस्यु हे त्यांच्यांतलेच कृष्णवर्णाचे अधार्मिक लोक. आर्यांतील कांहीं बहिष्कृत लोकांनीं जगभर पसरून फिनिशिया (पणींनीं वसविलेला), साहिडया (द्रविडांपैकीं चोलांनीं व पणींनीं वस-

१ पण ऋग्वेदांत यदुवंशांना देखील दास म्हटलें आहे याची वाट काय ? (ऋ० १०–६२–१० पाहा.)

विलेला ), इजित ( द्रविडांपैकी पांड्यांनीं वसविलेला ), असीरिया ( असुरांनीं वसविलेला ), पार्थियन ( इराण ), आर्क्तिक महासागरांतील देश वगैरे ठिकाणीं आपल्या वसाहती वसविल्या वगैरे. डॉ. केतकर हे ज्ञानकोशांत म्हणतात कीं, आर्यांच्या अनेक टोळ्या हिंदुस्थानांत वायव्येकडून आल्या, त्यांत मंत्रवाङ्मय घेऊन आलेले वैदिक लोक हे अखेरचे. दास, दस्यु, असुर, पार्थियन लोक वगैरे आर्यांबरोबर आर्क्तिक मूलस्थानापासून होतेच. आर्यांच्या व त्यांच्या हाडमेष चकमकी होत असत; पण त्या चकमकी सांस्कृतिक लढ्याच्या स्वरूपाच्या होत्या; राजकीय किंवा वर्ण ( रंग ) विद्वेषाच्या स्वरूपाच्या नव्हत्या. दास, दस्यु हे काळे व आर्य गोरे. ही समजूत चुकीची. नानाशास्त्री वैद्य व कै. राजवाडे यांचे मतानें वेदांतून जें चातुर्वर्ण्य आहेसें वाटतें तें वास्तविक चातुर्वर्ण्य आहे. त्यांच्यांत रोटीबंद व बेटीबंद जन्मजात जाति नव्हत्या. मूळचें त्रैवर्ण्य ( हिंदुस्थानप्रवेशपूर्व ) केवळ भिन्न भिन्न धंद्यांमुळें-प्राचीन इराणी लोकांतल्याप्रमाणें-उत्पन्न झालेलें होतें व शूद्रांचा समावेश पंजाबांत झाला. अर्थात् त्यांत आनुवंशिकत्व किंवा अधरोत्तरता नव्हती! किंवा विवाहनिर्बंध नव्हते. तथापि पितृसावर्ण्य व जातींचीं बीजें (!) मूळापासून होतीं. ( हिस्टरी. पा. १०० ). पा. ११९ वर ते असेंहि विधान करतात कीं, ऋग्वेदकालांत जातिरूप (?) चातुर्वर्ण्य उत्पन्न झालें होतें ( " कास्ट् हॅड् ऑल्रेडि डेवलप्ड् अप् टु दि फोर चीफ् कास्ट्स् इन् दि ऋग्वेदिक् टाइम्स् ." ). 'मिश्रजातीहि उत्पन्न झाल्या होत्या असें वाजसनेयी संहितेवरून दिसतें असें जे मॅक्डोनाल्ड् म्हणतो तें चुकीचें आहे.' धंद्यावरून जाति पडल्या होत्या, धंदे अनेक उत्पन्न झाले होते, असें मात्र त्या संहितेवरून दिसतें ( ३०. २९ ).

कामोपभोगार्थ को होईना, अनुलोमविवाह चालू असल्यामुळें मुलाच्या जातीचा प्रश्न उत्पन्न झाला होता. प्रथम बापाचा ( पितृसावर्ण्य ) वर्ण लोक मुलाचा समजत असत (!). नंतर स्मृतिकालीं त्यांत कांहीं बदल होऊन इतर स्त्रीच्या मुलाला मधलीच जाति प्राप्त होई; त्यानंतर ती संतति मिश्र जातीची समजली जाऊं लागली; पुढें मातेचा वर्ण (मातृसावर्ण्य ) मुलांना प्राप्त झाला; तदनंतर भाष्यकालीं अनुलोमविवाह बंद झाले; अशी एकंदर प्रणालिका त्यांनीं दिली आहे. चातुर्वर्ण्याचा फिरून

पा. १६१ वर उल्लेख करून असें दर्शविलें आहे कीं, अथर्ववेदाच्या संहिता करणापर्यंत (ख्रि. पू. १००० ते २५००) मिश्र जाति अद्या उत्पन्न झाल्या नव्हत्या. म्हणून त्याचा उल्लेख अथर्ववेदांत नाहीं. मात्र ऋग्वेदकालींच शूद्रवर्णाचा समावेश होऊन तो वर्ग त्रैवर्णिकांच्या सेवेस सादर होता. आणि अद्या चार वर्णांचें मिळून राष्ट्र बनलें होतें. शायद, खरोखर जन्ममात्र जाति अद्या महाभाष्यकार पतंजलींचे सुमारास उत्पन्न झाल्या असें कै. राजवाडे यांनीं मत प्रदर्शित केलें आहे त्यास अनुसरूनच नानासाहेब यांनीं आपलें मत प्रदर्शित केलें आहे असें दिसतें. शरीरमापनशास्त्रांतील कपाल-मापन, लंब किंवा रुंद शीर्ष आणि नासिकालक्षणें — ( विशेषतः नासिका-कोण Nasal Index ) यांचाहि विचार ठिकठिकाणीं करतात आणि या यावरूनही रिस्ले यांचीं मतें त्यांना बहुतेक अंशानें मान्य आहेत असें दिसतें. या शास्त्रावरून — तें शास्त्र या स्वरूपास आलें नाहीं असें मानल्यास — पंजाबी आर्य हे खरे आर्य आणि महाराष्ट्रीय आर्य म्हणविणारे ते सर्व मिश्र आर्य असें ते मानतात. अर्थात्, मिश्र आर्यांत ब्राह्मणादि वर्ग आहेत आणि होऊं शकत असें अनुमान करणें भाग पडतें. याचे उलट श्री. राम-प्रसाद चाद यांचे पुस्तकांत प्रो. होमरशॅम् कॉक्स् किंवा प्रो. रिजवे हे हीं शीर्षमापन किंवा नासिकालक्षणें बहुशः परिस्थितिप्राप्त असतात, तीं वंशलक्षणें अशीं मान्य होण्यालायक नाहींत, असें समजतात. किंबहुना, मिश्र-विवाह देखील — आईबाप दोघेंहि एकाच परिस्थितींत जन्मलीं असल्यासुद्धां — नवीन वंश उत्पन्न करूं शकणार नाहींत असें ओमॅन्ले म्हणतात. ऐतिहासिक पद्धतीनें विचार करणारानें या शीर्षमापनशास्त्रावरून आपले सिद्धांत बनवूं नयेत असें त्यांनीं आपलें मत प्रदर्शित केलें आहे. कॉक्स् तर म्हणतो कीं, मानववंशशास्त्र शीर्षमापनशास्त्र अगदींच अविश्वसनीय मानतात.

अशीं हीं भिन्न भिन्न मतें आहेत व एकंदरींत प्रश्न मोठाच बिकट होऊन बसला आहे. प्रत्येक जण आपआपल्या परीनें विवेचन करतो; पण कोणीहि इतरांच्या विवेचनांतील गुणदोषचर्चा करीत बसत नाहीं किंवा ज्ञानकोशकारांखेरीज स्वतःच्या मतसमर्थनार्थ कोणी फारशीं प्रमाणें देण्याच्या भानगडींत पडले नाहींत. सामान्य वाचक तर या 'मदों उकरण्या'लायक वादासंबंधानें कांहीं पक्षपाति नाहीं किंवा त्यास फारसें अडलें नाहीं असें

समजून त्यापासून अलित राहण्याचा प्रयत्न करतो. या बाबतींतलें प्राचीन वाङ्मय बरेंच नष्ट झालें असल्यामुळें निर्विवाद निश्चय करणें अवघड असलें तरी अशक्य वाटत नाहीं. तथापि तो सर्वांस पटेल असा निर्वाळा कोण देऊं शकेल ? विद्वज्जनांपुढें दोनहि बाजू मांडून त्यांच्या स्वतंत्र निर्णयास मदत करण्याच्या विचारानें हा लेख यथामति लिहिला आहे.

## वर्ण म्हणजे रंग नव्हे

१. वर्ण शब्दाच्या अर्थाविषयीं किती भिन्न भिन्न मतें उत्पन्न झालेलीं आहेत याचें दिग्दर्शन मागील भागांत केलेंच आहे. हा प्रश्न अत्यंत महत्त्वाचा आहे. वर्ण शब्दाचे अर्थावर 'चातुर्वर्ण्य' शब्दाचा अर्थ अवलंबून आहे. वर्ण [ वर्ण् = रंगविणें या धातूपासून ] म्हणजे रंग हाच मूळ अर्थ असें बहुतेक विद्वान् गृहीत धरतात. परंतु वर्ण हा शब्द वृ = निवड करणें या धातूपासून उत्पन्न झालेला दिसतो. वर्ण म्हणजे निवडक किंवा निवडलेला, विभागलेला वर्ग. वर्ण म्हणजे धार्मिक मत, पक्ष किंवा संप्रदाय असा अर्थ ज्ञानकोशकारांनीं केला आहे ( बुद्धपूर्व जग--प्रस्तावनाखंड वि. २ पा. ४२ ) व त्याला वरेन या पर्शियन शब्दाचा मुख्यतः आधार घेतलेला आहे. तथापि तो अर्थ देखील वृ = पसंत किंवा निवड करणें या धातूपासूनच सिद्ध झालेला दिसतो.

२. वर्ण म्हणजे कातडीचा रंग नव्हे[१]. ज्ञानकोशकारांनीं 'बुद्धपूर्वजग' या विभागांत अर्य, आर्य आणि दास व दस्यु यांसंबंधाचीं सर्व वैदिक वचनें संगृहीत करून व मार्मिक चर्चा करून वर्ण म्ह. कातडीचा रंग नसून आर्य व दास यांजमधील भेद वर्णविद्वेषाच्या ( कलर प्रेजुडिस — colour prejudice ) स्वरूपाचा नसून संस्कृतिभेदाचा आहे असें सिद्ध केलें आहे. तथापि रा. सा. ना. गो. चापेकर यांनीं आपल्या 'चातुर्वर्ण्य'

---

१ ही गोष्ट मीं प्रथम स. १९२२ सालीं भा. इ. सं मंडळापुढें व नंतर त्या वर्षीच्या वसन्तोत्सवांत जनतेपुढें मांडिली. गेल्या आठ नऊ वर्षांच्या अभ्यासानें माझें अनुमान दृढ झालें व फिरून गतवर्षी ( १९३० ) मीं 'चातुर्वर्ण्य' वर त्या मंडळापुढें व आदितामि राजवाडे यांचे घरीं या विषयावर व्याख्यानें दिलीं त्यांत निश्चित स्वरूपानें हा विषय प्रतिपादन केला.

या विषयावरील औंध येथील वार्षिक व्याख्यानसत्रांत[1] रंग हाच वर्ण या शब्दाचा खरा अर्थ असें समजून विषयप्रतिपादन केलें आहे.

३. ब्राह्मणानां सितो वर्णः । क्षत्रियाणां तु लोहितः ॥
वैश्यानां पीतको वर्णः । शूद्राणां असितस्तथा ॥ महाभारत.

असें एक वचन महाभारतांत आढळतें. ब्राह्मण हा गौर, क्षत्रिय हा लाल, वैश्य हा पीत आणि शूद्र हा कृष्ण वर्णाचा असा या भारतीय वचनाचा सरळ अर्थ आहे. परंतु महाभारतांतील शांतिपर्वाच्या १८८।१८९ या अध्यायांत या वरील वचनाच्या किंवा तत्सदृश दुसऱ्या एखाद्या वचनाच्या आधारानें एक पूर्वपक्ष मांडून अशी एक शंका घेण्यांत आली आहे कीं, हें वर्णन जर खरें म्हणावें तर ब्राह्मणांत कृष्ण वर्णाचे आणि शूद्रांत गौर वर्णाचे लोक आढळतात हें कसें ? [भृगु-भारद्वाज संवाद]. याचे उत्तरांत वर्ण = कातडीचा रंग नव्हे, तो सत्वादि गुणांचा किंवा देहांतर्गत ज्योतीचा ( किंवा देहाबाहेरील वलयाचा ? ) रंग समजावा असा निर्णय दिला आहे[2]. या बाबतींत लक्षांत घेण्यासारखें एक वचन काठकसंहितेंत आढळतें. त्यांत वैश्य हा शुक्ल आणि राजन्य हा धूम्र वर्णाचा असा निर्देश आढळतो. कदाचित् पीत आणि गौर वर्ण सदृश आहेत अशी कल्पना करून भारतीय आणि काठकवचनांत वैश्यांचे बाबतींत तफावत नाहीं असें कोणी म्हणेल. परंतु धूम्र आणि लोहित या दोन वर्णांत सादृश्य समजणें अड जाईल. अर्थात्, वरील भारतीय वचन श्रुतिविरुद्ध म्हणून अमान्य करण्यासहि हरकत नाहीं. तथापि आमची कांहीं प्रमाणें पाहूं.

गौरत्वादयः ब्राह्मणस्य पुराकल्पदर्शनेन, अंधत्वेऽपि क्वचित् तदन्वयदर्शनेन, व्यंजका इति ज्ञानवि शब्दार्थान्तर्भूतत्वेन आश्रयंतीत्यर्थः । कैयट

---

१ हीं व्याख्यानें प्रतिनिधींनी स्वतंत्र पुस्तकरूपानें छापलीं आहेत. रा. चा. चापेकर यांनीहि आपले 'वैदिक निबंध' स्वतंत्र पुस्तकरूपानें छापले असून त्यांत या निबंधाचा समावेश केला आहे.

२ अलीकडील शास्त्रज्ञ असा वैयक्तिक उदाहरणांवरून निर्णय देणें चुकीचें समजतात. समाजाचा अभ्यासच त्यांत आढळून येणाऱ्या सरासरीवरून करावयाचा असतो. कारण वैयक्तिक उदाहरणें अपवाद किंवा natural selection च्या स्वरूपाचीं असतात. अपवादांनीं मूळ नियमाचीच उपपत्ति व व्यापकता मात्र सिद्ध होते.

असेंहि एक वचन या बाबतींत विचारांत घेण्यासारखें आढळून येतें. तात्पर्य, ब्राह्मण कदाचित् पूर्वकल्पांत गौर असतील, आज तसा क्वचित् आढळतो अशी स्थिति आहे. किंवा कदाचित् शुभ्रवर्ण हा यथाप्रमाणें आचारशुद्धतेचा द्योतक असेल. प्रत्येक वर्णानें आपआपल्या अंगावर भिन्न भिन्न रंगांचे कपडे वापरावे, असा जो निर्बंध महाभारतादि ग्रंथांतून व स्मृतींतून आढळतो, त्यास अनुसरून तर शंका येण्यासारखी आहे. कारण-चार वर्णांचे पोषाख अनुक्रमें शुक्ल, रक्त, पीत असेच आढळतात. महाभारतांत द्रोणाचा शुभ्र पोषाख आढळतो तो याच कारणानें. ऋग्वेदांत आर्यांच्या वर्णासंबंधाचे काय उल्लेख सांपडतात हें आतां प्रत्यक्षच पाहूं.

४. ( १ ) वसिष्ठः श्वित्यंचः ॥ ऋ. ७-३३-१

असें वर्णन आढळतें, तेंहि याच स्वरूपाचें दिसतें. या वचनाचा अर्थ 'गौर वर्णाचे' असा करण्यांत येतो ( मराठी आर्यांचे भिन्न भिन्न रंग भाषांतरें पाहा ). हें भाषांतर सायणाचार्यांस अनुसरून केलें आहे. सायणभाष्यांतहि अशाच स्वरूपाचा अर्थ केला आहे. आमच्या समजुतीनें 'श्वित्यंचः' म्हणजे तेजस्वी, ओजस्वी. कदाचित् शुभ्र काठाचें धोतर नेसलेले किंवा पांघरलेले असा अर्थ करणेंहि सयुक्तिक दिसतें. 'गौर वर्णाचे' असा अर्थ करतांना अंच् शब्दाचा अर्थ ओढून ताणून करावा लागतो किंवा तो शब्द सोडून द्यावा लागतो. श्वेत वस्त्रानें गमन ( अंच ) करणारे. अंच्—अंचल—वस्त्र असाहि अर्थ आहे. हा पुढील संस्कृत वाङ्मयांतील अर्थ इष्ट वाटतो. याचे उलट

( २ ) ( कण्वः ) श्यावः ॥ ऋ. १०. ३१. ११

असें वर्णन ऋग्वेदांत आढळतें. या ठिकाणीं श्यावः=काळा. अर्थात् कण्व हा खास काळ्या वर्णाचा आर्य आहे असें आढळून येतें. येथें श्री. चित्रावशास्त्री यांनीं 'कृष्ण वस्त्रपरिधान केलेला' असा अर्थ केला आहे. तो उघड चुकीचा असून आर्य गौर या पूर्वग्रहामुळें केलेला दिसतो. येथील 'श्याव' हें स्वरूपवर्णन आहे. यालाच फिरून द्वितीयार्धांत 'कृष्ण' असें म्हटलें आहे. याशिवाय पहिल्या मंडलांत श्याव नांवाचा दुसरा एक ऋषि आढळतो. तो वर्णानें तसाच नांवानेंहि 'श्याव' आहे. श्याव म्हणजे सावळा असा अर्थ असावा असें वाटतें. पण ऋ. १०.३१ प्रमाणेंच पहिल्या मंडलांतील ११७ व्या सूक्तांत

(३) श्याव हा कृष्ण म्हणजे रंगानें कृष्ण (ऋ. १.११७.८) असा वर्णिलेला आहे व

युवं श्यावाय रुशतीम् अदत्तम् (किंवा)

'त्या काळ्या रंगाच्या श्यावाला गोऱ्या (शुक्र) रंगाची मुलगी तुम्हीं दिलीत' असें अश्विनांचें वर्णन केलें आहे. तेथेंहि फिरून कृष्णाच्या कृष्ण-वर्णाचा उल्लेख केलेला आहे. उ. (४) वंदन हा सुवर्ण गौर वर्णाचा होता. ऋ. १.११६.११. (५) कुत्स व इंद्र रूपानें एकसारखे (म्हणजे हरिपीत किंवा शुक्र). याशिवाय दुसऱ्या रंगांचीं वर्णनेंहि ऋग्वेदांत आढळतात. यावरून कोणा तरी मनुष्याच्या रंगावरून देवाचे रंग व रूप ठरविलें असाच अर्थ होतो (Man is the image of God). वास्तविक God was assumed to be man in face and features. कारण पाहिला आहे कोणीं !

अर्थात् शाळून सारे आर्य केवळ गौरवर्णाचे ही मूळ कल्पना चुकीची व अज्ञानमूलक हें स्पष्ट. किंबहुना, आर्य हे स्पष्ट गौर वर्णाचे असें स्पष्ट व प्रत्यक्ष दाखविणारें एकहि वचन वैदिक वाङ्मयांत (संहितेंत) नाहीं असें म्हटल्यास त्यांत बिलकुल अतिशयोक्ति नाही. जीं कांहीं वचनें आढळतात त्यांवरून केवळ अनुमानानें ठरवावयाचें कीं, आर्य हा गौर असावा. परंतु हें अनुमान विवेचक बुद्धीस पटण्यासारखें नाहीं. किंबहुना, ज्ञानकोश-कार म्हणतात त्याप्रमाणें आपल्यास 'गौर' म्हणून घेण्यांत हिंदी आर्यांना एक प्रकारचा मोठेपणा वाटला आणि प्रमाणाची अपेक्षा न धरतां त्यांनीं आपण गौर असें ठरविलें किंवा म्हणवून घेतलें. ज्या वचनावरून आर्यांना गौर असें अनुमानानें ठरविण्यांत येतें त्या वचनांत आर्यशत्रु जे दास, दस्यु, राक्षस, असुर वगैरे यांस कृष्ण, कृष्णयोनि, कृष्णगर्भ, कृष्णत्वक् असें म्हटलेलें आढळतें. परंतु हे शब्द कोणत्याहि शत्रुस्थानीं असलेल्या मनुष्यास लावलेले आढळतात. उदाहरणार्थ, आर्यांपैकींच जे पौरलोक त्यांनाहि ते शत्रुस्थानीं असतांना कृष्ण हा किंवा त्याअर्थी मृध्रवाक् शब्द लावलेला आहे. अर्थात्, कृष्ण किंवा तद्वाचक शब्दांचा अर्थ अलंकारिक रीतीनें घ्यावा लागतो. कृष्ण म्हणजे प्रत्यक्ष काळ्या कातडीचा असा अर्थ नसून काळ्या अंतःकरणाचा असा अर्थ आहे. मूळ हे

शब्द इंद्रशत्रु जो वृत्र किंवा मेघ त्याचे रंगावरून कविकल्पनेनें निघालेले ! वृत्र या शब्दाचा अर्थ एक विशिष्ट व्यक्ति, एक विशिष्ट व्यक्तिवाचक मेघ असावा असें प्रथमतः वाटतें. परंतु वास्तविक 'सामान्य काळ्या रंगाचा मेघ'. असाच त्याचा अर्थ दिसून येतो आणि मागाहून कोणताहि शत्रु अशा सामान्य अर्थी तो शब्द बनलेला दिसतो. अर्थात् त्यावरून शत्रूच्या रंगाचें प्रत्यक्ष वर्णन अनुमानितां येणार नाहीं. क्षणभर अनुमानितां येतें असें म्हटलें तरी त्यावरून शत्रूला कृष्ण असें म्हणणारा स्वतः कृष्णेतर अशा गौर, रक्त, पीत अशा कोणत्याहि वर्णाचा असू शकेल हें उघड आहे. परंतु प्रत्यक्ष कृष्णवर्णाचें आर्यांचें वर्णन आढळून येत असल्यावर हें अनुमान क्षणभरहि टिकूं शकत नाहीं. शिवाय आर्यांचे भिन्नभिन्न रंग होते आणि आर्यशत्रूंचे रंगहि आर्यांप्रमाणेंच होते असें आम्ही पुढें दाखविणार आहों. अर्थात् कोणत्याहि दृष्टीनें पाहिलें तरी प्रत्यक्ष वा अनुमानप्रमाणानें आर्य हा गौर असें ठरत नाहीं. प्राचीन पर्शियन किंवा इराणी वाङ्मयांत देखील अशाच अलंकारिक अर्थानें हा शब्द वापरण्यांत आला आहे. उदाहरणार्थ प्रत्यक्षच पाहा.

इन् दि गाथा उश्तवैति झरतुष्ट्र सेज्: १२ दॅट् आय् वुइल् आस्क् दी, टेल् मी इट् राइट् दाऊ लिव्हिंग गॉड् हू इज् दी रिलिजस् मॅन् अँड् हू इज् दी इंपायस् आफ्टर् हूम् आय् वुइश् टु इन्क्वायर् व्हिच् हूम् ऑफ् देम् इज दी ब्लॅक् स्पिरिट् अँड् व्हिच् हूम् दी ब्राइट् वन् ? इज् इट् नॉट् राइट् टु कन्सिडर् दी इंपायस् मॅन् हू अटॅक्स् मी ऑर् दी ट्वी ए ब्लॅक् वन् ? (जाड टाईप आमचा): याचा अर्थ असा कीं, हे झरतुष्ट्रा, हे प्रत्यक्ष जिवंत देवा, कोणाला धार्मिक समजावें आणि कोणाला अधार्मिक (किंवा देवनिंदक) समजावें तें मला सांग. तें समजून घेण्याची माझी इच्छा आहे. त्यांत कृष्णात्मा (दुरात्मा) कोण आणि श्वेतात्मा (पुण्यात्मा) कोण ? जो अधार्मिक दुष्ट तुमचेवर किंवा मजवर धावून येतो तो कृष्णात्मा (दुरात्मा)च नव्हे काय ? सारांश, दुरात्मा, देवनिंदक, देवशत्रु तो कृष्ण किंवा कृष्णगर्भ किंवा कृष्णयोनि होय. तात्पर्य कृष्ण, कृष्णयोनि इत्यादि शब्दांनी बिचकून जाण्याचें कारण नाहीं. किंवा त्या शब्दांचा उत्तानार्थच घेऊन चालणार नाहीं. उत्तानार्थ घेऊनच भृगु-भार्गव-संवादांतला पूर्वपक्ष करण्यांत

आला व तो उच्चारार्थ खरा नाहीं असा सिद्धांत निश्चित करण्यांत आला. परंतु पूर्वपरंपरागत निर्णय चुकीचे मानून स्वबुद्धयनुसार नवीन निर्णय करण्याचें ठरवून आमच्येकडील बहुतेक मोठमोठ्या विद्वानांनीं महाभारतांत सिद्धांत अमान्य ठरविला आणि पाश्चात्यांचा चुकीचा सिद्धांत मान्य ठरविला. त्याचा परिणाम असा झाला आहे कीं, सामान्य वाचकांचे मनांत तो पूर्वग्रह बनून गेला असून त्याचे उलट अगदीं साधी आणि सरळ गोष्ट मनांत बिंबवायास बरेच श्रम घ्यावे लागतात. आर्य हे गौर वर्णाचे असा आग्रह धरून के. राजवाडे, पंडित व श्री. चिंतामणराव वैद्य व नानाराव पावगी वगैरे मंडळींनीं आर्यांत आज दिसून येणारा कृष्णवर्ण कृष्णवर्णाच्या येथल्या मूळ प्रजेशीं संकर होऊन उत्पन्न झाला अशी कल्पना रूढविली आणि ती आज जवळ जवळ सर्वमान्य व रूढ होऊन बसली. वास्तविक त्यांच्या मनांत अनेक शंकांचे काहूर उठावयास पाहिजे होतें; पण तें उठलें नाहीं. के. राजारामशास्त्री भागवत यांनीं कृष्णवर्णाचा कण्व ऋग्वेदाच्या दहाव्या मंडळांत आढळतो असें स्पष्ट दाखविलें तरी त्या गोष्टीचा परिणाम नवीन सुशिक्षितांवर झाला नाहीं. वरील गाथा उरलवैतीमधील वचन श्री. अविनाशचंद्र दास यांनीं आपल्या 'ऋग्वेदिक इंडिया' पुस्तकांत दिलें आहे तरी त्याकडे दुर्लक्षच करण्यांत येत आहे. असो. दास किंवा दस्यु हे अनार्य समजणें अगदींच चुकीचें आहे. हे शब्द फार प्राचीन आहेत. हे शब्द इराणी वाङ्मयांतच काय पण खाल्डियन् आणि तदुत्तर ज्यू वाङ्मयांत आढळतात आणि इराणाच्या उत्तरेस असलेला 'दही' किंवा 'दसी' प्रांत हेंच दर्शवितो कीं, दास किंवा दस्यु केवळ हिंदुस्थानांतच नव्हते. देव आणि आर्य जर मूळ आर्क्टिक द्वीपांतले व हिंडत हिंडत इकडे आले असें मानलें तर देवांशीं व आर्यांशीं लढत राहणारे असुर, दास, दस्यु वगैरे लोकहि त्यांजबरोबर हिंडत हिंडत आले असें मानावें लागेल. अर्थात्, एककालीन आणि एकस्थलीन असलेले हे दोन लोक रंगानें भिन्न कां असावे ही देखील शंका या लोकांना आलेली दिसत नाहीं. आर्य हे काकेशस् किंवा श्वेत पर्वतावरून हिंदुस्थानच्या वायव्येकडून आले आणि दास किंवा दस्यु त्यांना फक्त हिंदुस्थानांत भेटले आणि दासांना जिंकून त्यांच्या स्त्रिया यांनीं केल्या व त्यांचीच संकर प्रजा आज हिंदुस्थानांत

आढळते ही पाश्चात्य कल्पना मायाने गळ चाटावा त्याप्रमाणें त्यांनीं बिन-दिक्कत ग्रहण केली, आत्मसात् केली आणि वाढविलीहि. क्षणभर असें मानलें कीं, दासींसंकरामुळें आर्यांत कृष्णवर्ण आला, पण शूद्रांत गौरवर्ण, वैश्यांत पीतवर्ण आणि क्षत्रियांत लोहितवर्ण कसे उत्पन्न झाले? का कृष्ण दासांशीं संकर झाल्यामुळें असे भिन्न भिन्न वर्ण उत्पन्न झाल्याचा कोठें दाखला आढळतो आहे? असो.

## शुक्ल आणि कृष्ण या शब्दांचे परंपरागत आणखी अर्थ

अपां रूपं मनसो अयस्य यजुषश्च ॥ जै० उ० १।२५।९

कृष्ण शब्दाचा एक अलंकारिक अर्थ दुरात्मा, दुष्ट बुद्धीचा, अधार्मिक, देवांशीं दुस्मत घेणारा (देवनिंदक) किंवा आर्यांवर हल्ला करणारा असा अर्थ वर दिला आहे. परंतु आणखीहि त्या शब्दाचे दुसरे अर्थ विचारांत घेण्यासारखे आहेत. प्राचीन परंपरा या बाबतींत समजून घेणें अवश्य आहे. वैदिक कालाचे प्राचीन आणि अर्वाचीन असे दोन भाग साह-जिकच पडतात. निदान यजुर्वेदाच्या कृष्ण आणि शुक्ल या संहितांत एक जुनी आणि एक नवी आहे ही गोष्ट सर्वांच्या परिचयाची आहे. याज्ञ-वल्क्यानें तैत्तिरीय संहिता टाकून वाजसनेयी संहिता पुरस्कारिली, त्यामुळें पूर्वीच्या संहितेला कृष्ण आणि नव्या संहितेला शुक्ल हें नांव पडलें आहे. वेदभाषांतरकार ग्रिफिथ् यानें अशी कल्पना केली आहे कीं, वेद आणि ब्राह्मण हे एकत्र केल्यामुळें जी एक निष्कारण 'गुंतागुंत' केलेली आढळते त्यामुळें तैत्तिरीय संहितेस कृष्ण हें नांव पडलें. परंतु ही कल्पना स्वकपोलकल्पित व चुकीची आहे (शुक्ल यजुर्वेदाच्या भाषांतराची प्रस्ता-वना पाहा.). वरील उद्धृत केलेल्या ब्राह्मणांत या यजूच्या कृष्णत्वाबरोबर मनाच्या कृष्णत्वाचा उल्लेख केलेला आहे तो विशेषतः मननीय असून येथें प्रत्यक्ष विवक्षितच आहे. कृष्ण या शब्दाचा अर्थ जुना, शिळा असाहि आहे. तो अर्थ ग्रिफिथ् व नानासाो वैद्य या दोघानाहि मान्य आहेच. आज देखील असा अर्थ ब्रह्मदेशांत करण्यांत येतो. ब्रह्मदेशांत कांहीं ब्राह्मण बऱ्याच प्राचीन काळीं जाऊन राहिले आहेत, तसेंच अलीकडे ब्रह्म-देश इंग्रजांनीं घेतल्यानंतर गेले आहेत. यांपैकीं प्राचीनांस कृष्ण आणि अर्वाचीनांस शुक्ल किंवा गौर ब्राह्मण म्हणण्यांत येतें (ज्ञानकोश, प्रस्ता-

सनातंद भाग १ ला पृ. १६४). सुमारें चाळीस वर्षांपूर्वी सिंध-नन्दाच्या हातचा चहा घेतल्यावरून बेकायदेशीर ब्राह्मण आणि त्यांचे संबंधी यांजवर एक बहिष्कारप्रकरण उपस्थित झालें होतें. त्या वेळीं जुन्या पंथांनें अर्थात् शुद्ध मार्गानें चालणारे ते शुक्ल ब्राह्मण आणि जुन्या पंथाला तिरस्कारणारे व नवीन अपरा, अधार्मिक व अशुद्ध संप्रदाय पाळणारे ते कृष्ण ब्राह्मण असा भेद करण्यांत आला होता. यावरून कृष्ण म्हणजे (१) जुना, प्राचीन; (२) अशुद्ध, अधार्मिक आणि शुद्ध म्हणजे नवा, अर्वाचीन; किंवा (३) शुद्ध धार्मिक, असे अर्थ प्रचारांत दिसतात. कृष्ण म्ह. इनॉरेशियस् अँकर किंवा अधार्मिक कृत्य असा अर्थ के. आपटे यांचे कोशांत दिला आहे तो याच स्वरूपाचा आहे. श्रीमद्भगवद्गीतेंत 'शुक्लकृष्णे गती ह्येते जगतः शाश्वते मते', 'एकया यात्यनावृत्तिमन्ययावर्तते पुनः ॥' ८.२६ असे दोन शुक्ल व कृष्ण मार्ग वर्णिलेले आहेत. वेजयंती कोशांत

कृष्णं छीसाच लोहेषु कृष्णो नीले नले काशौ ।
शूद्रे काके रिके व्याधे ध्वान्तपक्षेऽर्जुने हरौ ॥

असे कृष्ण शब्दाचे अर्थ दिले आहेत. त्यांत (१) कृष्ण म्ह. पाप (अघ); (२) कृष्णपक्ष (पौर्णिमेनंतरचा पंधरवडा); (३) शूद्र; (४) कलि असे आणखी अलंकारिक अर्थ दिले असून शिसें, लोखंड, नीळ, नल, काक, रिक, व्याध आणि अर्जुन यांस त्यांचे रंगांवरून कृष्ण म्हणतात असें दर्शविलें आहे. शूद्राला केवळ रंगावरून तसें म्हटलेलें नाहीं हें येथवर केलेल्या विवरणावरून कोणाच्याहि लक्षांत येईल. सारांश कृष्ण-शत्रु, पापी, अधार्मिक, दुरात्मे, देवनिंदक, आर्यांवर हल्ला करणारे, कृष्ण-हृदयाचे, प्राचीन, दुष्ट, शूद्र, अंधकारयुक्त, पाप, पापयुक्त पक्ष, पापयुक्त युग असे अर्थ आहेत व यांपैकीं योग्य असा कोणताहि अर्थ घेण्याजोगता असून तो दास, दस्यु, राक्षस, असुर वगैरे लोकांस लावलेला आहे. या उलट शुक्ल किंवा सूर्य शब्दाचे अर्थ घ्यावयाचे. कृष्ण या शब्दाचा आणखी एक अर्थ म्हणजे अज्ञानी असा वाटतो. सूर्यत्वक् शब्दाचा असाच कृष्णत्वक् या शब्दांचे उलट अलंकारिक अर्थ घेतला पाहिजे. इंद्रानें अपालेला सूर्य-

रुक् केली ( ऋ. १. ८१ ) म्हणजे ज्ञानी आणि तेजोयुक्त केली असाच अर्थ केला पाहिजे. ती वर्णानें काळी असून गोरी* केली असा अर्थ करतां येत नाहीं. रुच् शब्दावरील ज्ञानकोशांतील टिपण पाहा–पा. २५३, प्रस्तावनाखंड भाग ३ रा.

येथवर वर्ण शब्दाचे अनेकार्थ कसे होऊं शकतात, त्यांतील रंग हा शब्द लोकांना लावतांना कसा अभिप्रेत नाहीं, शुक्ल व कृष्ण या शब्दांचे अनेक अर्थ कसे होतात आणि ते शब्द वेदांत कोणत्या अर्थानें उपयोगिले आहेत, यांसंबंधीं उलगडा केला आहे. आतां आर्यांच्या व आर्यशत्रूंच्या शारीरिक रंगाविषयीं आणखी काय वेदांत आढळतें तें पाहूं.

वैदिक आर्य केवळ गौर किंवा त्यांचे शत्रु केवळ कृष्ण नव्हत.

## दोघांचें वर्णसाम्य

( १ ) उत कण्वं नृषदः पुत्रमाहुः उत श्यावः धनमादत्त वाजी।
प्र कृष्णाय रुशदपिन्वतोधर्ऋतमत्र न किरस्मा अपीपेत् ॥

ऋ. १०.३१.११

यांत नृषदपुत्र कण्व हा श्याव किंवा कृष्ण म्हणजे वर्णानें काळा असून त्याला अग्नीपासून रुशद् म्हणजे तेजस्वी रूप ( गौरत्व ) प्राप्त झालें असें वर्णिलें आहे. यांत 'काळा रंग धारण केला' अशा अर्थाचे शब्द मुळींच नसल्यामुळें तसें भाषांतर करणें अगदींच चुकीचें आणि गैरसमज उत्पन्न करणारें होईल. तें आर्य केवळ गौर या पूर्वग्रहामुळें केलेलें दिसतें. श्वित्यंचः वसिष्ठाः। या वचनावरून वसिष्ठसुद्धां गौर ठरत नाहींत; मग सर्व आर्य गौर कोठून ठरावयाला? काळ्या रंगाच्या मनुष्याला गोऱ्या रंगाचा बनविणें हें गाढवाला घोडा बनविण्याइतकेंच दुरापास्त आहे. अर्थात् येथें केवळ विरोधाभास अलंकार साधला आहे. कृष्णवर्णाच्या कण्वाला अग्नीनें तेजस्वी रूप किंवा(?) ज्ञान दिलें इतकाच अर्थ. ऋ. १.११७.८ यांतहि या कृष्णवर्ण-ऋषीचा उल्लेख असून शिवाय श्यावाला रुशती दिली किंवा दुसऱ्या एका कृष्णवर्णीय ऋषीला गौरवर्णाची मुलगी अश्वीनीं दिली अशी त्यांत अश्वींची स्तुति केली आहे

( २ ) पिशंगरूपः सुभरो वयोधाः श्रुष्टी वीरो जायते देवकामः॥ ऋ.

२।३।९. यांत देवकाम म्हणजे एक आर्य ऋषि आपल्याला 'पिशंगरूपाचा' वीर पुत्र मागत आहे. पिशंगरूपाचा म्हणजे तांबुस, किंवा तांबुस व पीत, किंवा कांहींसा बभ्रु किंवा तपकिरी रंगाचा. यावरून हा रंग आर्यांना प्रिय होता असा उघड अर्थ होतो. परंतु मौज अशी कीं, पिशाचांचा व राक्षसांचाहि तोच रंग होता आणि देवांचाहि तोच (कुत्साबाबतचा) होता. पाहा :

(३) पिशंगभृष्टिमंभृणं पिशाचिमिंद्र संमृण। सर्वं रक्षो निबर्हय ॥ ऋ. १-१३३-५, यांत 'पिशाच' लोकांना ठार करावें, राक्षसांना निपटून काढावें अशी प्रार्थना असून हे पिशाची किंवा राक्षस पिशंगभृष्टि किंवा पिशंगवर्णाचे होते असें वर्णन आहे. वरील ऋचेंत हा रंग आर्यांनाहि मान्य होता असें दिसून आलें तर या ऋचेंत तो पिशाचांचा किंवा राक्षसांचा रंग होता असें दिसतें. एवंच देव, आर्य आणि त्यांचे शत्रु जे पिशाच, राक्षस वगैरे या सर्वांच्या शरिराचे रंग सारखेच होते असें आढळून येतें.

(४) नृचक्षा रक्षः परिपश्य विक्षु तस्य त्रीणि प्रतिशृणीह्यग्रा।
तस्याग्ने पृष्टीर्हरसा शृणीहि त्रेधा मूलं यातुधानस्य वृश्च ॥

ऋ. १०-८७-१०

यांत विशांमध्यें राक्षस व त्यांचे पृष्टी म्हणजे पाठीराखे बसले असल्यानें वर्णन आहे ( चित्राव भाषांतर पाहा. ) व त्या राक्षसांचा व त्यांच्या पाठीराख्यांचा दोघांचा समूळ आणि समग्र नाश कर अशी नृचक्ष, म्हणजे मानवांत खरा कोण, खोटा कोण; आर्य कोण, अनार्य कोण हें ओळखूं शकणारा देव जो अग्नि त्याची प्रार्थना केली आहे. यांत राक्षसांची तीन मुळें आणि तीन अग्रें ( शिरें ) असल्याचें दर्शविलें आहे[1]. विशांमध्यें राक्षस बसले असल्यास ते अग्नीनें ओळखावे व त्यांचा संहार करावा अशी प्रार्थना

१ या ऋचेचा दुसरा एक अर्थ राक्षस-रोग या अर्थी होण्यासारखा आहे असा मला शंका आहे. पण त्याचा विचार येथें नको. 'इन्द्राद्वा बाधितो विशः' आर्यांचे विशांना राक्षसांपासून त्रास होत असल्याचें किंवा राक्षस, असुर यांच्या संबंधामुळें त्यांच्यांतहि संस्कृति बिघडूं लागल्याचीं चिन्हें दिसूं लागल्याचें वर्णन वेदांतून व पुराणांतून पुष्कळ आहे.

कां करावी ? ते जर भिन्न रंगांच्या कातडीचे असतील तर कोणताहि मानव, फारबहुना एखादें पोरहि, त्यांस ओळखूं शकेल आणि शूर आर्य त्यांचा तडाख्यानें विध्वंस करील. पण ते अभिन्न ओळखूं शकतो असो येथील कल्पना दोघांचा सम वर्ण असेल तरच शक्य आहे. अर्थात् आर्य आणि राक्षस यांचा शारीरिक वर्ण एकच होता ही गोष्ट निःसंशय दिसते. पिशाचि व राक्षस आणि आर्य यांचा शारीरिक वर्ण एकच होता, असें मागील ऋचांवरून जें अनुमान केलें तें या ऋचेनें बळकट झालें. विशेषतः पिशांचा व राक्षसांचा वर्ण एक असें यांत ठरतें. कारण पिशांमध्यें राक्षस व त्यांचे पाठीराखे ( पिश )वसलेले आहेत. एवंच पिशाच, राक्षस, यातुधान, चैद्य आणि देवकाम आर्य हे सर्व एकाच वर्णाचे असल्यामुळें आर्य कोण आणि राक्षस कोण याचें आकलन मानव करूं शकत नाहीं; देवच करूं जाणे ! याच अर्थाच्या आणखी ऋचा पाहा :

( ५ ) विजानीहि आर्यान् ये च दस्यवः बर्हिष्मते रंधय शासदव्रतान् ॥ ऋ. १.५१.८

अशी जी इंद्राची प्रार्थना केली आहे तिचें रहस्य हेंच. आर्य आणि दास यांचाहि वर्ण एकच असला पाहिजे. पिशंग, कृष्ण, गौर, सुवर्ण हे जसे आर्यांचे तसेच दस्यूंचेहि वर्ण व म्हणून त्यांमध्यें प्रपंच करावयास देवाची प्रार्थना करावी लागते. बर्हिष्मत् असा जो आर्य त्याचे अंमलाखालीं अव्रत अशा दस्यूंना आण अशी अखेर प्रार्थना केलेली आहे.

( ६ ) न यो रर आर्यं नाम दस्यवे ॥ ऋ. १०.४९.३

(इंद्रानें) आर्यांचें (आर्य हें) नांव दस्यूला दिलें नाहीं. अर्थात् आर्य आणि दस्यु वर्णानें एक असला तरी दुसऱ्या कशानें तरी भिन्न होता[१]. वरील ऋचेंत त्या भिन्नपणाचें एक स्वरूप सांगितलें आहे. तें असें कीं, आर्य हा बर्हिष्मत् आहे. बर्हिष्मत् म्हणजे दर्भवान्. आर्यांला यज्ञप्रसंगीं दर्भ लागत. कारण आर्यांचे देव दर्भासनावर बसत. अर्थात् देवांसाठीं दर्भासनें घालून यज्ञ करणारा तो आर्य म्हणविला जाई आणि तसें न करणारा तो

१ याचें विवेचन पुढें येणार आहे.

दास, दस्यु, असुर, राक्षस वगैरे म्हटलां जाई. असा हा आर्य आणि दास यांमधील भेद अनेक ठिकाणीं दर्शविलेला आढळतो. तो भेद खालील ऋचेंत 'वर्ण' या स्वरूपांत आढळतो. त्याच ऋचेवरून दास आणि आर्य यांमधील भेद व अधरोत्तरताहि दिसून येते.

( ७ ) हत्वी दस्यून्प्रार्यं वर्णं आवत् ॥ ऋ. ३.३४.९

( ७ अ ) यो दासं वर्णं अधरं गुहाकः ॥ ऋ. २.१२.४

अर्थ:-दासांना मारून (कमी करून)आर्यांचा वर्ण विशेष संरक्षणक्षम केला.

अर्थ:-ज्या ( इंद्रा ) नें दास वर्णाला अधर ( ठरवून ) त्यासाठीं गुहा केली किंवा अधर अशा दासवर्णांकरितां गुहा केली.

पहिल्या ऋचेंत दासांना मारल्याचा उल्लेख वाटतो. किंबहुना 'दस्युहत्येकरितां इंद्र जन्म घेतो' असेंहि म्हटलेलें आढळतें; परंतु 'प्र + आवत्' याचा अर्थ काय ? पुढें ऋचा ( १३ ) यांत सांगितल्याप्रमाणें शत्रु मारावयाचा याचा अर्थ शत्रु कमी करावयाचा व मित्रसंख्या वाढवावयाची किंवा शत्रूचा मित्र करावयाचा, दासाचा आर्य करावयाचा असा असून 'विश्वं आर्यं कृणुहि' या प्रार्थनेंत दर्शविल्याप्रमाणें सर्व लोक आर्य करावयाचे असा उद्देश आहे. याच दृष्टीनें ७ अ याचाहि अर्थ केला पाहिजे. सायणांनीं येथें आर्य म्हणजे 'उत्तम वर्ण त्रैवर्णिक' असा जो अर्थ केला आहे तोच यथोचित आहे. तो मूरसाहेबाच्या पट्टी नये यांत नवल नाहीं. तो त्यांच्या चष्म्याचा दोष होय. आर्य शब्दांत सायण त्रैवर्णिकांचा समावेश होतो असें समजतात, तेंहि बरोबरच आहे. ( शतपथ ब्राह्मणाच्या कण्वशाखा अध्वरकांडांत त्रैवर्णिकच यज्ञिय आहेत असें म्हटलें आहे, त्यांत तर बिलकुलच चूक नाहीं. सायण केवळ आपल्या काळच्या समजुतीनुसार अर्थ करतात हे वितर्क सर्व तितकेंच मूरसाहेबाचा दृष्टिदोषहि खरा ).

या ऋचेंतील पहिले तीन चरण असे आहेत—

सनात् अश्वाँ उत सूर्यं सनात् इंद्रः सनात् पुरुभोजसं गाम् ॥
हिरण्ययं उत भोगं सनात् [ हत्वी दस्यून् प्र आर्यं वर्णं आवत् ॥ ]

इन्द्रानें घोड्याची आणि सूर्याची प्राप्ति करून दिली, त्यानें बहुतांचें पोषण करणाऱ्या गायीची प्राप्ति करून दिली, त्यानें हिरण्यस्वरूप भोग दिले आणि दस्यूंची हत्या करून आर्यवर्णाचें विशेष संरक्षण केलें (तो वाढविला).

या पहिल्या तीन चरणांचा आणि चवथ्या चरणाचा परस्पर संबंध कांहीं असावा असें मूरसाहेबास वाटलें काय ? इंद्रानें घोडे आणि गाय दिली ती कोणती ? पुरुभोजस् गाय म्हणजे वृष्टि. आर्यांच्या यज्ञामुळें इंद्र आर्यांना कांहीं पारितोषिक देतो. तें वास्तव कोणतें तें या ऋचेंत सांगितलें आहे. तें पारितोषिक म्हणजे तो कधीं सूर्यप्रकाश व कधीं धनधान्यसंपदा देणारा पाऊस. या सूर्यामुळें व पावसानेंच सर्वांचें पोषण होतें आणि सर्व प्रकारची संपत्ति मिळते असा अभिप्राय आहे. या वर्णनाच्या श्लोकांतच अखेरचा चरण आला आहे; व त्यांत दस्यूंचा नाश आणि आर्यांचा प्रकर्षेण उत्कर्ष व्हावयाचा अशी कल्पना आहे. तो कसा ? कल्पना अशी कीं, आर्यांचा यज्ञ आणि इंद्राचा पाऊस व प्रकाश यांचें परस्परावलंबित्व आहे अशी आर्यांची समजूत ८ व्या मंडलांत (१४,४-५-६) प्रदर्शित केलेली असून तीच गोष्ट गीतेच्या ३ ऱ्या अध्यायांत सांगितली आहे असें आम्हीं याच निबंधांत इतरत्र सिद्ध केलें आहे. हा यज्ञ करणाऱ्या आर्यांचा मुख्य व ठाम सिद्धांत जसजसा अयज्ञियांच्या प्रत्ययास येईल तसतसा अयज्ञिय आर्यांत सामील होईल हीच कल्पना या ऋचेंत प्रदर्शित केली आहे. इंद्र दस्यूंची हत्या करतो ती कशी ? प्रत्यक्ष इंद्र जसा यज्ञांत येऊन दर्भासनावर बसत नाहीं, तसाच प्रत्यक्ष इंद्र शस्त्रयुद्धांत येऊन दस्यूंची हत्या करतो असेंहि नव्हे, ही गोष्ट या ऋचेवरून उघड होते. ( श्रुतिबोधकार अत्यान् = चपल तेजोगोल असा अर्थ करतात तो या दृष्टीनें मनःकल्पित ठरतो. अत्य = घोडे, अर्थात् सूर्यकिरण. )

या ऋचेंतील 'गुहा अकः' या शब्दांचा अर्थ डोंगराच्या दऱ्याखोऱ्यांतन वाटून दिलें असा वेदार्थयत्न आणि श्रुतिबोध-कारांनीं केला आहे. परंतु तो चूक आहे असें वाटतें. या बाबतींत आणखी एक निर्णायक ऋचाच आढळून येते ती. ४.२८.४. विश्वस्मात्सीम् अधमाँ इन्द्र दस्यून् विशो दासीः

अक्रुणोः अप्रशस्ताः ॥ अवाधेषां अमृणतं नि शत्रून् अविन्देथां अपचिति वधत्रैः ॥ ऋ. ४.२८.४. अर्थः—हे इन्द्रा, तूं दस्यूंना सर्वांपेक्षांहि अधम केलेंस (ठरविलेंस), दासी प्रजा म्हणजे दास यांना अप्रशस्त केलेंस. (हे इंद्रासोमा हो), तुम्ही शत्रूंना हाकवून दिलें व मारलें, आणि अपिचितींना शिक्षा केलीत. यावरून दस्यु, दास, शत्रु, अपिचित् हे सर्व एकच असून त्या सर्वांना अधमः अप्रशस्त ठरविलें असा स्पष्ट अर्थ आहे. अर्थात् आर्यांना उत्तम ठरविलें. सारांश.अधरं अकः=अधर ठरविले, हेंच बरोबर. ऋ. ४.५.५ यांत

(८) ते पापासः अनृताः संतः इदं गभीरं पदं अजनत ॥ ४.५.५ असें म्हटलें आहे. त्या पाप्यांनी—ते अनृत असल्यामुळें—आपल्याकरिता हें गभीर स्थान उत्पन्न करविलें, असा याचा अर्थ आहे. हाच अर्थ वरील २.१२.४ यांत अभिप्रेत आहे. हें गभीर किंवा गुहस्थान म्हणजे नरक होय. या स्थानाविषयींची त्यांची योग्यता याच ऋचेच्या मागील ऋचेवरून सिद्ध होते. ती ऋचा अशीः—

(९) ये चेततः मित्रस्य वरुणस्य ध्रुवं धाम प्रामनंति ।
तान् अग्निः तपिष्ठेन शोचिषा वमक्षत् ॥ ऋ. ४.५.४

अर्थः—'जे शास्त्या मित्रावरुणांचें ध्रुवस्थान मोडतात त्यांना अग्नीनें आपल्या अत्यंत उष्ण ज्वालेनें जाळून टाकावें.' असे जे पापी व अनृत त्यांनीं आपल्याकरितां हें गभीर स्थान (नरक) केलें. या दृष्टीनें पाहतां या गुहा नव्हत व तसा अर्थ करणें एकंदरीत अयोग्य वाटतें. वरील २.१२.४ या ऋचेंतील अधर शब्दाविषयींहि थोडा खुलासा करणें अवश्य आहे. हा नरक अधरस्थानीं असेल कदाचित्. नसेल असें कोणी सांगावें ? पण येथें अधर हें स्थलवाचक क्रियाविशेषण मानण्यापेक्षां दासवर्णाचें विशेषण मानणेंच योग्य होईल. अधर म्हणजे निकृष्ट (चित्रावांचें भाषांतर पाहा.). चित्रावांच्या 'गुहेंत टाकले' या अर्थापेक्षा आमचा अर्थ आग्रहास बरा वाटतो. याचे उलट

(१०) सोमपाः उत्तरो भवन् ॥ ऋ. ८.१४.१५

सोम पिणारे ( ब्राह्मण किंवा त्रैवर्णिक ) हे उत्तर म्हणजे श्रेष्ठ झाले असा अभिप्राय आहे असें वाटतें. वरील ऋ. ८.१४.१५ याचा अर्थ

( १ ) सोमरस प्राशन करून (इंद्रा), तूं यशस्वी झालास (श्रुतिबोध).

( २ ) सोमपान करून आणि श्रेष्ठ होऊन (चित्राव) इंद्रानें ......

असा अर्थ भाषांतरकार देतात. परंतु तो अर्थ मला पटत नाहीं. ‘सोमपाः उत्तरा भवन्’ हा त्याचेमागील भागाचा परिणाम वाटतो. तो भाग असा :

(११) मायाभिः उत्सिसृप्सत इन्द्र द्यां आरुरुक्षतः। अव दस्यूँरधूनुथाः ॥

(१२) असुन्वां इंद्र संसदं विषूचीं व्यनाशयः ( सोमपाः उत्तरोभवन्॥ )

ऋ. ८.१४.१४,१५

अर्थः — हे इंद्रा, (आपल्या) मायावी शक्तींनीं इतस्ततः हिंडणारे आणि द्युलोकीं जाण्याची महत्त्वाकांक्षा बाळगणारे जे दस्यु त्यांना तूं खालीं फुंकून टाकलेंस, ( तसेंच ) असुन्वत् असे जे सर्वत्र संचार करणारे दस्यु त्यांची संसद् ( टोळया ) यांचा तूं पार नाश करून टाकलास ( आणि त्यामुळें सोमपा असे जे यज्ञकर्ते ब्राह्मण ते श्रेष्ठ झाले ).

येथें दस्यु किंवा राक्षस यांचा स्पष्ट उल्लेखच आहे. तो नसता तर हें केवळ मेघांचेंच वर्णन आहे असें वाटलें असतें. दस्यु, असुर, राक्षस, वगैरे सर्व एकच आहेत असें दिसून येतें, असें इतरत्र आम्हीं सिद्ध केलें आहे. ते भिन्न असले तर असें म्हणावें लागेल कीं, असुरराक्षसांप्रमाणेंच दस्यूहि मायावी आहेत असें एथें गृहीत धरावें लागतें. हे दस्यु वगैरे अत्यंत महत्त्वाकांक्षी असून या लोकीं किंवा जितेंतरणींच आकाशांतील असुरच स्थान पटकावण्याची ते हांव बाळगतात अशा या भोगकामी दस्यूंना किंवा पाप्यांना तूं रसातळीं नरकांत ढकलतोस. दस्यु म्हणजे केवळ असुन्वत् ( सोम न पिणाऱ्या ) लोकांची टोळी. ते सर्वत्र पसरण्याचा प्रयत्न करीत असतां तूं त्यांचा नाश करून टाकतोस. दस्यूंचा नाश झाल्यानें आर्य सोमपी सहजींच श्रेष्ठ ठरतात. दस्यु अधर ( किंवा अधम ) तसेच आर्य उत्तर ( किंवा उत्तम ) ठरतात. दोघांची तुलना केली आहे ती अशी :

अकृणोः अप्रशस्ताः ॥ अधाधेयां अमृणतं नि शत्रून् अविन्देथां अपचितिं वधत्रैः ॥ ऋ. ४.२८.४. अर्थ:—हे इन्द्रा, तूं दस्यूंना सर्वांहूनहि अधम केलेस (ठरविलेस), दासी प्रजा म्हणजे दास यांना अप्रशस्त केलेस. (हे इन्द्रासोमा हो), तुम्ही शत्रूंना हाकून दिलें व मारलें, आणि अपचितींना शिक्षा केलीत. यावरून दस्यु, दास, शत्रु, अपचित् हे सर्व एकच असून त्या सर्वांना अधमः अप्रशस्त ठरविलें असा स्पष्ट अर्थ आहे. अर्थात् आर्यांना उत्तम ठरविलें. दासांस अधरं अकः = अधर ठरविले, हेंच बरोबर. ऋ. ४.५.५ यांत

(८) ते पापासः अनृताः संतः इदं गभीरं पदं अजनत ॥ ४.५.५ असें म्हटलें आहे. त्या पाप्यांनी—ते अनृत असल्यामुळें—आपल्याकरितां हें गभीर स्थान उत्पन्न करविलें, असा याचा अर्थ आहे. हाच अर्थ वरील २.१२.४ यांत अभिप्रेत आहे. हें गभीर किंवा गुह्यस्थान म्हणजे नरक होय. या स्थानाविषयींची त्यांची योग्यता याच ऋचेच्या मागील ऋचेवरून सिद्ध होते. ती ऋचा अशी:—

(९) ये चेततः मित्रस्य वरुणस्य ध्रुवं धाम प्रामनंति ।
तान् अग्निः तपिष्ठेन शोचिषा वमसत् ॥ ऋ. ४.५.४

अर्थ:—'जे ज्ञात्या मित्रावरुणांचें ध्रुवस्थान मोडतात त्यांना अग्नीनें आपल्या अत्यंत उष्ण ज्वालेनें जाळून टाकावें.' असे जे पापी व अनृत त्यांनीं आपल्याकरितां हें गभीर स्थान ( नरक ) केलें. या दस्यांसोन्शांतल्या गुहा नव्हत व तसा अर्थ करणें एकंदरींत अयोग्य वाटतें. वरील २.१२.४ या ऋचेंतील अधर शब्दाविषयींहि थोडा खुलासा करणें अवश्य आहे. हा नरक अधरस्थानीं असेल कदाचित्. नसेल असें कोणी सांगावें ? पण येथें अधर हें स्थलवाचक क्रियाविशेषण मानण्यापेक्षा दासवर्णाचें विशेषण मानणेंच योग्य होईल. अधर म्हणजे निकृष्ट ( चित्रावांचें भाषांतर पाहा. ). चित्रावांच्या 'गुहेंत टाकले' या अर्थापेक्षा आमचा अर्थ आम्हांस बरा वाटतो. याचे उलट

(१०) सोमपाः उत्तरो भवन् ॥ ऋ. ८.१४.१५

सोम पिणारे (ब्राह्मण किंवा त्रैवर्णिक) हे उत्तर म्हणजे श्रेष्ठ झाले असा अभिप्राय आहे असें वाटतें. वरील ऋ. ८.१४.१५ याचा अर्थ

(१) सोमरस प्राशन करून (इंद्रा), तूं यशस्वी झालास (श्रुतिबोध).

(२) सोमपान करून आणि श्रेष्ठ होऊन (चित्राव) इंद्रानें ......

असा अर्थ भाषांतरकार देतात. परंतु तो अर्थ मला पटत नाहीं. 'सोमपाः उत्तरा भवन्' हा त्याचेमागील भागाचा परिणाम वाटतो. तो भाग असा :

(११) मायाभिः उत्सिसृप्सत इन्द्र द्यां आरुरुक्षतः। अव दस्यूँरधूनुथाः॥

(१२) असुन्वां इंद्र संसदं विषूचीं व्यनाशयः ( सोमपाः उत्तरोभवन्॥ )

ऋ. ८.१४.१४,१५

अर्थः – हे इंद्रा, (आपल्या) मायावी शक्तींनीं इतस्ततः हिंडणारे आणि द्युलोकीं जाण्याची महत्त्वाकांक्षा बाळगणारे जे दस्यु त्यांना तूं खालीं फुंकून टाकलेंस, (तसेंच) असुन्वत् असे जे सर्वत्र संचार करणारे दस्यु त्यांची संसद् (टोळ्या) यांचा तूं पार नाश करून टाकलास (आणि त्यामुळें सोमपा असे जे यज्ञकर्ते ब्राह्मण ते श्रेष्ठ झाले).

येथें दस्यु किंवा राक्षस यांचा स्पष्ट उल्लेखच आहे. तो नसता तर हें केवळ मेघांचेंच वर्णन आहे असें वाटलें असतें. दस्यु, असुर, राक्षस, वगैरे सर्व एकच आहेत असें दिसून येतें, असें इतरत्र आम्हीं सिद्ध केलें आहे. ते भिन्न असले तर असें म्हणावें लागेल कीं, असुरराक्षसांप्रमाणेंच दस्यूहि मायावी आहेत असें एथें गृहीत धरावें लागतें. हे दस्यु वगैरे अत्यंत महत्त्वाकांक्षी असून या लोकीं किंवा जिवंतपणींच आकाशातील अत्युच्च स्थान पटकावण्याची ते हांव बाळगतात अशा या भोगकामी दस्यूंना किंवा पाप्यांना तूं खालीं नरकांत ढकलतोस. दस्यु म्हणजे केवळ असुन्वत् (सोम न पिळणाऱ्या) लोकांची टोळी. ते सर्वत्र पसरण्याचा प्रयत्न करीत असतां तूं त्यांचा नाश करून टाकतोस. दस्यूंचा नाश झाल्यानें आर्य सोमपी सहजींच श्रेष्ठ ठरतात. दस्यु अधर (किंवा अधम) तसेच आर्य उत्तर (किंवा उत्तम) ठरतात. दोघांची तुलना केंवीं आहे ती अशी:

| आर्य | दस्यु, दास वगैरे |
|---|---|
| (१) बर्हिष्मत्, अनुव्रत, सुन्वत्, आभू, सोमपा. | (१) बर्हिष्मत् नव्हे, अव्रत किंवा अपव्रत सुन्वत् नव्हे, मायावी, सर्वत्र पसरणारे, द्युलोकी जिवंतपणींच जाऊन बसण्याची हाव बाळगणारे, अनाभू. |
| (२) देव त्याचे वर्णाला व उचलतात (त्यांचा नाश होत नाहीं). | (२) देव त्याचे वर्णाला खालीं ढकलतात. |
| (३) आर्य वर्ण उत्तर (उत्तम) ठरतो. | (३) दासवर्ण अधर ठरतो. |

. मोठ्या टाइपांतील शब्दांकरितां खालील ऋचा पाहा :—

(१३) अनुव्रताय रंधयन् अपव्रतान् आभूभिः श्नथयन् अनाभुवः ॥ ऋ.

अर्थ :— अनुव्रतांकरितां अपव्रतांना त्यांच्या स्वाधीन करून, तसेंच आभू (स्तोत्रें करणारे)कडून अनाभूंचा (स्तोत्रें न करणारे निंदक) नाश करून इ. इ.

या दास आणि आर्य वर्णांना 'अधरोत्तरता' प्राप्त झाली असें यावरून दिसून येतें. ही अधरोत्तरता राजकीय दिसत नाहीं. ती धार्मिक दिसते. ती वर्णसंबंधी आहे. तथापि राजकीय असली तरी धार्मिक बाबतींत द्वि ध भाव उत्पन्न होऊन त्यांत यजन करणाऱ्यांना जी श्रेष्ठता प्राप्त झाली त्या श्रेष्ठतेचा तो परिणाम आहे. स्वतंत्र राजकीय आक्रमण नव्हे.

आर्याला श्रेष्ठ पदवीला चढविला आणि दासाला अधमपदाला नेला (उतरविला); एकाचा धर्मदृष्टीनें (व कदाचित् राजकीय दृष्टीनें) उत्कर्ष, तर दुसऱ्याचा अपकर्ष झाला; सूर्योदयाबरोबर अंधकाराचा ठावठिकाणा उरत नाहीं, त्याला धरणीवर ठाव मिळणें कठीण, त्याप्रमाणेंच महापराक्रमी आर्याभिमानी प्रकृष्ट इंद्र प्राप्त झाला असतां निकृष्ट, अधार्मिक दास कोठें पळून जाईल नियम नाहीं. त्यानें स्वतःकरितां स्वतंत्र व

गूढ-असें स्थान निर्माण करून घेतलें. अर्थात् आर्यांचें 'ध्रुवस्थान' तर दासांचें त्याउलट 'गुह' किंवा 'गभीर' असें (नरक) स्थान.

## आर्य आणि दास यांमधील भेद

आर्यांच्या ध्रुवस्थानासंबंधाची आणखी थोडी फोड करणें अवश्य आहे-- आर्य आपल्या देवाजवळ काय मागत किंवा देवाजवळून काय अपेक्षीत याचा विचार केला तर आर्य आणि दास यांजमधील भेद किंवा वैशिष्ट्य आढळून येईल.

(१) अस्मे महि श्रवः धेहि। ऋ. १.७९.४ अस्मे धेहि श्रवो बृहत् ॥ ८.५.४१

(२) स हि विश्वा पार्थिवा अति रयिं दाशत्। ६.१६.२०
सुप्रथः शर्म यच्छ। वरेण्यं वसु यच्छ। ६.१६.३३

(३) नित्यस्य रायः पतयः स्याम ॥ ७.५.७

(या ठिकाणीं औरस पुत्रसंततीवर कटाक्ष आहे. इतरक्षेत्रज किंवा दत्तक संततीनें कार्य साधत नाही.)

(४) ताभ्यां पतेम सुकृतामु लोकं यत्र ऋषयो जग्मुः प्रथमजाः पुराणाः ॥ यजुर्वेद. वाज. १८.५२.५३

(५) विश्वं सत्यं कृणुहि ॥ ६.३०.६

(६) विश्वं आर्यं कृणुहि ॥ ऋ. ९

(७) अस्माकं देवा उभयाय जन्मने शर्म द्विपदे चतुष्पदे ॥
मह्यान्तस्य धस्ते ध्रुव आ निषत्तः नमस्तेऽस्तु मा मा हिंसीः ॥
यजुर्वेद वाज. १८.५३।५३

(८) यत्र ज्योतिः अजस्रं, यस्मिँल्लोके स्वर्हितम्। तस्मिन् मां धेहि ॥
ऋ. ९.११३-७-

यत्र राजा वैवस्वतो, यत्र अवरोधनं दिवः। यत्रामूः यह्वतीरापः
तत्र मां अमृतं कृधि ॥ ८

यत्रानुकामं चरणं, त्रिनाके त्रिदिवे दिवः। लोका यत्र
ज्योतिष्मंतः तत्र मां अमृतं कृधि ॥ ९

यत्र कामाः निकामाः च यत्र ब्रध्नस्य विष्टपम्। स्वधा च
यत्र तृप्तिः तत्र मां अमृतं कृधि ॥ १०

यत्रानंदाश्च मोदाश्च मुदः प्रमुद आसते। कामस्य यत्राप्ताः कामाः
तत्र मां अमृतं कृधि ॥ ११

यावरून कोणालाहि स्पष्ट दिसून येईल कीं, आर्यांमध्यें (१) महान् किंवा बृहत् कीर्ति, (२) पार्थिव संपत्तीपलीकडील संपत्ति, अर्थात् (३) शाश्वत संपत्ति (४) ज्या ठिकाणीं प्रथम उत्पन्न झालेले जे ऋषि ते गेले त्याच पुण्यकारक लोकांत पडावें ही इच्छा; (५) सर्व विश्व सत्य व आर्य व्हावें अशी इच्छा प्रबल होती. आणि याबरोबरच ऐहिक आयुष्य आणि ऐहिक संपत्ति यांची जोड आर्यांस हवी असे. तथापि आर्यांचें वैशिष्ट्य म्हणून कोणास पाहावयाचें असेल तर तें त्यांच्या ऐहिक अशाश्वत ऐश्वर्यलालसेंत नसून पारलौकिक व शाश्वत ऐश्वर्य संपादन करण्याच्या महदिच्छेंत आहे ही गोष्ट विसरतां कामा नये. कै. शं. पां. पंडित यांच्या वेदार्थयत्नांतील टीका जो पाहूं लागेल त्यास दर पानावर याविरुद्ध मजकूर आढळून येईल. त्यावरून त्यांची मनोवृत्ति आणि त्यांचा उपळरणा कोणाच्याहि लक्षांत भरल्यावांचून राहणार नाहीं. आर्य आणि त्यांचे शत्रु यांजमधील भेद स्पष्टपणें दाखविणारी खालील ऋचा पाहा:

(१४) आसंयतं इन्द्रणः स्वस्ति शत्रुतूर्याय बृहतीं अमृध्राम्।
यया दासानि आर्याणि वृत्रा करो वज्रिन्त्सुतुका
नाहुषाणि ॥ ऋ. ६.२२.१०

अर्थ:— हे इंद्रा, तूं आम्हांला शत्रुनाशार्थ पुष्कळ व शाश्वत टिकणारी अशी संपत्ति दे, कीं ज्या योगानें शत्रु असे जे दास तेहि आर्य (मित्र व स्वकीय) होतील आणि नहुष (मानव) बहुपुत्र (बहुसंतान) होतील.

ही ऋचा अत्यंत महत्त्वाची आहे. यांत आर्य आपल्याला विशिष्ट प्रकारची 'स्वस्ति' किंवा कल्याण मागत आहे, ती शत्रुनाशार्थ मागत आहे. पण 'शत्रुनाश' या शब्दाचा येथील अर्थ अत्यंत प्रशंसनीय आणि इतरत्र कोठेंहि न आढळून येणारा असा आहे. अर्थाकडे लोकांचें

लक्ष जावें तितकें गेलेलें नाहीं. शत्रुनाश म्हणजे ज्या योगानें दास असे जे शत्रु ते आर्य होतील आणि त्यामुळें आर्य बहुसंख्य (बहुपुत्र) होतील. विश्वं आर्यं कृणुहि । अशी जी वर प्रार्थना दिली आहे तिचा अर्थ आतां समजून येईल. अनार्यांना ठार मारून किंवा त्यांना जीविवदुष्कर करून व जगांतून 'रेड इंडियन्स'प्रमाणें त्यांना हळू हळू नाहींसे करून सर्व जग आर्य करावयाचें असा आर्यांचा हेतु नाहीं. शत्रूंतील शत्रुत्व नाहींसें करून, अनार्यांतील अनार्यत्व नाहींसें करून, सर्व जग आर्य किंवा श्रेष्ठ बनवावयाचें अशी त्यांची महत्वाकांक्षा होती. दास आर्य होऊं शकें ही येथील भूमिका लक्षांत ठेवली म्हणजे दास कृष्णवर्णाचा आणि आर्य गौरवर्णाचा ही कल्पना सर्वथा त्याज्य ठरविण्यावांचून गत्यंतरच नाहीं. वर्ण म्ह. रंग या कल्पनेवर बसविलेल्या सर्व अवडंबरावर हा एक प्रकारानें 'बोंबडोल'च आहे.

## अमृध्र

या ऋचेंतील 'अमृध्र' शब्दाकडे वेदविदांचें लक्ष वेधण अवश्य आहे. अमृध्र म्हणजे शाश्वत टिकणारी किंवा ध्रुव. याविरुद्ध 'मृध्र' म्हणजे अशाश्वत. आणि मृध्रवाच् म्हणजे अशाश्वत संपत्तीचे भोक्ते[1]. मृध्रवाक् हा शब्द 'म्हातारीच्या मरडण्या'ला किंवा मेघांच्या गडगडाटाला लावावयाचा असेल त्या वेळीं 'अस्पष्ट व अशांत — किंवा अज्ञेय म्हणा — वाणी असा अर्थ होऊं शकेल. परंतु असुर, दास वगैरे लोकांविषयीं या शब्दाचा प्रयोग करावयाचा असेल तेव्हां 'शिव्याशाप देणारा, वृथा बडबडणारा, असद्र भाषा बोलणारा,' बोबडें बोलणारा, 'शत्रुत्वाची भाषा ( hostil speech ) बोलणारा असा अर्थ योग्य नव्हे. तेथें 'अशाश्वत ऐहिक संपत्तीची लालसा बाळगणारा, पारलौकिक शाश्वत संपत्तीकडे दुर्लक्ष करणारा,

१ मृध्रवाच् म्हणजे शाश्वत संपत्तीचे भोक्ते आणि आसुरी संपत्तीचे लोक असें येथें दर्शविलें आहे. अशा लोकांना परलोक आणि ईश्वर वगैरे दिसत नसतो. त्यांचा सर्व व्यवहार स्वतःकरतां चाललेला असतो.

२ वैदिक इंडेक्सकारांचा हा अर्थ अस्पष्टच आहे. तो कोणीकडेहि लागू होईल.

ऐहिक भोग देव सर्वस्व समजणारा' असा अर्थ करणें भाग आहे.

त्वं मायाभिरनमायिनोऽधमः स्वधाभिर्ये अधिशुनावजुह्वता ॥

ऋ. १.५१.५

अर्थः— तूं या मायावी लोकांना मायेच्याच योगानें फुंकून फेकून दिलेंस. ते (मायावी) असे, की जे हविरन्नांनीं आपल्याच तोंडांत हवन करतात. हे मायावी म्हणजे असुर असें सायणाचार्य म्हणतात तेंच योग्य होय. असुरांत दोन प्रकार: एक केवळ ऐहिक सुखांकरितां देवांना यज्ञ करतात ते; व दुसरे देवांना मानीत नाहींत किंवा यज्ञ न करतां केवळ चैन उडवितात ते (आपलें पोट भरणें याशिवाय दुसरा देवच नाहीं असें समजतात) (वेदार्थयत्नकार पा. ६९०). भ. गीतेच्या शब्दांत 'भुंजते ते त्वघं पापा ये पचन्ति आत्मकारणात् ॥ (३.१३) अघायुरिंद्रियारामो मोघं पार्थ स जीवति। (३.१६) या प्रकृतीचे लोक. वेदांत अघ, पाप असेच शब्द या लोकांविषयीं वापरलेले आढळतात. अर्थात् गीतेनें ते शब्द वेदांतूनच घेतले आहेत.

## अनास

अनासः आस्यते निरास्यते ष्ठीवनमनेन इति आः मुखं तन्नास्ति साधनत्वेन अस्य. Without mouth or face; without the power of speech (आस्यरूप.वार शब्दरहित—आपटेकोश).

या मृध्रवाक् शब्दासारखाच दुसरा एक शब्द 'अनास' हा. या एका शब्दावर आर्य-दासविकिरवा सर्वस्वीं अवलंबून आहे. युरोपीय पंडितांनीं या शब्दाचे वाभाडे काढले आहेत आणि आमचेकडील विद्वानांनीं त्या त्यांच्या 'अर्थाच्या अनर्था'ला मूकसंमति दिली आहे. एवढेंच नव्हे, तर त्यांच्या जादूला भाळीपडून त्यांची कल्पनाच सर्वथा खरी समजून डोक्यावर घेऊन नाचत आहेत. अनास शब्द वैदिक लोक अन् + आस असा सोडवितात; अ + नास असा सोडवीत नाहींत. अन् + आस म्हणजे ज्याला आस किंवा वाणी नाहीं तो; म्हणजे मुका असा अर्थ नव्हे, तर वर जो मृध्रवाक् सांगितला तो, अर्थात् ऐहिक व अशाश्वत संपत्तीनें भुलणारा.

परंतु अनास = अ + नास असा अर्थ केल्यानें केवढा घोटाळा झाला आहे तो पाहा : अ + नास = ज्याला नाक नाहीं तो; म्हणजे ज्याचें नाक आखूड किंवा चपटें आहे, जो नकटा आहे तो. अर्थात् हा शब्द आर्यशत्रु जे दास त्यांना लावण्यांत येतो. तेव्हां दास म्हणजे नकट्या किंवा चपट्या नाकाचे लोक आणि आर्य त्याचे उलट म्हणजे सरळ आणि नाकेले. येथून सर्व कल्पनांचा बाजार. आर्य हा नाकेला किंवा सरळ नाकाचा असें वर्णन वेदांत कोठेंहि नाहीं; पण अनास आणि कृष्णयोनि या शब्दांचे विपर्यास करून तो विपर्यस्त अर्थ दासाला लावून त्याविरुद्ध तो आर्य अशी तीन मजली भव्य इमारत किंवा नवीन इतिहास रचून महाघोटाळा करून ठेवला आहे.

यया दासानि वृत्राणि आर्याणि करो । ज्या संपत्तीच्या योगानें शत्रुरूपी दास आर्य होतो अशी संपत्ति आर्य मागतो आणि सर्व विश्व आर्य करण्याची महत्त्वाकांक्षा बाळगतो. ही गोष्ट दास हा कृष्णयोनि, मृध्रवाक् आणि अनास म्हणजे काळ्या रंगाचा, अस्पष्ट भाषा बोलणारा आणि नकट्या नाकाचा असेल तर शक्य आहे काय? शारीरिक रंग ( colour ), वैगुण्य ( deformity ), आणि भाषापद्धति म्ह. बोबडी भाषा हीं कशानेंहि बदलूं शकणार नाहींत. परंतु आर्य तर दासाचा आर्य बनवूं इच्छितो. अर्थात् युरोपीय किंवा त्या धर्तीवर केलेले अर्थ चुकीचे समजण्यावांचून गत्यंतर नाहीं. दोघांमधील भेद रंग, शरीरवैगुण्य किंवा भाषा या बाबतींतला नसून तो शाश्वत किंवा अशाश्वत संपत्ति ( स्वस्ति - Eternal किंवा transient – कल्याण ) या स्वरूपाचा व धार्मिक आहे. आर्य अमृध्र स्वस्तीकरितां धपापलेला तर आर्येतर दास, असुर वगैरे मृध्र स्वस्तीला चटावलेला; एकाचें ध्येय परलोक किंवा मोक्ष, तर दुसऱ्याला ऐहिक भोगापलीकडे दिसत नाहीं; एक देवकाम तर दुसरा भोगकाम आणि देवनिंद. आर्य आणि दास, दस्यु, असुर यांमधील भेद ऋग्वेदांत खालील शब्दांनीं दाखविला जातो. त्यावरून त्याचें स्वरूप स्पष्टपणें दिसून येतें. आर्य शब्दाची प्रत्यक्ष व्याख्या अशी वेदांत आढळत नाहीं; तथापि तत्सदृश अशा आणखी एक दोन गोष्टी आढळतात त्या येथें देणें उचित होईल. ( १ ) तमित् च्यौत्नैः आर्यंति तं कृतेभिः चर्षणयः ॥ ऋ. ८. १६. ६–ते बलानें (उत्साहानें) व कर्मांनीं आर्य ठरतात. ( २ ) वृत्तेन भवति आर्यः न धनेन न

हीच गोष्ट भगवद्गीतेच्या शब्दांत सांगतां येण्यासारखी आहे. आर्य आणि दास हा भेद

द्वौ भूतसर्गौ लोकेऽस्मिन् दैव आसुर एव च ।
भगवद्गीता १६.६

दैव व आसुर संपत्तीच्या स्वरूपाचा आहे व त्या दोन संपत्तींचीच 'दासं वर्णं अधरं' आणि 'सोमपाः उत्तरामुवन्' म्हणजे अधरोत्तरता वेदांत सांगितली आहे. ही अधरोत्तरता घालविणें कांहीं अशक्य नव्हतें.

१६. महान् असुन्वतो वधः । भूरि ज्योतींषि सुन्वतः ॥ ऋ.८.५१.१२ सुन्वत्–सोमयाजी किंवा सोमपी–आणि असुन्वत्–सोमयज्ञ न करणारे–असे दोन भेद एकाचें–सुन्वतांचें शस्त्र ज्ञानमय किंवा ज्योतिस्स्वरूप तर असुन्वतांचें शस्त्रहि लहान सहान नाहीं [ पण अज्ञानमय–अर्थात् जितकें अज्ञान अधिक तितका हेका अधिक ]. आमच्या समजुतीप्रमाणें एक निवृत्तिपर तर दुसरा केवळ प्रवृत्तिपर अशा दोघांमध्यें समजूत होणें अशक्य नाहीं. पण भेद देहवर्णाचा किंवा देहवैगुण्याचा असेल तर तो कधीं तरी जाईल काय ? भगवद्गीतेच्याच शब्दांत सांगावयाचें तर

अपि चेत्सुदुराचारो, भजते मां अनन्यभाक्,
साधुरेव स मंतव्यः, सम्यग्व्यवसितो हि सः ॥ भ.गीता ९.३०
क्षिप्रं भवति धर्मात्मा, शश्वत् शांतिं निगच्छति ॥ किंवा ९.३१

सुदुराचारी किंवा महापापी–देवनिंद् अपशंसी दुरात्मा [ ऋग्वेद ]–असला तरी त्यास देवकाम किंवा अनन्यभाक् होतां येईल व तसा झाला म्हणजे तो तत्क्षणींच 'साधु' [ आर्य ] झाला असें खुशाल समजावें. तो लगेच 'धर्मात्मा' होऊन शश्वत् शांतीचा अधिकारी होऊं शकतो. हीच गोष्ट 'दासानि वृत्राणि आर्या करा' (ऋ. ६.२२.१०) यांत सांगितलेली आहे.

आर्य आणि दास, दस्यु, राक्षस, असुर यांमधील भेद शारीरिक नसून मानसिक किंवा वृत्तीचा किंवा धार्मिक होता; व्यावहारिक किंवा राजकीय नव्हता. या शब्दांचे अर्थ ब्राह्मणांतून विवेचिलेले दिसतात ते मननीय आहेत. 'मनो या असुरं तद् हि असुषु रमते' (ऐ.उ.३।३५।१) शत–असुरः दस्युः — ते एते आंध्राः पुण्ड्राः शबराः पुलिन्दाः मूतिबाः इत्यन्त्या

-वद्यो वैश्वामित्रा दस्यूनां भूयिष्ठाः । ( ऐ. ७।१८ ). या अर्थावरूनहि वरील अनुमानालाच पुष्टि मिळते. या भेदाला आपण वर्ण हा शब्द योजला तर एकाला शुक्र किंवा श्वेत आणि दुसऱ्याला कृष्णहि म्हणूं शकूं. कारण ते शब्द वर्ण किंवा रंगवाचक असले तरी वर्गवाचकहि आहेत. उ. श्वेत पर्वत, श्वेत समुद्र, काळा समुद्र, तांबडा समुद्र, पीत समुद्र, पीत पर्वत, पीत नदी वगैरे. दोघांत अधरोत्तरता किंवा श्रेष्ठत्व-कनिष्ठत्व मानावयाचें झालें तर जो तो आपल्या प्रकृतीप्रमाणें मानील. धार्मिक असेल तो आर्याला श्रेष्ठ ठरवील, उलट असेल तो दासाला श्रेष्ठ ठरवील. वसिष्ठ ऋ. ७.१०४.१२ मध्यें म्हणतात त्याप्रमाणें

१७. सुविज्ञानं चिकितुषे जनाय सच्चासच्च वचसी पस्पृधाते ।
तयोर्यत्सत्यं यतरदृजीयः तदित् सोमोऽवति हन्त्यासत् ॥

अर्थ :- ज्ञात्याला हें सहज कळण्यासारखें आहे कीं, सत् आणि असत् ( खरें आणि खोटें किंवा शाश्वत आणि अशाश्वत ) यांमध्यें ( या भाषेमध्यें ) स्पर्धा चाललेली आहे. त्यांपैकीं जें सत् आणि सरळ असेल त्याचेंच सोम रक्षण करतो आणि असत् असेल त्याचा नाश करतो. या बाबतींत मनुस्मृतींतील खालील श्लोक लक्षांत घेण्यासारखा आहे.

हिंस्राहिंस्रे मृदुक्रूरे धर्माधर्मौ ऋतानृते ।
यद्यस्य सोऽदधात् सर्गे तत्तस्य स्वयमाविशत् ॥ मनु.१.२९

हिंस, अहिंस, मृदु, क्रूर, धर्म, अधर्म, ऋत, अनृत अशीं कर्में सृष्टयारंभीं वांटलीं गेलीं. त्याप्रमाणें प्राणिमात्र स्वयमेव आचरण करूं लागला. किंबहुना प्राणिमात्रांचे हे विभाग असून त्यांच्या वर्तणुकीवरून कोण कसा हें सामान्यपणें-व्यक्तिद्दष्टीनें नव्हे-ठरविलें.

आर्य आणि दास, दस्यु वगैरे लोकांमधील युद्धें काय स्वरूपाचीं होतीं हें यावरून समजून येईल. आमचें असें म्हणणें नाहीं कीं, यांत रक्तपात कधींच झाला नसेल किंवा एकमेकांनीं एकमेकांचे जीव मुळींच कधीं घेतले नसतील. कोणत्याहि निमित्तानें वैर उत्पन्न झालें तरी त्यांत लढाया व प्राणघात होऊं शकतात. इंग्लंडचे इतिहासांत रोमन कॅथॉलिक व प्रॉटेस्टंट यांमधील तंटा प्राणघातापर्यंत गेलेला आहे. तथापि आर्य आणि बुद्ध किंवा शैव आणि वैष्णव यांमधील भेदाचें स्वरूप पाहिलें म्हणजे त्यांमध्यें किती द्वेष असे तरी प्रत्यक्ष युद्धें व रक्तपात घडला गेलेला नाहीं आणि

विषया, किंवा (३) कर्तव्यं आचरन् अकर्तव्यं अनाचरन् तिष्ठे प्रकृताचारे स वा आर्य इति स्मृतः ॥ (४) आर्यांचें ध्येय 'मोक्ष' व परलोक विशेषतः मोक्ष आहे. तो 'मित्रस्य वरुणस्य ध्रुवं धाम' इच्छितो. 'यद्गत्वा न निवर्तंते तद्धाम' मागतो हेंहि दिसून आलेलं आहे.

| आर्य | दास वगैरे | आर्य | दास वगैरे | |
|---|---|---|---|---|
| १ देवकाम, | अदेव, | १ ऋच: | अनृच: | अमन्यमान |
| देवयु | देवपीयु | १ ऋजीद: | अनृज | रक्ष: |
| | देवनिद: | १ अद्रुह: | द्रुह: | रक्षस्विन् |
| १ यज्वियांस: | अयज्वन्, | | दोषवाच: | रिप: |
| | अयज्यू | | रिपु: | रिपु: |
| | अकर्मन्, | १ भद्रं इच्छन् | भद्रं दूष्यन् | द्वेषायन् |
| | अब्रह्मन् | | मेगुरवत् | निद: |
| | ब्रह्मद्विष:, | | शिश्नदेव | अघ: |
| | यज्ञद्वन: | | | अघशंस: |
| | यज्ञमुष: | १ शुचि | अशुचि: | |
| | देवा: | १ अघोरचक्षु: | घोरचक्षस् | |
| २ सुन्वत: | असुन्वत: | | | |
| १ ज्योतिष्मा: | तमोवृधा:, | १ मर्ता | अव्रत: | अशुचि: |
| | अचित्ता: | १ अनुव्रत: | अन्यव्रत: | यातुधान: |
| | अबुध्य, | | अपव्रत: | मायावान् |
| | अबुध्यमान | | | स्तेन |
| १ सत्य, | असत: वक्ता, | १ अमृध्र: | मृध्रवाक् | |
| सत्यवक्ता | अनृतदेव | | धूर्तधाम | स्तेयकृत् |
| | | १ पाकेन | प्रमिनंति | क्रव्याद् |
| | | मनसा चरन् | पाकसंस: | किमिदिन: |
| १ अमूर: | देवानां भय: | १ (सुकृत:) | दुष्कृत: | अत्रिण: |
| | मूरदेवा: | १ आभू | अनाभू | मायिन: |

ही यादी अपूर्ण आहे. यापेक्षां बरीच मोठी यादी ज्ञानकोशांत दिली आहे

वेदशब्दसृष्टि पाहा.) परंतु या सप्रश्निलावरून एक गोष्ट निश्चित की, आर्य आणि दास यांचा भेद धार्मिक आहे, राजकीय नाहीं किंवा वांशिक नाहीं, किंवा दैशिक नाहीं. हा भेद वांशिक नाहीं किंवा दैशिक नाहीं; हें दाखविणारें आणखी एक उदाहरण हें आहे कीं, आर्य असे जे पुरु त्या पुरूंनाहि मृध्रवाक् शब्द खालील ऋचेंत लावलेला आहे. आर्या-आर्यांच्या लढाया किंवा तंटे होत असत हें खरें, पण शत्रु झाला तरी तो आपली स्पष्ट भाषा अस्पष्ट बोलेल असें नाहीं. अर्थात्

१५. निदधे मृध्रवाचं पुरुं जेषम ॥ ऋ.७.१८.१३

या ऋचेंत मृध्रवाक् म्हणजे वैदिक संपत्तीचा भोक्ता जो पुरु त्याला युद्धांत म्हणा किंवा वाग्युद्धांत म्हणा जिंकलें. मृध्र शब्दाप्रमाणेच म्लेच्छ शब्द आहे. पतंजलि या शब्दाचा अर्थ 'अपभाषा बोलणारा' असा करतात खरा, परंतु बौधायन म्हणतात :

गोमांसखादको यस्तु विरुद्धं बहुभाषते ।
सर्वाचारविहीनस्तु म्लेच्छ इत्यभिधीयते ॥ बौधायन

आर्य आणि म्लेच्छ यांजमधील फरक केवळ भाषाभेदाचा नसून [ १ ] गोमांस-भक्षण, [ २ ] विरुद्ध भाषा ( परस्पर- ) व [ ३ ] आचारविहीनता या स्वरूपाचा आहे. यांत वरील यादीपैकीं क्रव्याद्, मृध्रवाक्, देवनिद् वगैरे आणि अयज्वन्, अकर्मन्, अव्रत, अन्यव्रत, अपव्रत या शब्दांचे वाचक गोमांसभक्षक, विरुद्धभाषक, आणि आचारविहीन असे शब्द बौधायनानें घातले आहेत ते विचार करण्यासारखे आहेत.

सारांश, 'अमृध्र स्वरित' हें आर्यांचें वैशिष्ट्य तें अंगीकारलें असतां दासाचा आर्य होऊं शके. आणि उलटपक्षीं तें वैशिष्ट्य सोडलें म्हणजे पुरुसारखेहि मृध्रवाक् म्हणजे दास होऊं शकत. अर्थात् आर्य आणि दास हे केवळ धार्मिक उच्च ध्येयामुळें उत्तर किंवा उत्तम आणि अधर किंवा अधम असे बनले होते. त्यांच्यांत परस्परसमावेश किंवा देवघेव होऊं शके. असा समावेश क्वचित् होऊं शकेल हा भाग वेगळा. तो भेद दैशिक, वांशिक किंवा जन्मजात नव्हता आणि दैहिक वैगुण्य बदलण्याची किंवा भाषा-नैपुण्य मिळवून देण्याची किंवा वंश अगर जाति बदलण्याची गोष्ट नसून केवळ वृत्ति बदलण्याची गोष्ट आहे.

तंट्याचें मानसिक व धार्मिक स्वरूप पाहिलें म्हणजे बहिष्काराचे प्रयोगच बहुधा झाले असतील असें अनुमान होतें. मुसलमानी धर्मप्रमाणें एका हातांत धर्म आणि दुसऱ्या हातांत तलवार मनुष्य घेऊं शकतो. पण मोठमोठ्या धर्मांतून वाग्युद्ध करून आजिंक्यपद मिळविणें ही गोष्ट कांहीं अशक्य नाहीं. दोघामधील भेदाचें स्वरूप पाहतां हें आक्रमण शारीरिक नसून मानसिक असावें आणि बहिष्काररूपी शिक्षेंत त्याचें पर्यवसान झालें असावें असें वाटतें. अविनाशचंद्रदासानें पहिला बहिष्कार सर्वथा देशबहिष्कारस्वरूपी झाल्यानें येथून पणि, असुर, इराणी वगैरे लोकांनीं बाहेरदेशीं जाऊन निराळीं राष्ट्रें स्थापन केलीं. 'वैदिक इंडेक्स'कार म्हणतात: 'दि हिस्टरि ऑफ् हिंदुइझम् इज् दि कॉंकिस्ट् बाय् दि ब्राह्मणस् नॉट् बाय् आर्म्स बट् बाय् माइंड् ऑफ् दि ट्राइब्स् आर्यन् अँड् नॉन्आर्यन् (वे. इंडेक्स व्हॉ. २ पा. १२). खालील ऋचेंत हीच गोष्ट सांगितली आहे तिकडे आम्ही वेदशांचें लक्ष वेधतों. अवन्मे धृजिना शिशीहि ऋचा धनेम अनृचः ॥ नावब्रह्मा यज्ञ ऋधग्जोषति त्वे ॥ १०.१०५.८

अर्थ :– (हे इंद्रा), आमचें रक्षण कर, दुष्टांचा नाश कर, ऋक्स्तोत्रांच्या साहाय्यानें आम्ही अनृचांचा नाश करूं. स्तोत्रविरहित यज्ञ तुला खास आवडत नाहीं, हीच गोष्ट ऋ. १.३३.९ व ३.३४.६ यांत सांगितली आहे.

हिंदुत्वाचा इतिहास म्हणजे ब्राह्मणांनीं आर्य आणि अनार्य जातींवर शस्त्रांनीं नव्हे तर मनानें–मिळविलेला विजय. आमची तक्रार इतकीच कीं, वे. इं.कार ही गोष्ट बहुत वेळा विसरतात. उ. त्यांचें शूद्र शब्दांवरील टिपण पाहा. तसेंच खालील टिपणें पाहा[1].

---

१ वर्ण :वर्ण इन् दि ऋग्वेद इज़ अयूज्ड् टु डिनोट् हासेस् ऑफ् मेन्, दि दास अँड् दि आर्य वर्ण बीइंग कॉन्ट्रास्टेड् ऑन् अकाउंट् ऑफ् कलर. दासः दि ग्रेट् डिफरन्स् बिट्वीन् दि दस्यूज् अँड् दि आर्यन्स वॉज़ देअर रिलिजन्; दि फॉर्मर् आर स्टाइल्ड् 'नॉट सॅक्रिफायसिंग', 'विदाउट् ऑफ् राइट्स', ॲडिक्टेड् टु स्ट्रेंज व्हूज', गॉड्-हेटिंग' अँड् सो फोर्थ.

दस्यु: इट् इज़ सिग्निफिकंट् दॅट् कॉन्स्टंट् रेफरन्स् इज़ मेड् टु दि डिफरन्स इन् रिलिजन् बिट्वीन् दि आर्य अँड् दि दस्यु.

ऋग्वेदांतील कृष्ण, कृष्णयोनि, कृष्णत्वक् व तत्सदृश विशेषणें व नामें आणि अनास, अमृध्र इ. शब्दांचा अर्थ न कळल्यामुळें किंवा जाणूनबुजून फिरविल्यानें हा सर्व घोटाळा झाला आहे. त्यांपैकीं कृष्ण वगैरे शब्द अलंकारिक अर्थानें योजलेले आहेत. त्यांच्या यौगिकार्थानें किंवा उत्तानार्थानें आणि अनास शब्दाच्या पाडलेल्या भलत्या घटकांनीं अर्थाचा अनर्थ करून सोडला आहे. हिंदुस्थानांतील चपट्या व नकट्या आणि त्याबाहेरून आलेल्या सरळ नाकाच्या व भिन्न भिन्न वंशांच्या आणि भिन्न वर्णांच्या लोकांमधील शस्त्रयुद्धाचा आणि लोकनाशाचा इतिहास वेदांत गोवलेला आहे, ही वृथा समजूत आमच्यांतील इतिहासकार व वेदार्थयत्नकार व वेदार्थप्रकाशक यांची पाश्चात्यांच्या वृथा अवडंबरानें किंवा त्यांच्या विवेचक व चिकित्सक पद्धतीनें झाली अशी आमची समजूत आहे. कृष्णत्वक् याशीं सापेक्ष असा सूर्यत्वक् असा शब्द त्यांचे लक्षांत आला नाहीं. दास नांवाचे लोक कानडी मुलुखांत आहेत असें वेदार्थयत्नकार एके ठिकाणीं दर्शवितात, तर दही म्हणजे दसी असा प्रांत प्राचीन भूगोलांत इराणाचे उत्तरेस दृष्टीस पडतो; परंतु तेच वेदांतले दास असें म्हणण्यास काय आधार आहे ? वेदांतील दासांचीं लक्षणें पाहून वेदांतील अर्थ निश्चित केले पाहिजेत. उपनिषदांत रमणीयचरण आणि कपूयचरण किंवा भगवद्गीतेंत पुण्ययोनि आणि पापयोनि असे दोन वर्ग केले आहेत, किंवा भारतांत

---

कृष्णत्वक् : मेटॅफोरिकालि दि टर्म इज् अप्लाइड् टु दि ॲबोरिजिनल् (?) एनिमीज् ऑफ दि इन्व्हेडिंग् आर्मीज्.

(यांतील प्रश्नचिन्ह आणि जाड टाईप आमचा. यांतील परस्परविरोध उत्तान आहे.) याचें तात्पर्य असें : वर्ण हा शब्द ऋग्वेदांत भिन्न भिन्न वर्ग दाखविण्याकरितां उपयोजितात. दास आणि आर्य वर्ण हे रंग भेदानें विरोधी आहेत. दास = दस्यु आणि आर्य यांजमधील महत्त्वाचा भेद म्हणजे त्यांचा धर्म. पहिले जे दास त्यांना 'अयज्वन्', 'अव्रत', 'अन्यव्रत', 'देवनिद्' इ. विशेषणें लावण्यांत येतात. दस्यु : आर्य आणि दस्यु यांजमधील धर्मभेदाचा नेहमीं दाखला देण्यांत येतो ही गोष्ट लक्षांत घेण्यासारखी आहे. कृष्णत्वक् अलंकारिक रीतीनें हा शब्द मूळ रहिवाशी व चाल्हून येणारीं जी सैन्यें त्यांचे शत्रूंस लावण्यांत येतो. ( मूळ भेदावरून उपमा म्हणून कीं धार्मिक दृष्टीनें म्हणून ! )

देवकाम आणि भोगकाम म्हटले आहेत ते हेच दोन वर्ग. अशाच प्रकारचे दोन वर्ग अवेस्तांतहि आढळून येतात. पाहा:

जगांतील लोकांचे कल्याणासाठीं तूं अहुरमझ्दा, मार्ग घालून दिला आहेस व नुकसान करण्यासाठीं वाईट मार्ग दाखविण्यासाठीं दुजाची (नरकाची) योजना केली आहेस. यस्न ४९.२ (ज्ञानकोश पाहा). याच स्वरूपाचें वर्णन वेदांत येतें, तें वर दिलेंच आहे (श्लो. सं. ८ व ९ पाहा.). भगवद्गीतेंत (१) सर्वभूतहितेरतिः असे (दैवी संपत्तीचे) आणि (२) 'प्रभवंति उग्रकर्माणः क्षयाय जगतोऽहिताः' ११६.९, पतंति नरकेऽशुचौ। १६.१६, यांति अधमां गतिम् ॥ १६.२०. असे आसुरी संपत्तीचे लोक वर्णन केले आहेत, तसेच हे दिसून येतात यांत शंका नाहीं. येट अशाच प्रकारचे दोन वर्ग प्राचीन इजिप्त देशांतहि आढळतात. पाहा:

On the one hand we see, alike in the pictured scenes in the native literary remains and in the accounts which foreigners have left us of the people (1) a grave and dignified race, full of serious and sober thought given to speculation and reflection, occupied rather with the interests belonging to another world than with those that attach to this present scene of existence and inclined to indulge in in a gentle and dreamy melancholy.

On the other hand there is evidence of a lightsome and joyous and even frolic spirit as pervading numbers especially among the lower classes of the Egyptians-gay-amusing, simple and fond of life and feeling a profound pleasure in existence. Far from desiring death they addressed prayers to preserve them a happy old age-a perfect term of 110 years. They gave themselves up to pleasures of every kind. Pp. 25 & 27; Ancient Egypt by Rawlinson.

सामर्थ्यांतस्वारमाणें या दोन प्रकारच्या लोकांना दोन भिन्न नांवें देतीं की काय आणि परस्परांना परस्परांत ओढण्याचा किंवा परस्परांपासून दूर ओढण्याचा प्रयत्न, एकमेकांमध्यें स्पर्धा, चढाओढ, द्वेष वगैरे उत्पन्न झाली होती की नाहीं समजण्यास मार्ग नाहीं.

कर्मक्रियाविभेदानें (भारत–वनपर्व) किंवा गुणकर्मविभागशः (भ.गीता) चातुर्वर्ण्य उत्पन्न झालें असें वर्णन भारतांत आलें आहे. ऋग्वेदांत दिसून येणारे आर्य आणि दास हे दोन वर्ण किंवा भेद अशाच प्रकारें पडले नाहींत कशावरून? ते भिन्न वंशाचे होते ही कल्पित कल्पना सोडून दिली, एक नाकेले आणि दुसरे अनास, एक शुद्ध संस्कृत बोलणारे व दुसरे म्लेच्छ-भाषी, एक गौर, एक कृष्ण या कल्पना अशास्त्रीय आणि असत्य किंवा चुकीच्या म्हणून सोडून दिल्या आणि त्यांऐवजीं एकाच समाजाचे–इराणी किंवा पर्शियन लोकांतल्या वरील वर्गाप्रमाणें–हे दोन विभाग आहेत व त्यांस आर्य आणि दास हीं नांवें पडलीं. परंतु वास्तविक ते प्रकृष्ट आणि निकृष्ट, उत्तर आणि अधर, निवृत्त आणि प्रवृत्त, जुने आणि नवे, कृष्ण आणि शुक्ल, नव्या आचाराचे पण शास्त्रीय आचारविचारांचे आणि जुन्या परंपरेचे पण अशास्त्रीय व अशुद्ध आचारविचारांचे असे दोन विभाग होते, असें मान्य करण्यास कांहींच हरकत नाहीं. दोघांमध्यें वर्णद्वेष ( colour prejudice ) नव्हता आणि परस्पर सर्वस्वी बहिष्कारहि नव्हता. या सर्व कल्पना पाश्चात्य असून भ्रामक आहेत आणि त्यांचें परक्यांविषयींचें जें अशुद्ध अंतःकरण त्याचें प्रतिबिंब आहे.

हिंदु प्रजा ही अयस्य व परस्य यांची मिश्र प्रजा आहे काय? आतां-पर्यंत केलेल्या विस्तारावरून आर्य आणि दास हे भिन्न वंशांचे लोक मानण्याचें कारण नाहीं, हें कोणालाहि दिसून येईल. त्यांच्यांत वर्णभेदच नव्हता तर वर्णद्वेष (colour prejudice) होता असें कसें मानतां येईल? पांडव आणि कौरव हे मातृव्य किंवा चुलत चुलत भाऊ. हे भिन्न प्रवृत्तींचे लोक आणि म्हणूनच श्रीकृष्ण दुर्योधनाला दस्यु म्हणतात. दस्यु या शब्दाचा दुष्ट हृदयाचा असाच अर्थ येथें अभिप्रेत आहे. भारताचार्य नानासाहेब वैद्य यांच्या मताप्रमाणें त्यांच्यांत वर्णद्वेषाचें विशाच खेळत होतें असें वाटत नाहीं. एकाच आईबापाचे पोटीं भिन्न भिन्न रंगांचे पुत्र होऊं शकतात, त्यांत पातिव्रत्यभंगाची अपेक्षा करण्याचें कारण नाहीं. "दोन कृष्णवर्णीय व्यक्तींना शुभ्रवर्णीय संतति होऊं शकते" असें व्हिटनें यानें बेसिस् ऑफ् ब्रीडिंग् या पुस्तकांत सिद्ध केलें आहे. याचे उलट दोन गौरवर्णीय व्यक्तींना कृष्णवर्णीय संतति होते असाहि आपला रोजचा अनुभव आहे. असा

स्थितींत ५०० वर्षांपूर्वी परस्थ गौर आणि अपरस्थ कृष्णवर्णीय लोक यांच्या मिश्रणानें आजची भिन्नवर्णीय प्रजा उत्पन्न झाली असें कसें सिद्ध होणार! वास्तविक आर्य गौर आणि दास कृष्ण हा सिद्धांतच खोटा व असत्य असें वर सिद्ध केलेंच आहे. परंतु क्षणभर तो मान्य केला तरी त्यांच्या संकराच्या वावर्तीत शेंकडों अडचणी दत्त म्हणून मनश्चक्षूंपुढें उभ्या राहतात. पांच हजार वर्षांपूर्वी-सुरू झालेल्या वर्णसंकरानें देखील कै. गोपाळराव गोखल्यांसारखा गौर वर्णाचा पुरुष उत्पन्न होतो किंवा श्री. गोपाळराव देवधरांसारखे सर्वच कृष्ण वर्णाचे लोक बनले नाहींत, ही गोष्ट काय दर्शविते? पांच हजार वर्षांपूर्वीहि असले भिन्न वर्णाचे लोक नसतील कशावरून! किंबहुना, होतेच असें उदाहरणांनींच दाखविलें आहे. मत्स्यगंधेचे पुत्र व्यास पण तेहि पाराशराप्रमाणेंच काळे! अर्जुन हा कुंतिइंद्रपुत्र तरी काळाच! पांडव हिमालयाच्या पहाडांतून आले आणि कोणाला माहीत कोणाचे पुत्र ते! पण द्रौपदी तर प्रत्यक्ष यज्ञकन्या, पण तीहि काळी! यज्ञकन्या ही कल्पना सोडली तरी द्रुपदाचें कूळ कांहीं पांडवांप्रमाणें हिमालयांतून आलें होतें कीं काय? तथापि हाहि प्रश्न अनिश्चित म्हणून सोडून देऊं. कौरव आणि पांडव हे भिन्न मार्गांनीं हिंदुस्थानांत थोड्या फार कालांतरानें आलेल्या आर्यांचे वंशज अशी कल्पना क्षणभर गृहीत धरली तरी अशी शंका घेतां येण्यासारखी आहे कीं, उत्तर ध्रुवापासून निघून भिन्न मार्गानें आलेल्या पण मूळच्या एकाच वंशांतील लोक, मधल्या कोणत्या देशांतील किंवा वंशांतील लोकांच्या संकरानें अल्पकालांत गौराचे अगदीं कृष्ण झाले असतील बरें? वर्ण–रंग–भेदाशिवाय दोघांच्या आचारविचारांत, संस्कृतींत, भाषेंत, पौराणिक कथांत फारसा भेद दिसून येत नाहीं, ही आश्चर्याची गोष्ट नाहीं काय? कौरव-पांडवांच्या पूर्वकालीं निदान हजार पांचशें वर्षांची तरी आर्यांची वसती या देशांत होती. त्यांचे पूर्वी निदान ५०० वर्षांपूर्वी झालेला सूर्यवंशीय श्रीराम श्यामवर्णाचाच होता आणि त्याचा भाऊ लक्ष्मण गौर वर्णाचा होता, ही गोष्ट लक्षांत घेतली म्हणजे वायव्येकडून आलेल्या सोमवंशीय (?) कौरवांतहि असे भिन्न वर्ण असलेच पाहिजेत असें ठरतें. अशा स्थितींत कौरव पांडवांत रंगभेद आणि वर्णद्वेष यांची कल्पना करतां येईल काय, अशी आमची नम्र शंका आहे.

उत्तर ध्रुवावरच किंवा तेथून हललयावर लवकरच आर्य आणि दास-

-योंच्या द्वेषास आणि युद्धास सुरुवात झालेली दिसते. तथापि क्षणभर अशी कल्पना करूं की, ते दास निराळे आणि हिंदुस्थानांतील दास निराळे; मात्र या कल्पनेला कांहीं प्रमाण नाहीं. ) तथापि आर्य हे दासांशीं सतत युद्धेंच करीत राहिले आणि अगदीं वीतन् वीत जागा त्यांना दासांशीं लढून सर करावी लागली. दोघांचा अतीव द्वेष आणि त्यांतून वर्णद्वेष असा वर्णद्वेष असूनहि त्यांनीं दासांशीं संकर करून प्रजा उत्पन्न केली असें समजावयाचें काय? वर्णद्वेष नसता आणि आनुवंशिक तत्त्व नसतें तर ही गोष्ट अशक्य झाली नसती. पण वर्णद्वेष जाज्वल्य असून आणि दासांचा (किंवा दस्यूंचा) सर्वतोपरि नायनाट व्हावा, ते अगदीं निपटून निघावे, ही बुद्धि असतांना—वेदांत अशी बुद्धि दर पानांत आढळून येईल—तसाच दासांचादि आर्यांविषयीं जळफळाट असतांना आर्यांनीं त्यांच्या स्त्रियांशीं संकर करावा ही कल्पना दुर्मीळ वाटते.

दास जर अनास तर आजची मिश्र प्रजाहि तशीच अनास निपजावयास नको काय? एका कृष्णवर्णाशिवाय आजच्या हिंदु म्हणविणाऱ्या प्रजेंत दासांचीं कोणतीं चिन्हें आहेत? दास म्हणजे द्रविड कीं मुंड? द्रविडांत अनास कितीसे आहेत? भिल्ल वगैरे लोकांत देखील थेट आर्यांसारखे नाकेले लोक कां सांपडावे? द्रविडांतहि गौर वर्णाच्या स्त्रिया कशा आढळाव्या? असे कित्येक प्रश्न या बाबतींत उपस्थित होतात. त्यांचीं समाधानकारक उत्तरें मिळणें कठीण दिसतें.

या सर्व भ्रामक कल्पना वर्ण शब्दाचा रंग असा चुकीचा अर्थ घेतल्यामुळें उत्पन्न होतात. अर्थात् तो अर्थ सोडून दिला म्हणजे भ्रमनिरास होतो. तसें करावयाचें म्हणजे वर्ण शब्दाचा रंग या अर्थाचा जो श्लोक महाभारतांत आढळतो व ज्याचा चातुर्वर्ण्याशीं संबंध तेथें जोडण्यांत आला आहे (ब्राह्मणस्य सितो वर्णः इत्यादि) त्यांतील कल्पनेचा निरास करतां आला पाहिजे. त्या श्लोकाचा निकाल अनेक प्रकारांनीं करतां येतो. (१) एक तर महाभारतांतील भृगुभार्गवसंवादांत जो निर्णय केला आहे तोच मानणें; म्हणजे श्लोकांतील रंग हे शरिराच्या बाह्य कातडीचे रंग असें न मानतां सत्त्वादि गुणांचे रंग मानणें किंवा (२) मानसिक शुद्धाशुद्धतेचे वर्ण—शुद्धाशुद्ध कर्मांचे परिणाम असें जें एक आवरण शरिराचे बाहेर वलय दिसतें,

त्याचा रंग जो किल्येक लोकांना व विशेषतः साधु पुरुषांना दिसतो, तो रंग असें मानावें. ( ३ ) मनुष्याच्या दोन नेत्रांच्या मध्यें कांहीं एका विशिष्ट याग-अवस्थेंत भिन्न भिन्न वर्णांच्या ज्योति आढळतात–त्यांना केव्हां केव्हां आत्मा असेंहि म्हणतात–त्या ज्योतीचा वर्ण त्या श्लोकांत वर्णिलेला आहे असें समजावें. अर्थात् हा वर्ण बाह्य चर्मचक्षूंनीं दिसणारा नसून अंतश्चक्षूंनें दिसण्यासारखा आहे. ( ४ ) चारहि वर्णांचे चार रंगांचे पोषाख असत असें वर्णन भारतांत आढळतें,[1] त्या पोषाखांचे रंगहि श्वेत, रक्त, पीत आणि कृष्ण असेच आहेत. तेव्हां त्या पोषाखांच्या रंगांची व या वर्णांची सांगड घालावी. द्रोणांचा पोषाख नेहेमीं शुभ्र असाच वर्णन केलेला आढळतो. श्रीकृष्णाचा 'पीतांबर' याच कारणामुळें येतो कीं नाहीं माहीत नाहीं; तथापि तें अशक्य नाहीं. प्राचीन इजिप्तमधील मनोऱ्यांतील एक चार रंगांचें चित्र टोपिनार्ड यानें आपल्या पुस्तकांत दिलें आहे. एक ग्रंथकार म्हणतो :

Whether assisted or not by archeology, Topinard says,in his anthropology, history narrates that under the twelfth dynasty about 2300 B. C. the Egyptians consisted of four races: (1) the Rot or the Egyptians *painted red* and similar in features to the peasants now living on the banks of the Nile; (2) theNamahu *painted yellow with the acquiline nose* corresponding to the population of Asia to the East of Egypt; (3) the Nahasu or *prognostics negroes* with wooly hair; (4) the Tamahu *whites* with blue eyes. ( इटालिक्स आमचें ).

सारांश, हे चार रंग पोषाखाचे असण्याचा पुष्कळ संभव आहे. वर्णसंकराचा परिणाम काय होऊं शकतो व तो आजच्या हिंदु प्रजेंत दिसतो काय ? अनार्य दास म्हणजे द्रविड कीं मुंड याचा अर्थात् निकाल अगोदर लागला पाहिजे. आर्यांचे पूर्वी द्रविड आणि द्रविडांपूर्वीचे खरे

[1] आश्वलायन सूत्रांत उपनयनकालीं चार वर्णांच्या बटूंना चार रंगांचे पोषाख असेंच सांगितलें असून मनु व याज्ञवल्क्य स्मृतींतहि तसेंच आढळतात.

मूळचे असत्य मुंड असा आजचा पाश्चात्यांचा सिद्धांत आहे. अर्थात्, दक्षिणी द्रविड आणि मुंड यांची संतति ते आजचे दक्षिणी द्रविड. आणि द्रविड आणि आर्य यांची संतति ते आजचे उत्तर हिंदुस्थानी, हिंदु आर्य आणि मुंड यांचाहि संकर झाला कीं नाहीं कोणास ठाऊक ? पण या काल्पनिक संकराचा निकाल लावण्यापूर्वी संकराचे परिणाम कोणते व्हावेत याविषयीं तज्ज्ञांची कल्पना पाहूं. आयझॅक् टेलर म्हणतो :

Mixed races are not so common as is sometimes supposed. They are found however in some parts of Europe especially in England, Normandy and Central Germany (shown by the existence of persons combining blue eyes with dark hair). How to explain the disappearance of intrusive races and reversions to primitive type ? In the case of conquest, *when two races are diverse* or where the environment favours one race more than the other, *it is found that the offspring are infertile, or that there is a tedency to revert to one of the* parent types.... *A mixed race may arise when the parent races do not very greatly differ. But this is not the case when the difference is great.* But even when a half-bred race has come into existence the tendency is to revert to one of the parent types.

—Isac Taylor: The Origin of the Aryans. (Pp. 197-199).

तर मग उत्तर ध्रुवाकडून आलेले आर्य आणि दक्षिणेकडील आणि भिन्न कटिबंधांतील दास यांची संकर प्रजा आज हजारोंच वर्षांनीं जिवंत दिसावी हा काय चमत्कार आहे ! का वरील ग्रंथकर्ता–आर्यांचें मूळ शोधून काढणारा–सपशेल चुकला ! असें समजतें कीं, इंग्लिशमन् जो आपली बायको पाळेतपणाकरितां इंग्लंडांत पाठवितो तो कांहीं केवळ खुषीनें पाठवीत नाहीं. इंग्लंडसारख्या थंड हवेतल्या मनुष्याची प्रजा हिंदुस्थानातल्यासारख्या उष्ण हवेंत उत्पन्न झाल्यास ती पहिल्या वीस वर्षांत फार दगावते; पुढें देखील या मुलांचें वीस वर्षांपर्यंतचें बरेचसे आयुष्य इंग्लंडमध्येंच शिक्षणाचे निमित्तानें जातें तें यामुळेंच. सारांश, वरील सिद्धांत बरोबर असेल तर आर्य प्रजा-

हिंदुस्थानांत नष्ट व्हावयास पाहिजे होती किंवा त्या आर्यांतील जे मुख्य गुण ते नष्ट होऊन द्रविडांचे ठिकाणीं मुंडांचे तसेंच आर्यांचे ठिकाणीं द्रविडांचे आणि मुंडांचे गुणदोष यावयास पाहिजे होते. परंतु अद्याप उत्तर हिंदुस्थानांतील हिंदु अव्वल दर्जाचा आर्य समजला जातो हा काय चमत्कार आहे? आर्यांआर्यांमध्येंहि लांबट चेहऱ्याचे आणि वाटोळ्या चेहऱ्याचे असे दोन भेद जगभर दिसून येतात, तसेंच येथेंहि दिसून येतात. त्यांजमधील पंजाबी, रजपूत आणि महाराष्ट्रीय यांजमध्यें अव्वल दर्जाचें क्षत्रियत्व आढळतें हें काय या आर्यभूचें कांहीं विशेष वैशिष्ट्य आहे? वर्णसंकरानें निदान वर्ण तरी सर्वांचा सारखा काळा व्हावा कीं नाहीं? हिंदुस्थानांत बाहेरून येणाराना सर्वच जर कृष्णवर्णाचे दास आढळले तर आजहि तेथें तसेच लोक असावे. किंबहुना त्यांना कृष्णवर्णाचे सर्व कां आढळावे? ऋग्वेदांत पंजाबापासून तों गंगायमुनांपर्यंतचे सर्व प्रांतांचें आणि हिमालयापासून विंध्याद्रिपर्यंतचें वर्णन आहे त्यांत सर्व एकजात कृष्णवर्णाचे लोक कां आढळावे? आणि सर्व अनासच आढळावे? उलटपक्षीं निदान असें धरून चालूं कीं, ४०००।५००० वर्षांनंतरहि मूळचा गौरवर्ण टिकून राहिला आहे तर असेंहि कां म्हणूं नये कीं, त्यापूर्वी ५००० वर्षें काळ्या रंगाचेहि लोक त्यांच्यांत असले पाहिजेत किंवा होते? असें अनुमानण्यास निदान हरकत दिसत नाहीं, किंवा जी गोष्ट आज ५००० वर्षांनींहि होऊं शकली नाहीं ती येथें आल्यानंतर थोडक्याच काळांत दिसूं लागावी हें आश्चर्य नव्हे काय? तसेंच कृष्णवर्णाचे लोक आर्यांत कांहीं तरी सांपडावे आणि पिशाच, राक्षस किंवा असुर लोकांतहि आर्यांसारखा 'पिंगी' रंग सांपडावा किंवा राक्षसांचा आणि पिशाचांचा एक वर्ण दिसून दोघांमध्यें वर्णभेद दिसायची मुष्कील असावी याचें कारण काय सांगतां येईल? सारांश, कोणत्याहि दृष्टीनें पाहूं गेलें तरी वर्णभेदाची कल्पना मान्य करणें दुरापास्त आहे.

---

# चातुर्वर्ण्याचा इतिहास किंवा विकास

## एक व दोन वर्ण[१]

**विषयप्रवेश**

१. 'चातुर्वर्ण्य' या शब्दांतील वर्ण शब्दाचा रंग असा जो अर्थ करण्यांत येतो तो आणि त्या अर्थावरून बांधलेली अनुमानें अनेक दृष्टींनीं विचार केला तरी कशीं चुकीचीं आहेत हें येथवर दाखविलें. आतां वर्ण शब्दाचा अर्थ निवड असा होऊं शकतो आणि तसा अर्थ केल्यास परंपरागत प्रमाणांनीं चातुर्वर्ण्य कसें व केव्हां सिद्ध झाल्याचें दिसतें, अर्थात् त्याचा विकास कसकसा झाल्याचें दिसून येतें तें या विभागांत पाहावयाचें आहे; तसेंच चातुर्वर्ण्य हें एकाच समाजाचें विभजन आहे किंवा भिन्न भिन्न समाजांचें एकीकरण आहे याचाहि विचार करावयाचा आहे.

**पूर्वाचार्यांच्या कल्पना**

२. पूर्वाचार्यांनीं या बाबतींत विचार केलेला होता असें आढळून येतें. सृष्ट्युत्पत्तीबरोबरच एकदम चातुर्वर्ण्य सिद्ध होतें असें ते म्हणत नाहींत. असा एक काळ होता किंवा असला पाहिजे, कीं ज्या वेळीं मुळींच वर्ण नव्हता. अशा समाजाला ते एकवर्णी किंवा 'ब्राह्म' समाज म्हणतात ( महाभारत. वरील श्लोक पाहा. ).

तथा कृतयुगे पूर्वें एकवर्णमभूत्किल ।

वास्तविक 'एकवर्ण' या शब्दाला अर्थच नाहीं. एकवर्ण याचा अर्थ अवर्ण किंवा अविभक्त समाज. हा कृतयुगांत होता असें येथें सांगितलें आहे. कृष्णवर्ण हा पापाचा द्योतक. कृतयुगांत धर्म 'चतुष्पाद' होता म्हणतात. याचा अर्थ त्या वेळीं पाप उत्पन्न झालें नव्हतें; म्हणजे पापाची

---

१ न विशेषोऽस्ति वर्णानां सर्वं 'ब्राह्मं' इदं जगत् ।
ब्रह्मणा पूर्वसृष्टं हि कर्मभिः वर्णतां गतम् ॥ महाभारत

समाज एकजिनसी असें म्हणतां आलें, तरी केवळ हिंदु समाजाकडे पाहिलें म्हणजे तो इतका पिजलेला आणि विभागलेला दिसतो, की त्यास एकजिनसी समजणें वेडेपणाचें होईल. असाच चातुर्वर्ण्यघटित होणारा समाज अविभिन्न ( unclassified ) पण भेदपात्र होता. मग त्यास एक जिनसी म्हणा वा न म्हणा !

५. अशा या समाजाचे प्रथम दोन विभाग झाले. त्यांतून देवसमाज म्हणून एक विभाग बाहेर पडला. ताण्ड्य ब्राह्मणांत सांगितलें आहे कीं, देव हे मूळ मानव; पण ते 'कर्मा'नें देव झाले व स्वर्गी किंवा उच्च लोकीं गेले. त्यांना 'यज्ञियासः' असें वेदांत म्हटलें आहे.

**प्रथम दोन विभाग : असुर व देव**

यज्ञेन यज्ञमयजंत देवाः तानि धर्माणि प्रथमानि आसन् ।
ते ह नाकं महिमानः सचंत यत्र पूर्वे साध्याः संति देवाः ॥ १०-९०-१६

यज्ञ हाच पहिला आणि श्रेष्ठ धर्म. जेथे पूर्वीच साध्य देव होते तेथें हे यज्ञ करणारे देव स्वकर्मानें मोठा महिमा प्राप्त होऊन स्वर्गी गेले. सह वै देवानां चासुराणां यशो प्रततावास्ताम् ते. आ. २.१ · सहपुत्तचौरो·

## देवांत प्रथम चातुर्वर्ण्य

देवांत चातुर्वर्ण्य

६. देवांत प्रथम चातुर्वर्ण्य उत्पन्न झालें असें बृहदारण्यकोपनिषदांत सांगितलें आहे. आसुर समाजापासून भिन्न झाल्यामुळें आणि आसुर 'द्रोही' असल्यामुळें त्यांना संरक्षणाची प्रथम काळजी पडली. हें 'परलोक तत्त्व' नवीन निघून देव मूळ समाजांतून बाहेर पडले व स्वतःस श्रेष्ठ म्हणवूं लागले. तें असुरांस सहन न झाल्यामुळें त्यांच्या ठिकाणी द्रोह उत्पन्न झाला. दोघांमध्यें मोठेपणाविषयीं स्पर्धा उत्पन्न झाली. देवसमाज तेजस्वी, पण लहान. तेव्हां देवसमाजांत त्याचे संरक्षणार्थ क्षत्रिय देव आणि समाजपोषणार्थ वैश्य देव आणि तो समाज स्वयंपूर्ण व्हावा म्हणून पोष्य असा पूषा देव मिळून देवांचें चातुर्वर्ण्य बनलें, तेव्हां देव वैभवसंपन्न झाले अशी कथा आहे. मानवांत पुढें जें चातुर्वर्ण्य उत्पन्न झालें त्याचा हा जणुं काय आराखडा तयार झाला. किंवा मानवांच्या चातुर्वर्ण्यावरून देवांतील चातुर्वर्ण्याची कल्पना केली म्हणा.

पुत्रकामो यजेत, स्वर्गकामो यजेत ।

७. पुढें पितर उत्पन्न झाले. त्यांचा इतिहास कोठें वर्णिलेला असा आढळत नाहीं, तथापि ते महान् ऋषि किंवा सप्तर्षि. ते देवांच्या पावलावर पाऊल टाकून दिव्य होऊन स्वर्गी गेले. त्यांचेमागून मानव लोक असुरांतून वेगळे निघाले. जसे देव आणि पितर तसेच पितरांचे वंशज जे मानव तेहि इहलोक व पारलौकिक कल्पनेनें यज्ञसंपादकच. देव, पितर आणि मानव हे सर्व यज्ञिय किंवा यज्ञसंपादक आणि ऋतज्ञ किंवा यज्ञ जाणणारे म्हणून प्रसिद्ध आहेत. यज्ञसंपादन करावयाचा तो एक तर मुख्य जे द्युलोकांतील देव (देवांचेहि), कीं ज्यांपासून सर्व प्रकारचें वैभव आपणांस प्राप्त होतें, त्यांच्या संतोषाकरितां, प्रजोत्पत्तीकरितां आणि तो 'इष्टकामधुक्' म्हणून

> सहयज्ञाः प्रजाः सृष्ट्वा पुरोवाच प्रजापतिः ।
> अनेन प्रसविष्यध्वम् एष वोऽस्तु इष्टकामधुक् ॥
>
> भ. गीता. ३ १०

कल्पनाच उत्पन्न झाली नव्हती. तर मग पापाकडे कोणाची प्रवृत्ति झाली असें कसें म्हणतां येईल ? सर्वच लोक निष्पापी अर्थात् गौरवर्ण होते. गौर हा जसा पवित्र्याचा तसाच पुण्याचा वर्ण होय.

> एकवर्णम् इदं सर्वं विश्वमासीद् युधिष्ठिर ।
> कर्मक्रियाविभेदेन चातुर्वर्ण्यं प्रतिष्ठितम् ॥
>
> श्रीमहाभारत, वनपर्व अ. १८०

> एक एव पुरा वेदः प्रणवः सर्व वाङ्मयः ॥
> देवो नारायणो नान्य एकोऽग्निः वर्ण एव च ॥
>
> श्रीमद्भागवत ९-१४

यांपैकीं भागवतांतील श्लोकानें या एकवर्णाचें स्वरूप कळतें, तर भारतांतील श्लोकानें चातुर्वर्ण्याचें स्वरूप समजतें. चार वेदांचे ठिकाणीं एकच वेद असें मानीत; संहिता सर्व एकत्र होती, आजच्याप्रमाणें ऋड्मंत्र, याजनमंत्र, गानमंत्र आणि अभिचारादि मंत्र असें पृथक्करण त्यांत झालें नव्हतें. वाङ्मय सर्व प्रणवरूपाचें किंवा मंत्ररूपाचें होतें, त्यांत भिन्न प्रकार उत्पन्न झाले नव्हते, अनेक देव असले तरी किंवा ते बनण्यापूर्वी सर्व देवांचें स्वरूप सारखेंच दिसे[1], अग्नि दर्शाप्रमाणें तीन किंवा पांच उत्पन्न झाले नव्हते आणि वर्णहि भिन्न झाले नव्हते; सर्व समाज अभिन्न होता. पुढें चातुर्वर्ण्य उत्पन्न झालें तें (१) कर्मक्रियाविभेदानें किंवा (२) श्रमविभागाचे तत्त्वावर.

**वर्ण म्हणजे रंग नव्हे**

वर्ण शब्दाचा शारीरिक रंग असा अर्थ घेतां येईल काय ? सर्व पृथ्वीभर कधीं काळीं एकाच रंगाचे लोक असतील अशी कल्पना करतां येईल काय ? मानवांचें मूलस्थान एकच अशीसुद्धां कल्पना करतां येत नाहीं, त्याप्रमाणेंच मानवांचा रंग एकच अशी कल्पना करतां येत नाहीं. भिन्न भिन्न स्थळीं भिन्न भिन्न वर्णांचे व वंशांचे लोक उत्पन्न झाले अशीच आज समजूत आहे, व ती बरोबर आहे. अर्थात् वर्णांचा रंग हा अर्थ सोडून विभाग हाच अर्थ घेतला पाहिजे. चातुर्वर्ण्य बनण्यापूर्वीचा

[1] एकं सद्विप्रा बहुधा वदंति ॥ ऋ. १-१६४-४६

पण त्याचीं बीजें अंतर्गत असलेला असा हा अवर्णी किंवा अभिन्न समाज, कीं जो पुढें चार वर्णांत विकास पावला. हा विकास कर्मभेदानें झाला, रंगभेदानें नव्हे, असाच इशारा येथें दिला आहे.

३. येथें एका वर्णावरून जी चार वर्णांवर उडी मारली आहे, त्याचा अर्थ इतकाच कीं, हे ग्रंथ चातुर्वर्ण्यप्रतिष्ठित झाल्यावर झाले. त्यांना दोन किंवा तीन वर्णांपेक्षां एकदम चार वर्णांची उपपत्ति सांगण्याची आवश्यकता भासली. मधल्या पायऱ्यांवर ते अडखळले नाहींत. तथापि विभजन म्हणजे एकाचे दोन, नंतर तीन व पुढें चार, पांच असे वर्ण बनले असें म्हणणें सयुक्तिक होय. वास्तविक दोन वर्ण झाले ते वृत्ति ( प्रवृत्ति आणि निवृत्ति ) भेदानें झाले, हें मागील विभागांत दिसून आलेंच आणि पुढेंहि दिसून येईलच. तथापि त्रैवर्ण्य आणि चातुर्वर्ण्य हें वरील दोहोंपैकीं एकाच समाजांत प्रथम घडून आलें असें दिसून येतें. मूळच्या या अवर्णी किंवा एकवर्णी समाजाला 'ब्राह्म' असें भारतांत व बृहदारण्यकोपनिषदांत आणि 'आसुर' असें पुराणांत व भारतांत म्हटलें आहे. पुढें विभिन्न होणाऱ्या या समाजास आपण अविभिन्न ( unclassified ) असें म्हणूं.

एकावरून चार वर्णांवर उडी

## एकजिनसी ( होमोजीनिअस ) समाज ?

४. समाजाच्या विभेदपूर्व स्थितीला आसुर व ब्राह्म, अशीं नांवें पूर्वाचार्यांनीं दिलीं आणि भेदपूर्व पण भेदपात्र म्हणून अ'विभिन्न' असें आम्हीं म्हटलें. परंतु कित्येकांचा असा प्रश्न आहे कीं, हा समाज एकजिनसी होता कीं नव्हता ? आमच्या समजुतीनें समाजाच्याकडे पाहण्याच्या या दोन भिन्न दृष्टि आहेत. एक अंतर्मुख आणि दुसरी बहिर्मुख. याह्य समाजाच्या सापेक्षतेनें जो समाज एकजिनसी म्हणतां येईल तो अंतर्मुख दृष्टीनें तसा दिसणार नाहीं. उ. आजचा हिंदु समाज घ्या. हिंदेतर किंवा हिंदेतर ( हा प्रयोग अशुद्ध असला तरी रूढ आहे. ) समाजाच्या दृष्टीनें हिंदु

समाज एकजिनसी कीं भिन्नजिनसी ?

देवान्भावयतानेन ते देवा भावयंतु वः।
परस्परं भावयंतः श्रेयः परं अवाप्स्यथ ॥ किता ११
इष्टान्भोगान् हि वो देवा दास्यंते यज्ञभाविताः।
तैर्दत्तानप्रदायैभ्यो यो भुंक्ते स्तेन एव सः ॥ किता १२
यज्ञशिष्टाशिनः संतो मुच्यंते सर्वकिल्बिषैः ।
भुंजते ते अघं पापा ये पचंत्यात्मकारणात् ॥ किता १३

या भगवद्गीतेतील श्लोकांत देव, मानव आणि असुर यांजमधील संबंध आणि यज्ञाची आवश्यकता यांचें वर्णन आहे. ऋ. ८. १४. ४, ५, ६, यांतहि थेट असेंच यज्ञासंबंधींचें वर्णन आहे :

न ते वर्ताऽस्ति राधसः इन्द्र देवो न मर्त्यः।
यत् दित्ससि स्तुतो मघम् ॥ ४
इष्टकामो यजेत यज्ञः इंद्रं अवर्धयत् यत् भूमिं वि अवर्तयत्।
चक्राणः ओपशम् दिवि ॥ ५

वावृधानस्य ते वयं विश्वा धनानि जिग्युषः।
ऊतिं इन्द्राऽवृणीमहे ॥ ६

अर्थः—हे इंद्रा, तूं जी संपत्ति देतोस ती परतविणारा देवांत अगर मानवांत कोणी समर्थ नाहीं. ती शाश्वत असते. तूं जी संपत्ति देतोस ती तुझी स्तुति करून तूं संतुष्ट झालास म्हणजे देतोस. यज्ञानें तूं संतुष्ट होतोस ( यज्ञ तुला वाढवितो ). तसा संतुष्ट झालास म्हणजे तूं भूमीला तोच संतोष परत करतोस. ( कसा पाहा )–तू आकाशांत मेघ उत्पन्न करून ( आकाशांतील मेघ हे तूं संतुष्ट झाल्याचें चिन्ह. तोच तुझा प्रसाद ). तुला संतोष झाला असतां-तूं प्रसादयुक्त झाला असतां-सर्व प्रकारचें इष्ट धन किंवा यच्चावत् व इष्ट अशी ऐहिक संपत्ति प्राप्त होते. करितां हे इंद्रा, तुझे कृपाप्रसाद आम्ही इच्छितों.

अशाच प्रकारचें इंद्रसंतोषाचें वर्णन पुढें त्या सूक्तांत असून अखेरच्या दोन ऋचांत यज्ञ न करणाऱ्या असुराचें वर्णन आहे तें असें :

मायाभिरुत् सिसृप्सतः इन्द्र द्यां आरुरुक्षतः । अव दस्यूँरधूनुथाः ॥
८.१४.१४

अशुन्वा इन्द्र संछदं बिभृर्वा वि अनाशयः । सोमपाः[1] उत्तरो भवन् ॥
किंवा १५

अर्थः — ( यज्ञप्रसादाची ही सरळ कल्पना सोडून ) आपल्या स्वबुद्धि-सामर्थ्याच्या बळावर ( माया ) चालणारे आणि त्यांनीच द्युलोकापर्यंत चढूं इच्छिणारे जे दस्यु त्यांना हे इन्द्रा, तूं (अखेर) खाली (फुंकूनी) टाकलेस, ( त्यांना मरणोत्तर गति मिळाली नाहीं ). ते ( सोम पिऊन ) यज्ञ न करणारे जे ( दस्यु ) त्यांच्या टोळ्या ज्यांनीं सर्व जग व्यापलें आहे, त्यांचा तूं नाश करतोस, आणि सोम पिणारे किंवा यज्ञ करणारे जे ( आर्य ) तेच वर चढले ( नष्ट न होतां उच्च लोक प्राप्त करते झाले आणि त्यामुळें श्रेष्ठ ठरले ).

भगवद्गीतेतील वर जे श्लोक उद्धृत केले आहेत, त्यांत हेंच सांगितलें आहे. अशुन्वन् या विशेषणाची तेथें फोड केली आहे. ' अशुन्वन् ' म्हणजे यज्ञ न करतां, देवांना संतुष्ट न करतां, जे ऐहिक भोग स्वतः मिळविले असें समजून केवळ स्वतःकरितांच ते केवळ उपभोग्य विषय आहेत, असें समजून उपभोगतात व त्यांतच दंग होतात तेच, स्तेन म्हणजे असुर, तेच अघ व तेच पापी म्हणजे असुर आणि जे देवांना अर्पण करून अवशिष्ट किंवा देवांचा प्रसाद म्हणून–' ईशावास्यं इदं सर्वं यत्किंच जगत्यां जगत् ' तेन त्यक्तेन भुंजीथाः मा गृधः कस्य स्विद्धनम् ॥ यजुर्वेद ४०·१. सर्वच देवाचें, आपलें कांहींच नाहीं, असें समजून उपभोग घेतात ते पापापासून मुक्त होतात आणि यथोचित स्वर्गीय उपभोगाला किंवा मोक्षाला पात्र होतात व म्हणून सर्वांत श्रेष्ठ ठरतात. दैवी संपत्तीची ही अखेर होय. स्वर्ग शब्दांत ' स्वर्ग लोक ' आणि ' मोक्ष ' अशा दोन्ही गोष्टींचा समावेश होतो.

---

१ येथें ' सोमपाः ' लोकांची ' अशुन्वन् ' लोकांशीं तुलना केली आहे हें उघड आहे. त्यामुळें ' सोमपाः ' या शब्दाचा ' इंद्र ' हा अर्थ मान्य करतां येत नाहीं. सोमपाः म्हणजे सोमयज्ञ करणारे ब्राह्मण. ( २ ) असुर मुळींच यज्ञ करीत नसत असाहि अर्थ घ्यावा असें वाटत नाहीं. असुरांत कांहीं यज्ञ करीतच, व कांहीं पुढें करीतनासे झाले असावेत. सर्वांचा स्वपराक्रमावर आणि सर्व जग आपल्या उपभोगार्थ आहे या कल्पनांवर अधिक भर इतकाच अर्थ.

## दोन वर्णांची उत्पत्ति

८. अशा प्रकारानें मूळ आसुर किंवा ब्राह्म किंवा अविभक्त समाजांत स्वर्गकामयशसंपादनामुळें भेद उत्पन्न होऊन दोन वर्ण उत्पन्न झाले. त्यांनाच देव आणि असुर, मानव आणि असुर, दस्यु किंवा दास अशीं नांवें पडलीं. याकरितांच

दोन भेद

*विजानीहि आर्यान् ये च दस्यवः ॥ ऋ. १.५१.८*

न यो रर आर्यं नाम दस्यवे ॥ ऋ. १०.४९.३

अशीं सूक्तें उत्पन्न झालीं. त्यांचें विवरण पूर्वीं केलेंच आहे. आर्य आणि दस्यु केवळ मर्त्य या दृष्टीनें एकच. पण जे सर्व ईश्वराचें असें समजून त्याचें प्रथम यजन करून त्याच्या प्रसादाची अपेक्षा करतात ते आर्य आणि जे स्वतःच्या उपभोगार्थ सर्व सृष्टि आहे, करितां स्वसामर्थ्यानें ती प्राप्त करून घेऊन 'खावें, प्यावें, चैन करावी' अशी ज्यांची भावना व वृत्ति आहे ते असुर हें जाण; आर्य व दस्यु हे एक नव्हत; त्यांच्यांत भेद कर; एक समजूं नको आणि

बर्हिष्मते रंधय ॥ १.५१.८

बर्हिष्मत् जो आर्य त्याकरितां जो अयज्ञिय आहे त्यास आपले स्वाधीन करून घे.

नीचशाख व उच्चशाख

किं ते कृण्वंति कीकटेषु गावः नाशिरं दुह्रे न तपंति घर्मम् । आ नो भर प्रमगन्दस्य वेदो नैचाशाखं मघवन् रंधया नः ॥ ऋ. ३.५३.१४

अर्थ :— कीकट म्हणून जो देश किंवा लोक आहेत त्यांतील गाई कार्य करतात ? ना घट आशिराकरितां दूध देत कीं घर्म तापवीत नाहींत. करितां हे मघवन्, त्या प्रमगन्दाचें धन — गोधन, त्या नीचाशाखाचें धन, आपल्या स्वाधीन करून घे ( व आम्हांस दे ).

यांत 'नीचशाख' असें कीकटस्थांचें वर्णन आहे. नैचाशाखः = नीच शाखाचें. नीचाशाख म्हणजे शूद्रिणींची संतति असा अर्थ सायण देतात-

मग तो अर्थ क्षणभर सोडून दिला तरी नीचशाख किंवा नीचवंश असा अर्थ दुर्गाचार्य करतात. किंवा 'नीचैः शाखः' असा अर्थ यास्काचार्य करितात. तेथील लोक नीचशाखेचे अशी समजूत आणि अर्थातच आपण स्वतः उच्चशाखेचे असें यांत गृहीत धरलेलें दिसतें. सारांश, आम्ही जी अधरोत्तरता मागील विभागांत दाखविली तीच येथें वर्णिलेली आहे.

हें वर्णन विश्वामित्रसूक्तांतलें अर्थात् फार प्राचीन आहे. या वेळीं कीकटांत नीचशाखांची स्वतंत्र वसती झालेली होती. परंतु उच्चशाख असे आर्य कोठें होते? ते पंजाबांत होते काय? याच सूक्तांतील ११ व्या ऋचेंत सुदासाचें यज्ञाकरितां अश्व मोकळा सोडण्याविषयीं आज्ञा आहे. आणि तो यज्ञ होण्यापूर्वी पूर्व, उत्तर आणि पश्चिम या दिशांकडील लोकांवर दिग्विजय करावयाचा आहे. याचा अर्थ होतो कीं, सुदास पश्चिमेकडे नसून दक्षिणेस आहे.

नीचशाख आणि उच्चशाख असें वर्णन आढळतें; अगदींच भिन्न वंशांतले मानव असें समजत नाहींत. नीचशाख असें म्हणण्याचें कारण शूद्र संतति असें न मानलें तरी यज्ञिय आणि अयज्ञिय असें तरी मानलेंच पाहिजे. दुसरें वर्णन 'प्रमगंद' या स्वरूपाचें आहे. (१) प्रमगंद म्हणजे मगदाचे किंवा मगंदाचे वंशज असा होण्यासारखा आहे. कीकटांत मगदाचे वंशज राहात असावे. कीकटास 'मगध' असें दुसरें नांव आहे; त्यावरून हा मग लोकांनीं वसविलेला देश असावा. हे मग सूर्योपासक ब्राह्मण पण आर्यांपासून कांहींसे भिन्न. त्यांना आर्यांनीं नीच म्हटलेलें संभवतें. 'ते यज्ञियार्थ कर्म करीत नाहींत व धन वेंचीत नाहींत. आम्हांस त्यांचें धन मिळाल्यास आम्ही तें यथार्थ खर्च करूं' असा ऋचेचा अभिप्राय दुर्गाचार्य देतात किंवा (२) प्रमगंदः, प्रमदकः, यो अयमेव अस्ति लोकः न परः-असा दुसरा अर्थ यास्काचार्य देतात. परलोक नाहींच अशी ज्यांची समजूत अर्थात् जो विषयपर किंवा खावें, प्यावें, चैन करावी असे प्रवृत्तिपर (epicureans) नास्तिक लोक. सारांश, यांतील दोन वर्ग आम्ही म्हणतों त्या प्रकारचेच म्हणजे एक निवृत्तिपर (प्रवृत्तिपरः कर्मकांडांतील कर्म-केवळ ऐहिकपर) किंवा उत्तर आणि दुसरे (प्रवृत्तिपर) किंवा अधर असे लोक असून ते प्रवृत्तिपर लोक नीच व स्वतंत्र राहात होते

किंवा आर्यांपासून विभक्त झाले होते ही गोष्ट खास. आर्यांना व दस्यूंना ओळख असें म्हणण्याचें कारण 'वरून दिसायला आर्य पण पोटीं उमाळा दस्युत्वाचा' असे दासांचे 'पार्टीशखे' दांभिक लोक प्रत्येक समाजांत असावयाचेच. आणि अशा दांभिक पृष्ठांचा नाश व्हावा (१०.८७.१०) अशीच इच्छा असल यांशियांची असल्यास नवल नाहीं. शांतिपर्वांत भीष्माचार्यहि यांचा उल्लेख करतात. भारतकार या लोकांना 'मोगकाम' असें म्हणतात. आर्य आपल्याला 'देवकाम' म्हणत. त्याविरुद्ध हे 'मोगकाम' लोक.

९. आर्य आणि दास–निवृत्तिपर आणि प्रवृत्तिपर–यांचा भेद वाढत जाऊन जसजसा धार्मिक व श्रद्धावान् मनुष्य वाढत गेला तसतसा आर्य दासास अनार्य, नीच असें लेखूं लागला व त्यांवर सत्ता गाजवूं लागला. तथापि परस्परसमावेश

**दोन वर्णांत परस्परसमावेश-शक्यता**

अशक्य नव्हता, असें

आर्यंयत इंद्र नः स्वस्ति शत्रुतूर्याय बृहतीं अमृध्राम् ।
*यया दासानि आर्याणि वृत्रा करो ॥ ६.२२.१०*

या ऋचेवरून दिसून येतें. ही ऋचाहि प्राचीनच आहे. दोघांमधील ध्येयभिन्नत्वामुळें दोघे भिन्न झाले होते. आजचें उदाहरण घ्यावयाचें झाल्यास अलीकडील राजकीय पक्षोपपक्षांचें घेतां येईल. स्वातंत्र्यवादी, स्वराज्यवादी, राष्ट्रीय, मवाळ, कट्टर, चौफेर, अत्याचारी, अनत्याचारी असे अनेकविध भेद आपल्यांत आज आहेत. प्रत्येकांत मानसिक व ध्येयभेद आहेत. सहसा एका पक्षातील मनुष्य दुसऱ्या पक्षांत जाणार नाहीं; तथापि तसें होणें अशक्य नाहीं. इरसाल मवाळ जहाल होऊं शकणार नाहीं किंवा अस्सल जहाल मवाळ होणार नाहीं; परंतु उदासीन असलेला मनुष्य किंवा दोहींकडे नजर देणारे लोक असूं शकतातच. अशाच प्रकारानें आर्यांचा दास किंवा दासांचा आर्य तत्कालीं होत असावा. दोघांतील फरक आणि परस्पर बदल होण्याची युक्ति वरील ऋचेंत दिलेली आढळते. दास, दस्यु आर्य होऊं शके या गोष्टीचा अर्थ फार खोल आहे. त्यामुळें अनेक तर्क-कुतर्क नाहींसे व्हावयास पाहिजेत आणि वर्णभेदा(रंगभेदा)ची सर्व भूमिका

दासळलाच पाहिजे. दासाचा आर्य तसाच आर्याचा दास होऊं शके. ब्रह्मबंधु व राजन्यबंधु हीं अशींच उदाहरणें. येथवर केलेल्या विवेचनाचा सारांश खालील तक्त्याचे स्वरूपांत कोणाच्याहि चटदिशीं ध्यानांत यावा म्हणून देत आहों.

ब्रह्म, आसुर किंवा पुराणा व अविभक्त एकवर्णी समाज

| | |
|---|---|
| देव, पितर, मानव, अमृध्रवदित— मागणारा आर्य व उच्चशाख किंवा उत्तर. | असुर, दास, दस्यु, मृध्रवाक्, नीचशाख किंवा अधर. |

मागील विभागांतील पा. ४८ वर जें कोष्टक दिलें आहे, त्यावरून या दोन समाजांची किंवा वर्णांची चांगली कल्पना येईल.

दोन वर्ण : धीर व अधीर, निवृत्त व प्रवृत्त

१०. ऋग्वेदांत दोन वर्णांचा आणखी एक उल्लेख आहे. त्यावरून वरील अनुमानास चांगलीच बळकटी येते. तो उल्लेख असा :

अगस्त्यः खनमानः खनित्रैः प्रजां अपत्यं बलमिच्छमानः ।
उभौ वर्णौ ऋषिरुग्रः पुपोष सत्या देवेषु आशिषो जगाम ॥ ऋ. १.१७९.६

अर्थ:— खनित्रांनीं खणणारा अगस्त्य प्रजा, अपत्य आणि बल यांची अपेक्षा करीत होत्साता असा उग्र ऋषि, त्यानें (या प्रकारें) दोनहि वर्णांचा उत्कर्ष केला (सांभाळला) आणि त्यानीं अक्षय ठिकाणें जे देवांचे आशीर्वाद किंवा प्रसाद ते प्राप्त करून घेतले. यांत ज्या दोन वर्णांचा उल्लेख आहे ते दोन वर्ण कोणते ? याच सूक्तावरून त्यांची कल्पना करता येण्यासारखी आहे; ती प्रथम पाहूं. यावरील ४ थी ऋचा अशी :

[1]धीरं अधीरा धयति श्वसंतम् ॥ ऋ. १.१७९.४

यांत धीर किंवा संयमी आणि अधीर असे दोन वर्ण सूक्तकारानें सांगितले आहेत. या ठिकाणीं वर्ण=रंग हा अर्थ करण्यास सबबच ठेवलेली

---

[1] धीर = बुद्धिमान्.

नाहीं, तरी के. पंडितांनीं मराठी भाषांतरांत नाहीं तरी इंग्रजी भाषांतरांत Benefited with the colours 'दोनहि रंगांच्या लोकांचें हित साधलें' असा पूर्वग्रहदूषित अर्थ ठोकून दिला. तथापि मराठींत नेहमींच्या वहिवाटीस अनुसरून टीपहि दिली नाहीं.

धीर म्हणजे विशेष संयमी. अर्थात् निवृत्त. विकार हेतौ सति, विक्रियंते येषां न चेतांसि त एव धीराः । अशी कुमारसंभवांतील व्याख्या थोडक्यांत व सुंदर आहे. अर्थात्, अधीर म्हणजे ज्यांना इतका संयम नाहीं अशी. निवृत्तिमार्गी धीर आणि प्रवृत्तिमार्गी अधीर यांमध्यें जणुं काय स्पर्धा चाललेली होती. पण 'अखेर धीर ऋषि जिंकला गेला' अशी खोडसाळ किंवा कुत्सित टीका वे. य.कारांनीं फिरून केली आहे ( ऋषि finally yielded to temptation! ). कथा अशी कीं, अगस्तींनीं लोपामुद्रेला कित्येक वर्षें मतस्थ राहावयास लावलें. मतोद्यापनांत स्त्रीस्वभावी भावनाप्रधान लोपामुद्रा अधीर झाली व तिनें ऋषीला आपला मनोदय कळविला. ऋषि नंतर तिजशीं संगत झाला! यांत उग्र किंवा धीर 'अखेर मोहवश झाला–finally yielded to temptation' असा अर्थ आहे कोठें? ऋषीनें कांहीं जन्मांत कधीं स्त्रीउपभोग घेणार नाहीं, अशी भीष्मप्रतिज्ञा केली होती काय? संयमी या दृष्टीनें त्यानें स्वतः अधीर न होतां स्त्रीची इच्छा पुरवली यांत चुकलें कोठें? लोपामुद्रेची इच्छा तृप्त करण्यांत दोघांचाहि हेतु पूर्ण झाला ( उभौ वर्णौ पुपोष ). अर्थात भावनाप्रधान स्त्री मतान्तापर्यंत संयमी राहिली आणि मताच योगानें प्राप्त होणाऱ्या सामर्थ्यामुळें दोघांना इष्ट फलप्राप्ति झाली इतकाच अर्थ. यांत अश्लील भाग तो काय आहे?

सूर्त विचाराचा मुद्दा इतकाच कीं, यांतील दोन वर्ण कोणते? सूक्तांत दर्शविलेले धीर उग्र संयमी ( किंवा निवृत्तिपर ) आणि अधीर कीं ब्राह्मण आणि क्षत्रिय? येथें ब्राह्मण व क्षत्रिय असे उल्लेख नाहींत ही विशेष लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे. यावरून चातुर्वर्ण्यांतील ब्राह्मणादि नांवें पडण्यापूर्वीचा हा ऋचा आहे असें दिसून येतें. ब्राह्मण आणि क्षत्रिय असे वर्ण पौराणिक कथेचा अवलंब केल्यावांचून मानतां येत नाहींत. पौराणिक कथेचा अवलंब केल्यास ब्राह्मण अगोत व

क्षत्रिय लोपामुद्रा असें मानतां येईल. पण मग इतक्या अतीव प्राचीन काळीं चातुर्वर्ण्य सिद्ध होतें असें मानावें लागेल. ज्यांना चातुर्वर्ण्य सिद्ध झालें नव्हतें असें मानावयाचें असेल त्यांना वर दिलेली आमची कल्पना मान्य करावी लागेल. अर्थात्, अनुलोम विवाहाचें एक उदाहरण त्यांस एक गमवावें लागेल. ती त्यांना इष्टापत्तीहि वाटेल; पण केव्हां ! दोघांमध्ये विवाहवेदी प्राचीन काळीं होती असें म्हणावयाचें असेल तर. दोनहि गोष्टी मानावयाच्या नसतील तर प्रवृत्तिनिवृत्तिभेदक वर्णांत जी शत्रुबुद्धि पुढें उत्पन्न झाली त्यापूर्वीचा हा विवाह असें मानावें लागेल. असा हा काल कोणता ?

## काल कोणता ?

अगस्त्य हा मित्रावरुणांचा मुलगा असा उल्लेख वेदांतच आढळतो. अर्थात्, वेदकालापैकीं किंवा वेदकालपूर्व दंतकथात्मक किंवा पौराणिक काल. अशा कालीं देवासुर, मानवदानव, आर्यदास असे चातुर्वर्ण्यपूर्व विभाग मानणें भाग आहे. चातुर्वर्ण्यच देवपूर्व ठरलें तर वेदपूर्वकालांतील जो मोठा काल घेऊं त्यांतहि फिरून प्राचीन व अर्वाचीन असे विभाग पाडावे लागतील व त्यांतला प्राचीन काल असें मानावें लागेल. या कालविभागाला शकपूर्व अमुक सहस्रें असें सांगतां येत नाहीं.

## दोन वर्ण–एक पुराणा आसुर व दुसरा आधुनिक सुधारक आर्य

म्हणजे इतकेंच कीं, एका पुराण्या समाजांतून एक आधुनिक सुधारक ( पुराण्या समाजाच्या दृष्टीनें आधुनिक व सुधारकच ) समाज बाहेर पडला. लोपामुद्रा ही पुराण्या समाजांतली. बायका पुराण्या समजुतीलाच बहुधा चिकटलेल्या असतात. अगस्त्य हा नवीन संयमव्रत प्रवर्तक. वर जी आधुनिक व पौराणिक अशीं आम्हीं दोन नावें दिलीं तीं नवीन आहेत. पूर्वीचे शब्द कनिष्ठ व ज्येष्ठ. आसुर हे कालदृष्टीनें ज्येष्ठ व देव हे कनिष्ठ. विशिष्ट गुणयुक्त समाज या नात्यानें देव श्रेष्ठ आणि असुर कनिष्ठ. एक दिव्य व उत्तम; दुसरें तामस व अधम. लोपामुद्रा ही तामस किंवा अचित व अधर समाजांतून वर आली व दैवी बनली आणि तिची प्रजा दैवी संपत्तीनें युक्त झाली. याच अगस्तीकडून रामाला दैवी किंवा सुधारलेली म्हणजे दैवी शक्तीनें युक्त अशीं शस्त्रें मिळालीं असें समजण्यास हरकत नाहीं.

## भिन्न स्थल

समाजाच्या या विभागांत वर्ण असें नांव पडून त्यांत शत्रुत्व उत्पन्न होऊन त्यांचीं राहण्याचींहि भिन्न स्थलें उत्पन्न होऊं लागलीं होतीं, हें कोष्टकांतील नीचशाखेवरून दिसून आलेंच आहे.

## त्रैवर्ण्य आणि चातुर्वर्ण्य

१. मूळ एकवर्णी किंवा अविभक्त समाजांत भेदाचीं बीजें उत्पन्न होऊन दोन भेद कसे पडले व त्यांस शेवटीं अखेर वैदिक लोकांनीं वर्णभेद हें नांव ठेवलें आणि दोनहि वर्ण परस्परभिन्न राहूं लागले

प्रत्यक्ष विभजन

असें मागील विभागांत दिसून आलें. यापुढें त्यांतील आसुरसमाजाचा इतिहास पाहावयास वैदिक वाङ्मयांत फारशी सवड नाहीं. दोघांतील वैमनस्य वाढून एकमेक एकमेकांपासून अधिकाधिक फुटून असुर लोक हिंदुस्थानचा 'मध्यदेश' सोडून पूर्वपश्चिम सीमाभागांतून राहूं लागले आणि कित्येक हिंदुस्थानाबाहेरहि जाऊं लागले, असें भारतावरून आणि परदेशच्या इतिहासावरून आढळून येतें. अविनाशचंद्र दास यांच्या ऋग्वेदिक इतिहासावरून असें अनुमान निघूं शकतें कीं, असुरांपैकीं पणी यांनीं फिनिशिया येथें, दुसऱ्या असुरांनीं मिसर देशांत, तिसऱ्यांनीं गौड देशांत, चवथ्यांनीं असुरिया व खाल्डिया देशांत व पांचव्यांनीं इराणांत वसाहती केल्या. त्यासंबंधींचा वृत्तांत त्या पुस्तकांत पाहावा. त्यांच्यांतहि चातुर्वर्ण्य आढळून येतें. त्याविषयींची माहिती या विभागाच्या अखेर सांगण्याचा हेतु आहे.

२. दुसरा जो आर्यसमाज त्यांतहि विभजनाची क्रिया चालूच राहिली. दैवी समाजांत तीन-चार-पांच विभाग पडले. आसुरसमाजांतहि तीन विभाग झाल्याचा एक संशयित उल्लेख ऋग्वेदाच्या १० व्या मंडलांत आढळतो तो असा :

असुर समाजांतहि विभजन ?

नृचक्षा रक्षः परियश्य विक्षु,
तस्य त्रीणि प्रतिशृणीहि अग्रा।
तस्याग्ने पृष्टी र्हरसा शृणीहि,
त्रेधामूलं यातुधानस्य वृश्च ॥ १०.८७

यांत राक्षस किंवा यातुधानांची तीन अग्ने आणि तीन मूळें असल्याचें स्पष्ट दर्शविलें आहे. परंतु या राक्षसांचे तीन प्रकार–(१) मानवी, (२) तिर्यंची (३) कृमि व जंतुस्वरूपी–असल्याचें आढळून येतें. शिवाय अथर्ववेदांत जवळ जवळ अशाच स्वरूपाची एक ऋचा आढळते, ती वरील तीन प्रकारांपैकीं तिसऱ्या कृमिजंतुस्वरूपाची असावी. त्यामुळें ही ऋचाहि त्याच स्वरूपाची असण्याचा संभव आहे. पण तशी ती नसून ही मानवी राक्षसांबद्दलच आहे असें मानलें तर राक्षसांचीं वर जीं तीन अग्ने आणि तीन मूळें सांगितलेलीं आहेत त्यांवरून राक्षसांत तीन वर्ण उत्पन्न झाले होते, अशी दृढ शंका उत्पन्न होते. हे तीन प्रकार कोणते हेंहि सांगतां येत नाहीं; कारण फिरून यांचा उल्लेख दुसरीकडे कोठें नाहीं. असुर, राक्षस, दानव, दास, दस्यु, यातुधान, पणी, अहि, सर्प अशीं अनेक नांवें वेदांत आढळतात. त्यांना जीं विशेषणें लावलेलीं आढळतात, तीं सर्वांना सारख्याच अर्थाचीं आढळतात. शिवाय हे शब्द परस्परभिन्न नसून ज्याला असुर त्यालाच दास, दस्यु प्रत्यक्ष म्हटलेलेंहि आढळतें. यावरून हे भिन्न असतील असेंहि वाटत नाहीं. निदान वेदावरून हा भेद उमगण्यासारखा आहे असें वाटत नाहीं. रामायणभारतादि इतिहासपुराणांतून आलेलीं वर्णनें अलंकारिक व अतिशयोक्तीचीं वाटतात; त्यामुळें त्यांवरून काढलेलीं अनुमानें निरुपयोगी होत. अशा स्थितींत यांचे भेद निश्चयानें सांगूं शकत नाहीं.

आर्यसमाजांत दोन, तीन व चार वर्ण

३. देवासुरसमाजांत प्रत्येकीं तीन विभाग पडण्यापूर्वी कदाचित् दोन दोन विभाग पडले असावे अशी शंका येते. आर्य समाजांतील क्षत्रिय आणि वैश्य मिळून मूळ एकच समाज असावा; कारण त्या दोहोंची उत्पत्ति मनूपासून वर्णिलेली आढळते. त्रेतायुगांत तीन वर्ण झाले, अशीहि आख्यायिका रामायणांत आढळते. देवसमाजांतील चातुर्वर्ण्यांत एकेक वर्ण उत्पन्न झाला असेंच वर्णन आढळतें. अर्थात्, येथें मानवांतहि तसेंच झालें असलें पाहिजे, अशी कल्पना एकंदरींत समर्थनीय दिसते. या तीन वर्णांखेरीजहि समाजाचा कांहीं भाग अवशिष्ट राहिला. त्याला प्रथम 'जन' हें सामान्य-

-नांव आर्यांत पडलें किंवा 'इतर जनं' असें नांव आसुरांत पडलें असें दिसून येतें. 'अवशिष्ट राहिलेला समाज' चवथा वर्ण जन किंवा दास असें म्हणतों याचा अर्थ इतकाच कीं, कित्येक विप्रांकडे गोपनासारखेच व त्या-बरोबर कांहीं 'दास' येत. अर्थात्, हे राजेलोकांजवळ असत. मग राजे-लोकांजवळ ते युद्धांत येत कीं हरिश्चंद्राप्रमाणें ते बाजारांत विकले जात व डोंबाप्रमाणें कोणाहिजवळ असूं शकत अशी शंका येते. या दासांचा दर्जा अर्थातच हलका म्हणजे नोकर किंवा गुलामवजा होता. दास म्हणजे -गुलाम किंवा नोकर असा अर्थ मागाहून झाला. मूळ 'दास' शब्दाचा अर्थ मागील विभागांत आला आहेच.

शतं दासे बल्बूथे विप्रः तरुक्ष आददे ।
ते ते वायो इमे जनाः मदंति इंद्रगोपा मदंति देवगोपा मदंति ॥

ऋ. ८.४६.३२

यांत विप्राला शंभर दास मिळाल्याचें वर्णन आहे. हे दास 'तरुक्ष' नांवाचा जो राजाधिकारी त्याचे स्वाधीन असत. म्हणजे मूळ राजाजवळ किंवा श्रीमान विप्राजवळ व राजांकडून यज्ञदक्षिणेच्या रूपानें ब्राह्मणांकडेहि येत. यांनाच 'दासप्रवर्गं धन' (ऋ. १.९२.८) असें म्हटलेलें असावें. वर्ग आणि वर्ण हे जवळ जवळ समान अर्थी शब्द आहेत; पण त्यांत भेदहि आहे, असें वरील शब्द सुचवितात. असे 'हे दास आर्यांकडे येऊन 'इंद्रगोप' किंवा 'देव' गोप' झाले याबद्दल त्यांना एक प्रकारचा विशेष आनंद वाटे. 'इमे जनाः' म्हणजे स्तोत्रकार किंवा स्तोत्रकार व त्यांचे मदतनीस असा अर्थ करण्यांत येतो, परंतु त्यापेक्षां वरील दास हे मूळचे इंद्रगोप किंवा देवगोप नव्हते, ते आर्यांकडे किंवा विप्राची दक्षिणा म्हणून विप्राकडे आल्यावर देवगोप होऊन त्यांना आनंद होतो असा उघड अर्थ दिसतो. त्यांचें मूळचें वर्णन पाहिजे असल्यास अर्वाचीनें तमसि मदंति । असें व नंतर देवगोपा मदंति असें. जसा एखादा दारूबाज निशा पिऊन बेहोष होतो, गटारांत पडतो व

त्यांतच आनंद मानतो, तसाच हा. तो आसुरी आनंद वगळा आणि हा 'देव-गोप' बनल्याचा वेगळा. हा दास किंवा शूद्र वर्ण असुरांपासून झाला, असें तैत्तिरीय ब्राह्मणांत स्पष्ट म्हटलें आहे. दैव्यो वै वर्णो ब्राह्मणः असुर्यो शूद्रः। तै. ब्रा. १.२.६.७. या चवथ्या वर्णाचें शूद्रपूर्व नांव 'जन' असें असल्या-चें आणखी पुढें ऋ. २.२६.१ या ऋचेंत आपल्यास आढळून येणार आहे. असो. पुरुषसूक्तांत वैश्य आणि शूद्र हीं नांवें प्रथमच दृष्टीस पडतात, म्हणून आतां कोणी विचकून जाण्याचें कारण नाहीं. वैश्य यांचें मूळ नांव विश असेंहि आढळून येतें. खालील ऋचेंत तीन वर्णांची तीन नांवें सारखीं ओळीनें आलीं असून त्यांचे व्यवसायहि त्या ऋचांतून त्याबरोबर दर्शविलेले आढळतात, ही मोठी सुदैवाची गोष्ट आहे. सुदैवाची म्हणण्याचें कारण रा. रा. चापेकर यांनीं अशी शंका काढली आहे कीं, वैश्य कृषि-वाणिज्य करीत असले तरी ते गोधनसंपन्न होते, गोरक्षण व पशुपालन करीत, याला वेदांत प्रमाण नाहीं; परंतु ती त्यांची शंका या ऋचांनीं सहजच निरसन होईल. वास्तविक असे व्यवसाय दर्शविणारे अनेक उतारे मिळूं शकतील. परंतु ते सर्व येथें देण्याचें कारण नाहीं.

तिसरा वर्ण विश

तीन वर्णांचा एकत्र उल्लेख. मूळ नांवें—ब्रह्म क्षत्र व विश

तीन वर्ण

ब्रह्म जिन्वतं उत जिन्वतं धियः हतं रक्षांसि सेधतं अमीवाः॥
क्षत्रं जिन्वतं उत जिन्वतं नॄन् " " "
धेनूः जिन्वतं उत जिन्वतं विशः " " "

ऋ. ८.३५.१६,१७,१८

बाकीचा, विभजन एकंदरींत कसें होत गेलें, हें आतां तक्याच्या रूपानें दाखविण्यास हरकत नाहीं.

यद्देवा देवं अयजंत विश्वे॥......ऋ. १०.१३०.३
तेन च ऋषयः मनुष्याः॥ऋ १०.१३०.५

-नांव आर्यांत पडलें किंवा 'इतर जन' असें नांव आसुरांत पडलें असें दिसून येतें. 'अवशिष्ट राहिलेला समाज' चवथा वर्ण जन किंवा दास असें म्हणतों याचा अर्थ इतकाच कीं, कित्येक विप्रांकडे गोधनासारखेच व त्या-बरोबर कांहीं 'दास' येत. अर्थात्, हे राजेलोकांजवळ असत. मग राजे-लोकांजवळ ते युद्धांत येत कीं हरिश्चंद्राप्रमाणें ते बाजारांत विकले जात व डोंबाप्रमाणें कोणाहिजवळ असू शकत अशी शंका येते. या दासांचा दर्जा अर्थातच हलका म्हणजे नोकर किंवा गुलामवजा होता. दास म्हणजे गुलाम किंवा नोकर असा अर्थ मागाहून झाला. मूळ 'दास' शब्दाचा अर्थ मागील विभागांत आला आहेच.

> शतं दासे बल्बूथे विप्रः तरुक्ष आददे।
>
> ते ते वायो इमे जनाः मदंति इंद्रगोपा मदंति देवगोपा मदंति॥
>
> ऋ. ८.४६.३१

*यांत विप्राला शंभर दास मिळाल्याचें वर्णन आहे.* हे दास 'तरुक्ष' नांवाचा जो राजाधिकारी त्याचे स्वाधीन असत. म्हणजे मूळ राजाजवळ किंवा श्रीमान् विशाजवळ व राजाकडून यज्ञदक्षिणेच्या रूपानें ब्राह्मणांकडेहि येत. यांनाच 'दासप्रवर्ग धन' (ऋ. १.९२.८) असें म्हटलेलें असावें. वर्ग आणि वर्ण हे जवळ जवळ समान अर्थी शब्द आहेत; पण त्यांत भेदहि आहे, असें वरील शब्द सुचवितात. असे 'हे दास आर्यांकडे येऊन 'इंद्रगोप' किंवा 'देव' गोप' झाले याबद्दल त्यांना एक प्रकारचा विशेष आनंद वाटे. 'इमे जनाः-म्हणजे स्तोत्रकार किंवा स्तोत्रकार व त्याचे मदतनीस असा अर्थ करण्यांत येतो, परंतु त्यापेक्षां वरील दास हे मूळचे इंद्रगोप किंवा देवगोप नव्हते, ते आर्यांकडे किंवा विप्राची दक्षिणा म्हणून विप्राकडे आल्यावर देवगोप होऊन त्यांना आनंद होतो असा उघड अर्थ दिसतो. त्याचें मूळचें वर्णन पाहिजे असल्यास अर्वाचीने तमसि मदंति। असें व नंतर देवगोपा मदंति असें. जसा एखादा दारूबाज निशा पिऊन बेहोष होतो, गटारांत पडतो व

त्यांतच आनंद मानतो, तसाच हा. तो आसुरी आनंद वगळा आणि हा 'देव-गोप' बनल्याचा वेगळा. हा दास किंवा शूद्र वर्ण असुरांपासून झाला, असें तैत्तिरीय ब्राह्मणांत स्पष्टच म्हटलें आहे. दैवो वै वर्णो ब्राह्मणः असुर्यो शूद्रः। तै. ब्रा. १.२.६.७. या चवथ्या वर्णाचें शूद्रपूर्व नांव 'जन' असें असल्याचें आणखी पुढें ऋ. २.२६.३ या ऋचेंत आपल्यास आढळून येणार आहे. असो. पुरुषसूक्तांत वैश्य आणि शूद्र हीं नांवें प्रथमच दृष्टीस पडतात, म्हणून आतां कोणी विचकून जाण्याचें कारण नाहीं. वैश्य यांचें मूळ नांव विश असेंहि आढळून येतें. खालील ऋचेंत तीन वर्णांचीं तीन नांवें सारखीं

**तिसरा वर्ण विश**

ओळीनें आलीं असून त्यांचे व्यवसायहि त्या ऋचांतून त्याबरोबर दर्शविलेले आढळतात, ही मोठी सुदैवाची गोष्ट आहे. सुदैवाची म्हणण्याचें कारण रा. रा. चापेकर यांनीं अशी शंका काढली आहे कीं, वैश्य कृषि-वाणिज्य करीत असले तरी ते गोधनसंपन्न होते, गोरक्षण व पशुपालन करीत, याला वेदांत प्रमाण नाहीं; परंतु ती त्यांची शंका या ऋचांनीं सहजच निरसन होईल. वास्तविक असे व्यवसाय दर्शविणारे अनेक उतारे मिळूं शकतील. परंतु ते सर्व येथें देण्याचें कारण नाहीं.

तीन वर्णांचा एकत्र उल्लेख. मूळ नांवें—ब्रह्म क्षत्र व विश

**तीन वर्ण**

ब्रह्म जिन्वतं उत जिन्वतं धियः हतं रक्षांसि सेधतं अमीवाः॥
क्षत्रं जिन्वतं उत जिन्वतं नॄन् ,, ,, ,,
धेनूः जिन्वतं उत जिन्वतं विशः ,, ,, ,,

ऋ. ८.३५.१६,१७,१८

सारांश, विभजन एकंदरींत कसें होत गेलें, हें आतां तक्रयाच्या रूपानें दाखविण्यास हरकत नाहीं.

यद्देवा देवं अयजंत विश्वे ॥......ऋ. १०.१३०.३
तेन च अक्लृप्त ऋषयः मनुष्याः ॥ऋ १०.१३०.५

ज्या वेळीं सर्व देवांनीं देवाला यज्ञ केला, त्या वेळीं देवता कोणती होती वगैरे प्रश्न. त्यांचें उत्तर ४,५ मध्यें दिलें आहे व अखेर 'त्यामुळे ऋषि व मनुष्यें उत्पन्न झालीं' असें म्हटलें आहे व ६ मध्यें पितर उत्पन्न झाल्याचें वर्णन आहे.




१ दैवो वै वर्णो ब्राह्मणः । असुर्यो शूद्रः ॥ तै. ब्रा, १.२.६.७. असतो वै एष संभूतो यत् शूद्रः. किंवा. ३.२.३१ असत=असुर=असदभिमानी अथर्व ५.२२ मध्ये तक्मन् तापानें गंधार लोकांत, मगध लोकांत किंवा एखाद्या प्रपळ्या शूद्राकडे जावें असें म्हटलें आहे त्याबद्दलहि हेंच अनुमान दृढ होतें.

च अक्लृप्से तेन ऋषयो मनुष्या यज्ञे जाते पितरो नः पुराणे
पश्यन्मन्ये मनसा चक्षसा,तान्य इमं यज्ञं अयजन्त पूर्वे ऋ.१०.१३०।।६

अर्थः– तो ( प्राचीन ) यज्ञ झाल्यावर, ऋषि, मनुष्य, प्राचीन पितर निर्माण झाले; त्यांना मानसिक चक्षूनें पाहात आहें. असें वाटतें कीं ज्यांनीं हा यज्ञ यजन केला. यावरून ऋषि = मनुष्य = प्राचीन पितर असें वाटतें.

आमची कल्पना तैत्तिरीय ब्राह्मणांत दिलेल्या कल्पनेशीं बरीच जुळते, म्हणून ती येथें देतों. त्यांत असुरांच्या मागून पितर, नंतर मनोयुक्त मनुष्य, नंतर देव उत्पन्न केले असें सांगितलें आहे. ते देव=भूदेव असावे, पण क्वचित् पितरांपासून देव व मनुष्यें उत्पन्न झालीं अशी कल्पना आढळते.

प्रजापतिः अकामयत प्रजायेय इति। स तपोतप्यत। सो अंतर्वान् अभवत् । [ स हरितः श्यावो अभवत् । तस्मात् स्त्री अंतर्वत्नी हरिणी सती श्यावा भवति । स विजायमानो गर्भेण अताम्यत् । स तान्तः ( श्रांतः ? ) कृष्ण-श्यावोऽभवत् । तस्मात् तान्तः कृष्णः श्यावो भवति । तस्य असुर एव अजीवत् । ] २

तेन असुना असुरान् असृजत । तद् असुराणां असुरत्वम् ।.........
सो असुरान् सृष्ट्वा पिता इव अमन्यत । तदनु पितॄन् असृजत ।...२
यंति अस्य पितरो इवम् । स पितन् सृष्ट्वा अमन्यत् तदनु मनुष्यान्
असृजत । ......
तदनु देवानसृजत...... तानि वै एतानि चत्वारि अंभसो देवाः मनुष्याः
पितरः असुराः । तेषु सर्वेषु अभो नाभिरिव भवति ।

मनूंत हीच कल्पना दिसते. ३.१९२.

मनोर्हैरण्यगर्भस्य ये मरीच्यादयः सुताः । तेषां ऋषीणां सर्वेषां पुत्राः
पितृगणाः स्मृताः ॥ १९४
विराट्सुताः सोमसदः साध्यानां पितरः स्मृताः अग्निष्वात्ताश्च देवानां
मारीचा लोकविश्रुताः ॥ १९५
दैत्यदानवयक्षाणां गंधर्वोरगरक्षसाम्। सुपर्णकिन्नराणांच
स्मृता बर्हिषदो अत्रिजाः ॥ १९६

इत्यादि (१९९ पर्यंत) वरून खालील वृक्ष तयार केला आहे.

## चातुर्वर्ण्य–चवथा जन




असुरांच्या दोन वा तीन विभागांचीं नावें निश्चित समजून आलीं आहेत असें नव्हे. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य यांना 'ज्योतिरग्र' असें सामान्य नांव दिलें तर असुरादिकांना यातुधान असें सर्वसामान्य नांव देतां येईल. मूळ एक समाज असें म्हणण्याचें कारण एक असें कीं, देवासुरांचा सामान्य धर्म 'यज्ञ' असें सांगतां येतें. एक तर 'तानि धर्माणि प्रथमानि आसन्' असें पुरुषसूक्तांत म्हटलें असून गीतेंतहि[1] असुर 'नामयज्ञ' करीत, येवढेंच नव्हे तर 'यक्ष्ये' असा अभिमान बाळगीत असें स्पष्ट म्हटलें आहे. प्रजापतीनें प्रजोत्सर्गाबरोबरच 'यज्ञ' उत्पन्न करून

---

१ गीतेंत 'असुर' जातीविषयीं म्हटलेलें नाहीं, असुरवृत्तीविषयीं म्हटलें आहे हें खरें. पण मूळची असुर ही वृत्तिच असून पुढें ती जाति झाली असें आतां-पर्यंत अनेक वार दाखविलें आहेच.

अनेन प्रसविष्यध्वम् एष वोऽस्तु इष्टकामधुक् ॥ भ. गीता ३.१०. असें सांगितलें तें सर्वांनाच–देव, असुर, आर्य इ.–सांगितलें असें समजणें भाग आहे. इडा नु मानवी यज्ञानुकाशिनी आसीत् । साऽशृणोद् असुरा अग्निं अदधते इति । साऽब्रवीदिडा मनुं तथा वै अहं तव अग्निं आधास्यामि यथा प्रजया पशुभिर्मिथुनैः जनिष्यसे प्रति अस्मिँल्लोके स्थास्यसि अभि-सुवर्गं लोकं जेष्यासि इति ॥ तै. ब्रा. १.१.४.४. असुरांना जीं अयज्वन्, अकर्मन् अशीं नांवें पडलीं याचें कारण ते मुळींच यज्ञ करीत नसत असें नव्हे; निदान परंपरागत अशी खात्री नाहीं. प्रजा आणि इष्ट कामनासिद्धि सर्वांनाच —अर्थात् अपवाद खेरीज करून—पाहिजे असते. रामायणांत तर राक्षसांचा यज्ञ स्पष्टपणें वर्णन केला असून गीतेंतहि असुरयज्ञांचा उल्लेख आहेच. अर्थात् 'अव्रत' म्हणजे जसें 'अन्यव्रत'[1] समजावयाचें त्याप्रमाणेंच अयज्वन् किंवा अकर्मन् याचा अर्थ आर्यांप्रमाणें यज्ञ किंवा कर्में न करणारे म्हणजे अन्य प्रकारचे यज्ञ किंवा कर्में करणारे असा अर्थ घेतला पाहिजे. असुर, राक्षस हे पुराणमताभिमानी असल्यामुळें आर्यांनीं सोडलेल्या प्राचीन चाली त्यांच्यांत सांपडावयाच्या असा सामान्य नियम धरून चालण्यास हरकत नाहीं. आर्यांनीं भगिनी-विवाह टाकला तो इराणी, प्राचीन इजिप्शियन, बुद्ध, ब्रह्मी वगैरे अनेक समाजांतून आढळून येतो हें 'वेदपूर्वसमाजें'[2] या निबंधांत मीं दाखविलें आहे. नरमेध एका काळीं देव व आर्य समाजांत होता. तो पुढें त्यांनीं टाकला; परंतु तो असुर, राक्षस वगैरे समाजांतून आढळतो. जरासंधानें असे कांहीं लोक धरून डांबून ठेवले होते, असें आपल्यास आढळतें. असो. देवानुगामी[3] आर्य आणि असुर यांच्या यज्ञांत कांहीं फरक असला पाहिजे

---

१ अन्यव्रतं अमानुषं अयज्वानं अदेवयुं ॥ ऋ. ८.६०.११.

२ हा निबंध साहित्यपत्रिकेंत गत वर्षी छापला आहे.

३ सर्वेण वै यज्ञेन देवाः सुवर्गं लोकं आयन् ॥ (तै. सं. १.७.१.३) देवेद्ध इति आह । देवाः हि एतं ऐंधत । मन्विद्ध इति आह । मनुः हि एतं उत्तरो देवेभ्यः ऐंध ॥ यावरून यज्ञाचे बाबतीत मानवांनीं देवांचें अनुकरण केलें हें स्पष्ट होतें. याचा अर्थ असा कीं, त्यांनीं असुरांचें अनुकरण केलें नाहीं; देवांचें केलें. याला आणखी एक प्रमाण वरील तै. सं. १.७.१.३ यांतच

यांत शंका नाहीं. त्याची कल्पना करणें शक्य आहे. दोघांमध्यें मुख्य फरक म्हटला म्हणजे परलोकासंबंधीं, हें वरील तैत्तिरीय ब्राह्मणांतील उतान्यावरून स्पष्टच आहे. शिवाय दोघांचे आचारांतहि फरक आहे. असें इडा व मनुसंवादावरून दिसतें. आर्य परलोक मानीत, येवढेंच नव्हे तर कर्मविपाकाचें तत्त्व मानीत. देवांनीं आपल्यास द्यावयाचें आणि आपण देवांस द्यावयाचें, दोघांनीं एकमेकांस संभाळावयाचें, अशा यज्ञचक्रावर आर्यांचा भरंवसा, तर सर्व सृष्ट पदार्थ आपल्या उपभोगार्थ ईश्वरानें निर्माण केले आहेत, ही ख्रिस्ती किंवा ज्यूइश कल्पना किंवा असूरियन कल्पना मूळ येथील असुरांची असें भगवद्गीतेवरून आणि कीकटांसंबंधींच्या वर दिलेल्या ऋ. ३.५३.१४ या ऋचेवरून स्पष्ट दिसून येतें. दोघेहि इष्टकामनार्थच यज्ञ करीत. पण आर्यांची इष्ट कामना ऐहिक तशीच पारलौकिक, दृष्ट तशीच अदृष्ट, फलार्थ व केव्हां केव्हां केवळ अदृष्ट फलाकांक्षेनें. तो शतायुष्यजीवित, गोधन, पुत्रपौत्रादि मागे, तसेंच 'नित्य, शाश्वत, अमृत' किंवा 'विश्वा पार्थिवा अति' अशी रयि मागे तर असुर फक्त ऐहिक भोग मागे. कारण 'एतावदिति निश्चिताः' (गीता. १६.११) किंवा दृष्ट फल हें त्यांचें तत्त्वज्ञान. आसुर संपत्तीचें हें लक्षण सर्वच प्रवृत्त समाजास लागू पडतें. 'ज्योतिरग्र' हें सिंधु विभक्त आर्यांचें विशेषण याचा अर्थ अग्निमुख (देवप्रीत्यर्थ किंवा यज्ञचक्रसिद्ध्यर्थ यज्ञयागादि करणारे) किंवा ज्ञानप्रमुख ब्राह्मणादि.

---

आढळतें तें असें : पाकयेज्ञेन मनुः अश्राम्यत्। सा इडा मनुं उपावर्तत। ताम् देवासुराः व्यह्वयंत प्रतीचीं देवाः पराचीं असुराः। सा देवान् उपावर्तत॥ सारांश, देवांनीं व असुरांनीं मनूच्या इडेला बोलावली असतां ती देवांकडे गेली हें तर खरेंच; पण देवांनीं पुढून आणि असुरांनी तिला मागून बोलावलें. यावरून दोघांचे मार्ग भिन्न होते आणि देव स्वर्ग जिंकणारे होते, असें प्रथम सांगितलें आहे. अर्थात्, इडेनें स्वर्ग जिंकण्याचा वा यज्ञाचा मार्ग पत्करला.

हा देवांचा कोणता मार्ग मानव अनुसरले? याची एक कल्पना करतां येते. देव माध्याह्नीं व मध्यरात्रीं मिळून एकत्र यज्ञ करीत, असुर सकाळीं व सायंकाळीं अशीं दोन यज्ञें करीत; तर मानव सकाळीं, माध्याह्नीं व सायंकाळीं अशीं त्रिकाळ करीत. त्यामुळें असुर नाश पावले आणि देव स्वर्गी गेले (दुसरा लोक पावले) (तै. सं. ६.२.५.२).

## त्रैवर्णिक समाजाचा उगम—वेदपूर्व किंवा वेदकालां- तील प्राचीन काळी

### —त्रैवर्ण्याच्या व चातुर्वर्ण्याच्या अस्तित्वाचीं वैदिक प्रमाणें —

(१) ऋग्वेद ८.३५.१६,१७,१८, या वर उद्धृत केलेल्या तीन ऋचांत त्रैवर्णिकांचें स्पष्ट म्हणजे त्यांच्या व्यवसायांसह जें वर्णन आलें आणि त्यांच्या जोडीला जो राक्षसशत्रूंचा उल्लेख आला आहे, तो त्रैवर्णिकांच्या अस्तित्वाचा उत्तम पुरावा असें म्हणण्यास हरकत नाहीं. तथापि या उल्लेखावरून त्रैवर्ण्य किंवा चातुर्वर्ण्य सिद्ध होतें; त्रैवर्ण्य किंवा चातुर्वर्ण्य सिद्ध होत नाहीं, असें कोणी म्हणूं शकेल हें आम्ही जाणून आहों. धीप्रधान व्यवसायाचा तो ब्राह्मण, वीर्य-प्रधान किंवा पराक्रमावर अवलंबून तो क्षत्रिय आणि कृषिप्रधान किंवा धेनु-पालक तो वैश्य असा अर्थ यांतून निघतो. वसिष्ठः श्वित्यंचः दक्षिणतः कपर्दाः धियं जिन्वानः। ऋ. ७.३३.१. हें उदाहरणहि याच धर्तीचें. अशीं आण-खीहि उदाहरणें हुडकून काढतां येतील. चातुर्वर्ण्य शब्दांत जे अनेक अर्थ आहेत त्यांचा विचार मागाहून करूं. तूर्त १० व्या मंडलांतील ऋग्वेदपूर्व चातु-र्वर्ण्याचेंच हें उदाहरण समजूं. पण या तीन ऋचांबरोबर जो राक्षसांचा उल्लेख आहे, त्यावरून काय अनुमान निघतें? राक्षसांच्या जोडीला अमीव किंवा रोग हा शब्द आला आहे. त्यामुळें राक्षस आणि रोग हे आर्यांचे दोन शत्रु असें सहजींच निदर्शनास येतें. कदाचित् राक्षस या शब्दाचा जो रोग असा अर्थ आहे, तोहि येथें अभिप्रेत नसेल असें नाहीं; तथापि रोगाला स्वतंत्र शब्द योजलेला असल्यामुळें राक्षस म्हणजे असुरवाचक आर्यांचे शत्रु असा अर्थ समजणें अधिक उचित दिसतें.[1] येथील राक्षस हा शत्रुरूपी आहे व त्याला मारण्याची अपेक्षा आहे त्या अर्थी हा शूद्र नव्हे. तथापि शूद्राचा उल्लेख नाहीं यावरून त्रैवर्णिकांजवळ कोणी सेवक नव्हते किंवा चवथा वर्ण नव्हता असें समजणें अयोग्य होईल.

---

१ याचे उलट इराणी वेदांत 'देव आणि रोग' हे शत्रु असे वर्णिले आहेत, यावरून हे दोन भिन्न वेगळेच उदित दिसतें.

(२) ब्राह्मणोऽस्य मुखमासीद् बाहू राजन्यः कृतः।
ऊरू तदस्य यद्वैश्यः पद्भ्यां शूद्रो अजायत॥
ऋ. १०.९०.१२

चार वर्णांचा उल्लेख

ही ऋचा सामवेदाशिवाय तीनहि वेदांतील–तैत्तिरीय व वाजसनेयीत पृथक्–पुरुषसूक्तांत[1] आढळून येते. या ऋचेंत ब्राह्मण हे मुख, राजन्य हे बाहू आणि ऊरु हे वैश्य (त्या विराट पुरुषाचे) असें म्हटलें आहे; पण शूद्र हा पायापासून उत्पन्न झाला असें म्हटलें आहे. या सूक्तांत चातुर्वर्ण्याचे समाजाच्या विराट देहाशीं संबंध किंवा समाजांतील परस्परांचें अवलंबित्व आणि एकाच समाजांतील मूळ विभजन दाखविण्याचा हेतु दिसतो. यांत ब्राह्मणक्षत्रियांचे जीवनोपायहि अनुमित होतात. पण वैश्यांचे व शूद्रांचे संबंध केवळ अलंकारिक रीतीनें वर्णिल्यामुळें ८.१८ यांतल्याप्रमाणें व्यवसायउल्लेख उत्तान नाहीं. वैश्य आणि शूद्र विराट पुरुषाचे आधारस्तंभ असें मात्र दिसतें. तैत्तिरीय अरण्यकांत 'स (प्रजापतिः) मुखतः त्रिवृतं निरमिमीत। तं अग्निः देवतान्वसृज्यत... ब्राह्मणो मनुष्याणाम्......

मागील ऋचांतील (८. १६, १७, १८) शूद्राचा अनुल्लेख काय दर्शवितो? चवथा शूद्र अस्तित्वांतच नव्हता असें म्हणतां येणार नाहीं; कारण शूद्र हा बोलून चालून सेवक. सेवकांवाचून समाज तो त्रैवर्णिकांच्या योग्यतेचा नव्हे. त्यामुळें त्याचा समाजांत समावेश करून चातुर्वर्ण्यसंस्था स्थापन झाली नव्हती. मूळ संस्था त्रैवर्ण्यरूपच. तस्माचे मुख्याः मुखतो

---

[1] पुरुषसूक्त हें ऋग्वेदांतील १० व्या मंडलांतील ९० वें सूक्त आहे. बहुतेक विद्वान् तें अर्वाचीन समजतात. एक अथर्ववेदसंपादक डॉ. हौग मात्र तें प्राचीनच आहे असें प्रतिपादतात. कारण अत्यंत प्राचीन अशा गणतां येण्यासारख्या पुरुषमेधप्रसंगीं तें म्हणावें लागतें. तें तात्त्विक असल्यामुळें अर्वाचीन म्हणावें तर अशीं तात्त्विक सूत्रें प्रत्येक मंडलांतून आढळतात. वरील १२ वी ऋचा ही तीनहि वेदांत आढळणाऱ्या चारहि पुरुषसूक्तांत आढळते. करितां ती प्रक्षिप्त मानतां येत नाहीं असें नानासाहेब वैद्य म्हणतात.

असृज्यंत। वगैरे आढळतें. त्यावरून (१) ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य हे प्रजापतीच्या त्या त्या भागापासून उत्पन्न झाले असाच परंपरागत अर्थ दिसतो. (२) या सेवकवर्गाला 'शूद्र' हें नांव उत्पन्न झालें नव्हतें असेंहि अनुमान संभवनीय आहे. (३) शूद्र हा ज्या दास किंवा असुरवर्गांतून आला त्या समाजाचा समावेश पूर्णपणे आपले समाजांत होण्यासारखा नव्हता, तेव्हां तो प्रथमतः करण्यांतहि आला नाहीं. तो समाज फार तर प्रथम उदासीन असणार; मागाहून ते लोक 'देवगोपाः मदंति' असें वाटूं लागल्यावर आणि समाज स्वयंपूर्ण असावा अशी कल्पना उत्पन्न झाल्यावर त्याचा समावेश करून चातुर्वर्ण्ययुक्त समाज उत्पन्न करण्यांत आला. अर्थात्, दरम्यानची स्थिति त्या ऋचांतून दिसते. शूद्रांना 'कृष्ण' समजत. अर्थात्, ते असुरांतून आलेले व असुरवत्. शूद्रांचा समाजांत समावेश करण्याला अडचण किंवा शंका वाटणें स्वाभाविक होतें. समावेश केल्यानंतरहि असें दिसून आलें कीं, सर्वच शूद्र कांहीं 'देवगोपाः मदंति' अशा स्वरूपाचे नसतात. त्यामुळें, मागाहून त्यांत सच्छूद्र, असच्छूद्र असे आणखीहि भाग पाडण्याचा प्रसंग आलाच. पण प्रथम कोणी भेद मानीत व कोणी भेद मानीत नसत. त्रैवर्णिकांत संस्कार असत. शूद्रांत संस्कार नसत, म्हणजे ते संस्कारक्षम असे मानले गेले नाहींत. या दृष्टीनें सर्वांचा एक वर्ग प्रथम करण्यांत आला. मागाहूनहि त्यांत भेद पाडावेत कीं न पाडावेत अशी शंका कित्येकांची होतीच. कारण त्रैवर्णिकांच्या भेदाइतकी त्यांच्यांतील भेदांची योग्यता दिसत नव्हती. 'चतुर्थो एकजातिः' असें मनूनें म्हटलें आहे. एवढेंच नव्हे तर 'नास्ति तु पंचमः' असेंहि मनुस्मृति स्पष्ट म्हणते. चातुर्वर्ण्य या शब्दाचा अर्थहि तोच म्हणजे वर्ण चारच, पांच नव्हत, असा. तथापि कोणी पांच वर्ण मानीत असेंहि दिसून येतें. त्या पांच वर्णांच्या समाजासच 'पंचजन' असेंहि नांव कोणी कोणी देतात. यावरून वर्ण या शब्दाचें महत्त्व दिसून येतें.

(१) क्षत्राय त्वं श्रवसे त्वं महीया इष्टये त्वं अर्थमिव त्वं इत्यै ॥
विसदृशा जीविताभि प्रचक्ष उषा अजीगर्भुवनानि विश्वा ॥

—चार वर्णांचा उल्लेख ऋ. १.११३.६

अर्थः— एकमेकांहून विसदृश असें जीवन असलेल्या माणसांनीं, आप-

आपले भिन्न भिन्न व्यवसाय किंवा जीवनोपाय चालू करावे म्हणून उषा सर्व भुवनांना ( घरोघर जाऊन ) जागें करीत आहे. [ असें या ऋचेच्या द्वितीयार्धात सांगितलें असून प्रथमार्धात ते चार वर्ग 'त्वं' या सर्वनामाचा पुनरुच्चार करून दर्शविले आहेत. अर्थात्, ते त्यांच्या भिन्न व्यवसायांवरून दर्शविले आहेत.] (१) क्षत्राय, (२) श्रवसे, (३) महीयै इष्टये, व (४) अर्थमित्र असे. अशा भिन्न भिन्न ( विसदृश ) जीवनांना सुरुवात करावी म्हणून उषा त्यांना उठविते.

यांतील क्षत्र आणि अर्थ हे शब्द उघड उघड क्षत्रिय आणि वैश्य-समाजवाचक दिसतात. 'महाइष्टि' हा एक व्यवसाय बनून राहिला होता, असें यावरून म्हणणें उघड दिसतें. कोणीहि उठून इष्टि करायला लागावें व आपल्यास तात्पुरतें 'विप्र' म्हणवावें असा भाग दिसत नाहीं. 'महा-इष्टि' या शब्दावरून तें स्पष्टहि दिसत नाहीं. 'विप्रराज्ये यशेषु' असें ऋ. ८.३४ यांत म्हटलें आहे. यज्ञसमारंभ हा जणुं काय विप्रराज्यस्वरूपाचा आहे; आजच्या याज्ञिकाप्रमाणेंच त्या काळींहि त्याला विशिष्ट अध्ययनाची जरूरी होती. सारांश, ब्राह्मण हा निराळा वर्ग पडला होता. ब्रह्मा-सुन्वन्तं इच्छति । ऋ. ९.११२.१. ब्राह्मण कोणी तरी सोमयज्ञ करूं इच्छिणारा ( केव्हां भेटतो अशी वाट पाहात असतो ).[१] (४) श्रवसे म्हणजे काय ? या शब्दाचा अर्थ वरील त्रैवर्णिकांकडून विसदृश होईल असाच केला पाहिजे, हें द्वितीयार्धावरून उघड आहे. त्यांत त्रैवर्णिकांचीच पुनरुक्ति नाहीं, म्हणून श्रवस् शब्दाचा कीर्ति हा अर्थ मान्य करतां येत नाहीं. श्रवस् म्हणजे अन्न असा अर्थ निघण्टूंत सांपडतो ( देवताकाण्ड—वायु शब्दावरील निरुक्त पाहा. ) अर्थात् श्रवसे म्हणजे 'अन्नार्थी.' लोकांनीं आपल्या व्यवसायाला म्हणून लागावें. सारांश, ब्राह्मणांचा महाइष्टि किंवा यजनयाजन, क्षत्रियांचा पराक्रम किंवा प्रजापालन, वैश्यांचा अर्थसंचय व वर्धन आणि शूद्रांचें अन्नार्जन ( धनसंपन्नता नव्हे ) असें हें व्यवसायात्मक चातुर्वर्ण्य ठरून गेलें होतें यांत शंका

१ म्यूर म्हणतो: This verse distinctly proves that the priesthood already formed a profession. तसेंच ऋ. ८.८१.३० मोषुनक्षा इव तंद्रयुः सुवो वाजानां पते ॥

नाहीं. प्रश्न अद्याप येवढाच राहतो कीं, हें श्रमविभागाचें तत्वावर–ज्याला जो योग्य वाटेल तो त्यानें व्यवसाय करावा–उत्पन्न झालें होतें कीं या जन्म-जात वृत्तीच होत्या, हा उल्लेख ८ मंडलापेक्षां स्पष्टतर असून यांत भगवद्गी-तेशीं साम्य अधिक आहे.

(४) यद्युंजाथे वृषणं अश्विना रथं घृतेन, नो मधुना क्षत्रमुक्षतम् ॥
अस्माकं ब्रह्म पृतनासु जिन्वतं, वयं धना-
तीन वर्ण — शूरसाता भजेमहि ॥ ऋ. १.१५७.२

या ऋचेंतहि तीन वर्णांचा उल्लेख असून त्यांचा स्वकीय भाव दर्शविला आहे. चवथ्या वर्णाचा उल्लेख नाहीं. कदाचित् चवथ्या वर्णाशीं असें स्वकीयत्व वाटत नसेल.

(१) अस्माकं ब्रह्म पृतनासु जिन्वतम् : आमचें स्तोत्र म्हणजे आमचे स्तोत्रकार ब्राह्मणयुद्धांतील–धर्मयुद्धांतील–सैन्यांत विजयी होवोत. ब्रह्म (केवळ) स्तोत्र नव्हे. त्यावरून 'धियं जिन्वानः' जे ब्राह्मण ते घ्यावयाचे. त्यांच्या जीवनाचें 'ब्रह्म' हें प्रतीकच समजावयाचें. तोच प्रकार इतरत्र. अस्माकं शब्दानें स्वकीयत्वसंबंध दर्शविला आहे.

(२) नो क्षत्रं मधुना उक्षतम्: आमचें क्षत्र किंवा क्षत्रिय यांजवर अश्वी आपला मधु शिंपडोत म्ह. अश्वींचा त्यांवर प्रसाद घडो.

(३) वयं धना शूरसाता भजेमहि : आम्ही धन किंवा धनिक वैश्य-लढाईंत–जीवनकलहांत–धनसंपन्न व्हावें, असा हा उल्लेख असून त्रैवर्णिकांतील प्रत्येक आमचे स्वजन=स्वकीय बांधव आहेत, असा अभिमान आणि आपपणा प्रदर्शित करून अश्वींच्या प्रसादाची पाखर सारखीच सर्वांवर पडावी अशी प्रार्थना केली आहे. भाष्यकारांचें लक्ष या स्वकीयत्वसंबंधा-कडे जावें तितकें गेलें नाहीं. यांतील ब्रह्म, क्षत्र आणि धन हे शब्द केवळ 'स्तोत्र, पराक्रम व धन' या अर्थी नसून तद्वाचक जे त्रैवर्णिक त्यांना उद्देशून त्यांचे प्रतीक म्हणून आहेत.

अर्थ:– हे पराक्रमी अश्विनी हो, तुम्ही आपला रथ जोडतां न जोडतां तोंच आमच्या क्षत्रियांवर तुमच्या मधु–तें घृत–शिंपडलें जावो; आमचे ब्राह्मण युद्धांत अजिंक्य ठरोत; आणि आमचे धनिक वैश्य जीवनकलहांत हटून पडोत किंवा आपआपल्या उद्योगाला लागोत.

प्रत्येक जण एक प्रकारें युद्धांत गुंतला आहे, असें या ऋचेचें स्वरूप आहे. जीवनकलह–Struggle for existence–याचें हें उत्तान स्वरूप आहे. रक्तपाती युद्धाचें हें वर्णन दिसत नाहीं.

( ५ ) देवानां यः पितरमाविवासतो श्रद्धामना हविषा ब्रह्मणस्पतिम् ॥
चार वर्ण स इज्जनेन स विशा स जन्मना स पुत्रैर्वाजेभरते धनानृभिः[१] ॥ ऋ. २.२६.३.

या ऋचेच्या द्वितीयार्धांत स हें सर्वनाम चार वेळां पुनरुक्त झालें आहे. यावरून यांत ऋ. १.११३.६ ( वरील ३ री ऋचा ) प्रमाणें चार वर्गांचा उल्लेख उघड दिसतो. पैकीं ( १ ) विशा, ( २ ) नृभिः पुत्रैः यांत वैश्य आणि क्षत्रिय यांचा उल्लेख स्पष्टच आहे. 'विश' शब्द ( ऋ. ८.३५.१८ वरील १ ली ऋचा ) वैश्य या अर्थी वर आलाच आहे. तशेच 'नृ' शब्द ( ऋ. ८.३५.१७ ). 'जनेन' आणि 'जन्मना' या शब्दांचे अर्थ ठरविले पाहिजेत.

'जनेन' यांतील 'जन' शब्द दास किंवा शूद्र या अर्थी योजलेलाहि 'इमे जनाः देवगोपाः इंद्रगोपाः मदंति' या ऋचेंत दिसून आला आहे. अर्थात् जन=अवशिष्ट जन किंवा शूद्र.

'जन्मना'–ब्राह्मणमद्य विदेयं पितृमंतं पैतृमत्यं ऋषिं आर्षेयं सुधातुदक्षिणम् । असें यजुर्वेदांत म्हटलें आहे. म्हणजे ब्राह्मण हा परंपरेचा अभिमानी आहे, प्रवरऋषींचा आणि ऋषिकुलांतील किंवा या ऋचेंतल्या ब्रह्मणस्पतीपासूनच्याच जन्माचा व उच्चपणाचा अभिमान बाळगतो असा उल्लेख दर्शवितो. देवानां पितरं ब्रह्मणस्पतिं । यावरून देव=ब्राह्मण असा अर्थ दिसतो. ब्रह्मणस्पति='ब्राह्मणां'चा पति= ब्रह्म म्हणणाऱ्या ब्राह्मणांचा पिता=देवानां पितरम् ।

सुजनिमानः नः ॥ ऋ. ७. ६२.४–ये यां जज्ञुः सुजनिमान नः द्यावाभूमी लाघीयाम् ।

---

१ आमचा हा अर्थ पाश्चात्यांपैकीं झिम्मरला पसंत आहेसें दिसतें. ( वेदिक इंडेक्समधील 'जन' या शब्दावरील टिपण पाहा ) जन आणि विश हे शब्द भिन्न आहेत असें ( ऋ. १०.९१.२ ) वरूनहि दिसून येतें.

अर्थ:– हे द्यावा पृथिवी हो, तुम्हांला जाणणारे जे उत्तम कुळांतले आम्ही त्या आमचे रक्षण करा.

शुभ्वं जन्म न, सुजं कृणवानः ॥ ऋ. ४.३८.६

अर्थ:– शुभ जन्माचा मनुष्य, कुलीन अभिजात मनुष्य, जसा (गळ्यांत) माळा घालतो तसा; केवळ कुलीन घोड्यांनाच माळा घालीत असा अर्थ नव्हे. ' करवला ' असा अर्थ वेदिक इंडेक्सकार करतात तो पसंत वाटत नाही. अंगावर पुष्पमाला घालण्याचा प्रघात आमच्याकडे तरी फार जुना आहे. तेव्हां ' शुभ जन्माचा ' आणि ' अशुभ जन्माचा ' किंवा 'कुलीन आणि अकुलीन, पुण्ययोनि, पापयोनि, उच्चशाख आणि नीचशाख' असा भेद मानवांतच मानीत, असा अर्थ असून ब्राह्मण आपल्या ऋषि-कुलाविषयीं विशेष अभिमान बाळगी, तो आपल्याला अग्रजन्मा म्हणवी असा अर्थ दिसतो. ऋचेचा संदर्भ पाहिला तरी विश, क्षत्रिय व शूद्र यांचा उल्लेख असल्यावर ब्राह्मणांचाच या शब्दानें उल्लेख संभवतो. खालील टीप याच अर्थाची आहे. जन्मना– Brahman-Purity of descent. The importance of pure descent is seen in the stress laid on being a descendant of a ऋषि (आर्षेय. Vedic Index, Vol II. p. 84.)

अर्थ:— जो श्रद्धेनें देवांचा पिता जो ब्रह्मणस्पति त्याला हवि देतो तो या चार प्रकारच्या लोकांसुद्धां वाज आणि धन यांनीं संपन्न होतो. अर्थात् ब्रह्मणस्पतीला उद्देशून केलेला यज्ञ, सर्व प्रजांचा–सर्व समाजाचा–संतोष ऐहिक संपत्ति (अन्न किंवा ऐहिक भोग) व पारलौकिक फल, यांनीं संपन्न करतो. (भाष्यांतील या ऋचेच्या द्वितीयार्धाचा अर्थ समाधानकारक वाटत नाहीं.)

सारांश, या ऋचेंत चारहि वर्णांचा उल्लेख आहे. केवळ चार वर्गांचा नाहीं. कारण ब्राह्मण जन्मानें वरिष्ठ व पवित्र बनला होता. हे वर्ग जन्मजात होते, केवळ व्यवसायात्मक नव्हते, ही गोष्ट या ऋचेंत निश्चित होते. ब्राह्मण जो आपल्यास शुभजन्माचा म्हणवी तो आनु-वंशिक गुणसामर्थ्य ओळखूनच. त्यांतल्या त्यांत ब्राह्मण जन्माभिमानी अधिक असला तरी क्षत्रिय आणि वैश्य हेहि शुभ जन्माचेच म्हणवीत आणि

म्हणून 'अग्रजन्मा' असें ब्राह्मण म्हणवी. विशः म्हणजे सामान्य प्रजा असा अर्थ येथें घेऊन चालणार नाहीं. वेदिक इंडेक्सकारांस 'विशः' शब्द सर्वत्र प्रजावाचक आढळला, वैश्यांचा वाचक आढळला नाहीं; परंतु हें म्हणणें वस्तुदर्शक नाहीं, ही गोष्ट या ऋचेनें सिद्ध होते.

( ६ ) स इत्क्षेति सुधित ओकसि स्वे, तस्मा इळा पिन्वते विश्वदानीम् ॥
तस्मै विशः स्वयमेव नमंते, यस्मिन् ब्रह्मा
तीन वर्ण राजनि पूर्व एति ॥ ऋ. ४.५०.८.

( ७ ) अप्रतीतो जयति सं धनानि, प्रतिजन्यानि उत या सजन्या ॥
अवस्यवे यो वरिवः कृणोति, ब्रह्मणे राजा
सजन्य व प्रतिजन्य तमवंति देवाः ॥ ऋ. ४.५०.९.

अर्थः—ज्या राजाच्या किंवा क्षत्रियाच्या (राजन् हा शब्द क्षत्रियवाचक आहे. आपटे कोश : राजन्= [ २ ] A man of the military caste उ. राजन्य. ) राज्यांत ( राज्य करीत असतां ) ब्रह्मा ( ब्राह्मण ) पुढें चालतो ( पुरोहित असतो ) त्या राजाला विशा ( प्रजा किंवा वैश्य ) आपण होऊन नम्र होतात आणि पृथ्वी निरंतर व भरपूर समृद्धि देते. ( ८ ). जो राजा अवस्यु ( रक्षणीय ) अशाला ( ब्राह्मणाला ) धनसंपन्न करतो. त्याचें देव संरक्षण करतात; तो सजन्य आणि प्रतिजन्य धनें अप्रतिहत संपादन करतो.

ब्रह्मापुरो एति ब्रह्मणां स्तोत्राणां कर्ता ब्राह्मणः सर्वेभ्यः जनेभ्यः पुरो एति अग्रमानार्हः भवति । हा ब्रह्मा शब्द सर्व ब्राह्मणांचा मूळ पुरुष आहे. ब्रह्मा अथवा ब्राह्मण ( ब्रह्मा याचे पुत्र ) या शब्दाचे अर्थ कसे बदलत गेले याविषयीं पंडितांची कल्पना. पृष्ठ ४८५ यातील टीपेंत पाहा. मं. ४.

अवस्यवे–( १ ) अवः=अन्न ( अन्नानि ), ( २ ) अवस्=अयन ( रक्षण )–यास्क, दुर्गाचार्य ( पा. ७५२ ), ( ३ ) अवस्यवे रक्षणेच्छवे ( ब्राह्मणाय ) वरिवः कृणोति धनं ददाति ( वे. यत्न. पा. ४८४ ), ( ४ ) साहाय्याची इच्छा करणारे ( चित्राव ), संरक्षणाची अपेक्षा असणारे (शु०), ( ५ ) अवः रक्षणं तद् इच्छति क्यच् उन् – Ved. Desiring favour, help or protection —( आपटे ).

या दोन ऋचांत ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य आणि चवथे शत्रु यांचा उल्लेख असून ब्राह्मणाला पुरोहितत्व आणि अवस्युत्व प्राप्त झालेलें होतें, असें दिसून येतें. ब्राह्मणाचें पुरोहित या दृष्टीनें अतीव महत्त्व आणि सामान्य प्रजेंतील त्याची लोकमान्यता विलक्षण दिसते तशीच त्याचें 'अवस्यु'त्व— त्याची सर्वांशीं समता आणि निर्लोभी व अक्रोधन वृत्ति दिसून येतें. येथें गायिलेली थोरवी ही व्यक्तिगत नसून सर्व वर्णाची आहे. श्रमविभागानें असें वर्णश्रेष्ठत्व प्राप्त होईल काय ! ईश्वरदत्त बुद्धीनें एखादी मनुष्यव्यक्ति श्रेष्ठता संपादन करील आणि विशिष्ट विद्येनें पुरोहितत्व मिळवूं शकेल, पण सबंध वर्ग अशी लोकमान्यता मिळवील आणि अवस्युत्व संपादण्याची हाव धरील असें वाटत नाहीं. जाणून बुजून असें दास्यत्व व हीनत्व कोणी पत्करणार नाहीं, तसेंच 'अवस्यु'त्वहि पत्करणार नाहीं. तें सोपेंहि नाहीं. अर्थात्, येथें 'जन्मना' एक प्रकारचें पूर्वजस्थापित शील कायम ठेवण्याचाच प्रश्न असला पाहिजे.

विशः शब्दानें सर्व प्रजा असा अर्थ घेतां येईल. परंतु सर्व प्रजेंत विशेष प्रसंग किंवा एकोपा असल्यावांचून विशेष असें सामर्थ्य नसतें; त्यामुळें ज्या प्रजा स्वखुषीनें आपण होऊन करभार देणार नाहींत त्या प्रजा ब्राह्मणाचे लोकमान्यतेनें किंवा भीतीनें ( कदाचित् अभिचारसामर्थ्याच्या भीतीनें ) देत असाव्या. तेव्हां श्रीमान् श्रेष्ठी आणि बलवान् क्षत्रिय ( राजन्याशिवाय किंवा त्यांखेरीज ) यांचाच हा उल्लेख समजला पाहिजे. ऋ. ४.५०.९ मध्यें प्रत्यक्ष धनाचाच उल्लेख आहे. सजन्य म्हणजे राज्यांतले आपलेच भाऊबंद. वरच्यासारखे धनवान् आणि बलवान् लोक आणि प्रतिजन्य अथवा शत्रु या सर्वांकडून राजाला करभार प्राप्त होतो. यांत त्रैवर्णिक आणि शत्रुरूपी लोक यांचा उल्लेख असून ब्राह्मणाचें ब्रह्मवर्चस्व, अभिचारसामर्थ्य, प्रजेवरील स्वयमेव प्रभुत्व आणि ब्रह्मक्षत्र एक झाल्यास सर्व जगाला तुच्छ मानणारें

१ विश शब्दांत या अर्थाचाहि समावेश होतो ही गोष्ट ऋ. १०.८४.४ वरून निश्चित होते. कारण त्यांत विशांना युद्धपर्व (विशं विशं युधये) तयार करण्याविषयींची प्रार्थना आहे. आणखीहि अशीं ४१५ स्थळें आहेत, पण युद्धाचा अर्थ जीवनकलह असा घ्यावयाचा असें ऋ. १.१५७.२ वरून दिसतें. त्यामुळें वैश्य-सबंध युद्धाला तयार असत अशी खात्री होत नाहीं.

-दोघांचें राज्यकर्तृत्व हीं आदळून येतात. चातुर्वर्ण्यातील आनुक्रमिता, श्रेष्ठता व त्याचें कारण समजतें. नुसत्या एकमेकांच्या गांठी ज्या विशिष्ट अनुक्रमानें पडल्या त्या अनुक्रमावर त्यांचें श्रेष्ठत्व अवलंबून राहणें अशक्य नाहीं काय ? वास्तविक स्वयमेव पराक्रमी असा जो क्षत्रिय त्यानें अवस्यु ब्राह्मणाला आणि कृषिगोरक्षणांत गुंतलेल्या वैश्याला सहज कांखोटींत मारावें, अशा पराक्रमी बलशान् क्षत्रियावर आणि धनसंपन्न व थेगुमान वैश्यावर जें दरिद्री ब्राह्मणाचें वर्चस्व स्थापित झालें त्याचीं कारणें त्याचा स्वार्थत्याग, त्याची विद्वत्ता, देवसहाय, परलोकविद्या, अभिचारमंत्रसामर्थ्य आणि सर्वभूतहितेरति हींच. लोकभ्रम आणि लोकांचा धर्मभोळेपणा हेंहि अंशतः कारण मानतां येईल. अंधळ्याला लंगडा मागाहून भेटला तरी लंगडा चक्षुष्मान असल्यामुळें तो अंधळ्याच्या डोक्यावर बसावयाचा हा जगाचा नियम, त्याप्रमाणेच पराक्रमी, शस्त्रसंपन्न क्षत्रिय ब्राह्मणाइतकाच बुद्धिमान् असेल तर अधिकारी व श्रेष्ठ झालाच पाहिजे. अशा स्थितींत अवस्यु ब्राह्मणानें आपलें वर्चस्व गमावलें नाहीं, कमावलें व वाढविलें आणि 'ब्रह्मक्षत्रियांची जोडगोळी जगाची—स्वजनपरजनांची—मोळी बांधूं शकते' हा सिद्धांत स्थापन केला. हें एक जगांतलें आश्चर्यच समजलें पाहिजे. 'रोमन प्रीस्टहुड'नें कित्येक शतकें रोमवर आणि युरोपवर आपलें वर्चस्व प्रस्थापित केलें व टिकविलें हें खरें, पण ते हिंदी ब्राह्मणांप्रमाणें 'अवस्यु' नव्हते. सारांश, मागील ऋ. २.२६.३ आणि या ४.५०.८,९ या प्राचीन ऋचांतून त्रैवर्णिकांचें जन्मसिद्ध-वर्णत्व सिद्ध होतें. एक ब्राह्मण तेवढा जन्मानें ठरतो, असें म्हणतां येत नाहीं. दास बोलून चालून आसुरसमाजांतून अनार्य म्हणून आलेला असें तैत्तिरीय संहितेवरून स्पष्ट दिसतें. त्याच्याशीं सामाजिक दळणवळण उत्पन्न व्हावयाला अवकाशच दिसत नाहीं. तो नकटा, काळा, दुष्ट बुद्धीचा व हलका असेल तर तें अशक्यच; पण नकटा व काळा तरी दुष्ट बुद्धीचा व सामाजिक दृष्टीनें कनिष्ठ पायरीचा असलेमुळें कांहीं अडचणींच्या प्रसंगाशिवाय त्याशीं सरळ वैवाहिक संबंध सहसा घडूं शकेल असें वाटत नाहीं. अस काय त्या दासांत गुण होते, कीं आर्यांनीं आनुवंशिक गुणांचा आरसा डोळ्यांपुढें असतांना दासींना माळावें किंवा आर्यस्त्रियांनीं दासांना माळावें ? प्रतिलोमविवाहाचीं सर्वसामान्य उदाहरणें वैदिक वाङ्मयांत

सांपडतात काय? अपवादादाखल दिलेल्या एखाद दुसऱ्या उदाहरणावरून नियम मात्र सिद्ध होतो; तो दाखला होऊं शकत नाहीं. म्हणून वृषपर्वा किंवा दीर्घतमस् यांचें पौराणिक उदाहरण आम्ही मान्य करीत नाहीं. वृषपर्व्याचा उल्लेख पुराणांतून येतो, वेदांत दिसत नाहीं, हाच त्याच्या अतिप्राचीनत्वाचा पुरावा. दीर्घतमससंबंधानें पुढें आम्ही स्वतंत्रपणें अखेर लिहिणारच आहों.

प्राचीन अशा २, ४ या आणि ८ मंडलांतून चातुर्वर्ण्य आढळतें–केवळ चातुर्वर्ण्य नव्हे–असें म्हटल्यावर अर्वाचीन अशा १,१० या मंडलांतील उदाहरणें चातुर्वर्ण्यदर्शक नसून चातुर्वर्ण्यात्मकच आहेत असें निराळें सांगावयाचें कारण उरत नाहीं.

(८) तिस्रः प्रजाः ज्योतिरग्राः ॥ ७.३३.७ या ऋचेचा प्रत्यक्ष नाहीं तरी अप्रत्यक्ष उल्लेख पूर्वी केलाच आहे.

तीन प्रजा–वर्ण — ज्योतिरग्र म्हणजे अग्निप्रमुख किंवा अग्निपूजक किंवा ज्ञाननिष्ठ अथवा ब्राह्मणानुगामी.

अर्थात् पहिले तीन अर्थ घेतले तर 'तिस्रः प्रजाः' म्हणजे तीन वर्ण घेतां येतील, पण ब्राह्मणानुगामी असा अर्थ केला तर चारीहि वर्णांचा आंत समावेश होऊं शकेल.

(९) यद् इंद्राग्नी मदथः स्वे दुरोणे यद् ब्रह्मणि राजनि वा यजत्रा ॥
[ अतः परिवृषणा वा हि यातमथा सोमस्य पिबतं सुतस्य ॥ ] १.१०८.६

अर्थ :— हे यजत्र ( क्षत्रिय ) व वृषण ( बलशाली ) इंद्राग्नि हो, तुम्ही आपल्या स्वतःच्या घरीं म्हणा किंवा (२) एखाद्या ब्राह्मणाच्या घरीं म्हणा, वा (३) एखाद्या राजन् ( क्षत्रिया )च्या घरीं आनंदांत असा, तेथून येथें– जेथें सोम काढला आहे येथें–या आणि सोम प्या.

(१०) नेह भद्रं रक्षस्विने नावयै नोपया उत ।
गवे च भद्रं धेनवे वीराय च श्रवस्यते ।
अनेहसो व ऊतयः सु ऊतयः व ऊतयः ॥ ऋ. ८.४७.१२

अर्थ :– आमचे घरचे आणि दारचे (जवळचे आणि दूरचे शत्रु जे रक्षस्विन् त्यांचें ) कल्याण न होवो. (१) गो आणि धेनु यांचें, (२) वीरांचें,

आणि (१.) अवस्यत्[१] यांचें कल्याण–विशेष कल्याण–होतो, (कारण) तुमच्या साहाय्यशक्ति उत्कृष्ट असतात.

या ऋचेंत स्वजनांचे तीन प्रकार आणि प्रतिजनांचे दोन प्रकार वर्णन केले आहेत हें उघड आहे. वीर शब्द क्षत्रियांचा बोधक आहे. गो आणि धेनु हे शब्द वैश्यांचे प्रतीक दिसतात. आणि 'अवस्यत्'. म्हणजे यशोत्सुक असे ब्राह्मण घेणें उचित आहे. कारण 'ब्रह्मासुन्वतां इच्छति' असें ऋ. ९.११२.१ यांत सांगितलेंच आहे. वैश्यांची गोधेनुसंपन्नताच विशेष उत्कटतेनें दिसत होती. गाय हें विनिमयाचेंहि साधन असावें. यावरून गायींची विपुलता प्रतीत होते तशी वैश्यांची सांपत्तिक स्थिति समजून येते. ऋ. ८.२५.१७ यांतहि वैश्यांची गोरक्षणवृत्तीच दर्शविली आहे. अर्थात्, रा. सा. चापेकरांची एतद्विषयक शंका व्यर्थ आहे.

रक्षस्विन् शब्दानें शत्रूंचा बोध होतो. ते शत्रुघरचे आणि बाहेरचे किंवा जवळचे आणि दूरचे असे दोन प्रकार कां करावे? हे राक्षस काय लंकेकडचे समजावयाचे? तसें म्हणावें तर जवळचे आणि दूरचे असें कां म्हणावें? राक्षस ही जात आणि ती भिन्न वंशाची अशी कल्पना असती तर यापेक्षां निराळें वर्णन पाहिजे होतें. पण 'राक्षस' म्हणजे रक्षितव्य अस्मात्–ज्यापासून स्वतःचें 'रक्षण करणें अवश्य' (निरुक्त) अशा प्रकारचे रोग किंवा तिर्यक् पशुपक्षी किंवा मानव. कारण या तीनहि अर्थी हा शब्द वैदिक कालीं वापरीत. ८.३५.१६।१७,१८ यांत त्यांचें अमीव म्हणजे रोगांशीं साहचर्य दाखविलें आहे. ९.८५.१ यांत तर अप अमीवा भवतु रक्षसाहइ–असेंच सांगितलें आहे. सारांश, घरचे शत्रु दोन प्रकारचे दिसतात–रोग आणि मानव शत्रु. पण जवळचे राक्षस किंवा मानव शत्रु कोण? आमच्या समजुतीनें (१) स्वजातीय पण परांचे पृष्ठीः किंवा सहाय्यक अर्थात् आपल्यांतील संशयास्पद वर्तनाचे, मिथ्याचारी व मोंदू लोक दिसायला स्वकीय धर्माचे पण पोटीं उमाळा अवैदिक मार्गाचा. (२) अयज्विय लोक मूळचे स्वसमाजांतलेच लोक पण स्वतः त्यांतून फुटल्यामुळें हे शत्रुस्थानीय वाटले. तेहि जवळचे शत्रु म्हणतां येतील. बाहेरचे शत्रु म्हणजे उघड

---

१ अवस्यति longs for a sacrifice—(आपटे कोश).

शत्रु. राजकीय शत्रु व धार्मिक त्याज्य राजकीय शत्रु असते तर घरांत त्यांना मोकळें कोणी ठेवलें नसतें. पण तसें दिसत नाहीं. अर्थात्, धार्मिक शत्रु व कैदेंत टाकतां येण्यासारखे नव्हते ते अर्थात् धार्मिक दृष्ट्या भिन्न आचार-विचारांचे ( अन्यव्रती ) लोक जे आपल्यांत समाविष्ट नाहींत असे-जे वरून ओळखतां येण्यासारखे नाहींत असे.

एवंच १,२,४,७,८,१० अशा मंडलांतून चातुर्वर्ण्याचे कांहीं सरळ व स्पष्ट तर कांहीं आनुमानिक असे उल्लेख येतात. याखेरीज 'पंचजन' शब्दांत चातुर्वर्ण्य आणि निषाद यांचा समावेश होतो असें 'औपमन्यव' म्हणून एक निरुक्तकारांचा उल्लेख यास्काचार्य करीत असतात. ते म्हणतात, खुद्द यास्काचार्यहि आणि शाकटायनहि केव्हां केव्हां हाच अर्थ घरून चालतात असें म्हणणारा एक संप्रदाय प्राचीन काळीं होता ! या आचार्यांचा अर्थ मान्य केल्यास ऋग्वेदाच्या प्रत्येक मंडलात चातुर्वर्ण्याचा उल्लेख अनेक वेळां आलेला आहे असें कबूल करण्यावांचून गत्यंतर नाहीं. 'पंचजन' शब्दावरील आमचें टिपण पाहा. केवळ १० व्या मंडलांत नाहीं, केवळ तात्त्विक व आलंकारिक स्वरूपाच्या पुरुषसूक्तांतून नाहीं किंवा एकच नाहीं; जो आहे तो चातुर्वर्ण्याचा किंवा केवळ व्यवसायात्मक आहे असेंहि नव्हे. चातुर्वर्ण्याच्या उत्पत्तीसंबंधानें वैदिक व पौराणिक वाङ्मयांतून सर्व उतारे काढून मूरसाहेबानें असें दर्शविलें आहे कीं, चातुर्वर्ण्याच्या उत्पत्तीच्या व उपपत्तींच्या कथा अनेकविध आणि परस्परविरुद्धहि आहेत. आम्हांला वैदिक व पौराणिक कथांची अशी भेसळ करून अनुमानें काढण्याची पद्धति पसंत नाहीं, तथापि आम्ही इतकेंच म्हणतों कीं, पूर्वाचार्यांना चातुर्वर्ण्याची समाधानकारक उपपत्ति देतां आली नाहीं, म्हणून खुद्द चातुर्वर्ण्य असिद्ध ठरत नसून उलट सिद्धच ठरतें ! मूरसाहेबानें जो निष्कर्ष काढला आहे तो मात्र फारसा आमचेविरुद्ध नाहीं. तो म्हणतो कीं, चारहि वर्णांची मूळ उत्पत्ति एकाच मूळ पुरुषापासून ही पौराणिकांची समजूत आनुक्रमिक व वंशपरंपरागत भेदरेषां विरुद्ध असल्यामुळें खरी मानण्यास हरकत नाहीं.

The series of passages just quoted is amply sufficient to prove that according to traditions received by the com-

pilers of the ancient legendary history of India (traditions so general and undisputed as to prevail even over their strong heirarchaical prepossessions) ब्राह्मणs, क्षत्रियाs *and even* वैश्याs and शूद्राs *were* at least in many cases, *originally descended from one and the same stock.* The European critic can have no difficulty in receiving these obscure accounts as true in their literal sense; though the absence of precise historical data may leave him without any other guide than *speculation to assist him in determining* the *process* by which *a community originally composed for the most part of one uniform element was broken up* into different classes and professions separated from each other by impassable barrier(ओरिजिनल संस्कृत टेक्स्टस्, भाग १ ला, पा. २२८).

मुरसाहेबांना आम्हीं येथें दिलेल्यांपैकीं कांहीं ऋचांचा आणि ऋग्वेदांत—केवळ लोकसमजुतींत नव्हे—आढळून येणाऱ्या आनुवंशिक श्रेष्ठपणाचा पत्ता लागलेला नव्हता, किंवा जेथें लागला तेथला त्यानें पूर्वग्रहामुळें, अमान्य अगर उत्तरकालीन ठरविला. त्यामुळें त्याचीं सर्वच अनुमानें ग्राह्य धरतां येत नाहींत. त्यास आमचा नाइलाज आहे. त्यानें चातुर्वर्ण्य असिद्ध ठरविण्याची जितकी यातायात केली आहे इतकीच तें सिद्ध करण्याची घेतली असती तर त्याला या गोष्टी आढळून आल्या नसत्याच असें नाहीं. रॉथ व होग याच्याप्रमाणेंच किंवा अलीकडे कीथ व मॅक्डोनाल्ड या वेदिक इंडेक्स-कारांप्रमाणें त्यालाहि चातुर्वर्ण्य वैदिककालींच जन्मसिद्ध असल्याचें आढळून आलें असतें. पुष्कळदां एखादा पूर्वग्रह कांहीं तरी कारणानें होऊन बसतो आणि मग तो त्या चष्म्यानें पाहूं लागल्यावर नेमकें तदनुकूल गोष्टींकडे त्याचें लक्ष जातें. ही गोष्ट शोधकाचे नजरेस नेहमीं येत असते. तसेंच येथें घडून आलें आहे.

याच पानांत मूर म्हणतो :

We shall see in the next chapter that, irrespective of the verse of the पुरुषसूक्त, there are in the ऋग्वेदसंहिता a few texts in which the ब्राह्मणs *are mentioned alone of all the four classes*........सारांश, पुरुषसूक्ताशिवाय ब्राह्मणांचा उल्लेख आहे ही गोष्ट मूरला कबूल आहे. वे. इं.कार म्हणतात : ब्राह्मण descendant of a ब्राह्मण is found only a few times in the ऋग्वेद....In the अथर्ववेद and later it is very common...and it appears in the quadruple division of the castes in the पुरुषसूक्त. कित्येक अर्वाचीन पंडितांना ती तशी दिसत नाहीं. म्हणून व पुढें आम्हांसहि तें सांगावयाचें म्हणून हा उल्लेख येथें केला. मूर राजन्य किंवा क्षत्रिय आणि वैश्य किंवा शूद्र यांचा मात्र उल्लेख नाहीं म्हणतो हें चुकीचें. एक तर शूद्र किंवा वैश्य शब्दांऐवजीं दुसरे कोणते शब्द वापरले आहेत हें त्याचे लक्षांत आलें नाहीं किंवा 'विशः' शब्द सर्वथा प्रजा या अर्थीच आहे असा त्यानें आपला ग्रह करून घेतला आहे.

दुसरी एक गोष्ट मूरनें कबूल केली आहे, ती फार महत्त्वाची आहे. तो म्हणतो : As the ऋग्वेदसंहिता is made up almost entirely of hymns in praise of the gods, it *was not to be anticipated that it should furnish any systematic or detailed explanation on the points which form* the sudject of enquiry ( on the signification of the words ब्रह्मन्, ब्राह्मण etc. ).

आतां ब्राह्मण व ब्रह्मन् या शब्दांचे सर्व उल्लेख उद्धृत करून तो काय अनुमानें काढतो पाहा :

( 1 ) Except in the पुरुषसूक्त there is no distinct reference in the hymns to any recognised system of four castes आम्ही तर उलट म्हणतों कीं, पुरुषसूक्तांत तरी चातुर्वर्ण्य आहे अशी त्याची पटते आहे ना ! ऋग्वेद कांहीं चातुर्वर्ण्याच्या सिद्धांताकरितां लिहिलेला ग्रंथ नव्हे हें खरें ना ! पुरुषसूक्तादर्शांच, किंबहुना त्याहूनहि अधिक ८.३५.

१६।१७।१८ यांत त्रैवर्ण्यसिद्धि स्पष्टतर दिसते. आणि आम्ही असें म्हणण्याचें धाडस करतों कीं, त्रैवर्णिक कांहीं शेवकांशिवाय राहात नव्हते. अर्थात्, चवथा वर्ग त्या वेळीं होताच; एवढेंच नव्हे, तर तो त्रैवर्णिकांपेक्षां कमी दर्जाचा होता. आर्यसमाज त्रैवर्ण्यापुरताच खरा. चवथा वर्ण मागाहून शामिल करून समाज स्वयंपूर्ण ( self-contained ) करण्यांत आला. मूळचें ध्येय समाज आर्य कोणता होऊं शकतो हें ठरविण्याच एवढेंच. त्यांत आनुक्रमिकता होती व ब्राह्मण श्रेष्ठ होता ही गोष्ट मूरनें ठरविलीच आहे.

( 2 ) In one text ( III. 34.9 ) where mention is made of the आर्यन् colour (?) or race (?) all the upper classes of the Indian community are comprehended under one designation as the क्षत्रियs and वश्यs as well as ब्राह्मणs were always in after times regarded as Aryas. ( प्रश्नचिन्हें आमचीं ).

या उल्लेखाविषयीं आम्हीं चर्चा पूर्वी केलीच आहे. या ठिकाणीं *आर्य आणि दास यांचाच फक्त विरोध दाखविला आहे*, ही गोष्ट मूरचे मुळींच लक्षांत आलेली दिसत नाहीं. वर्ण म्हणजे रंग किंवा वंश नव्हे. वर्ण म्हणजे या ठिकाणीं आर्यांची निवड किंवा पंथ, किंवा वर्ग किंवा संस्त्. त्याचा type किंवा वंश हा अर्थ मागाहूनचा. या आर्यांतच पुढें ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य उत्पन्न झाले. त्यामुळें मूरचें दुसरें *विधान बरोबर आहे.*

( 3 ) The term ब्राह्मण occurs only in eight hymns of the ऋग्वेद besides the पुरुषसूक्त, while ब्रह्मन् occurs in forty-six. The former of these words could not therefore have been in common use at the time when the greater part of the *hymns was composed......*

यावरून काय सिद्ध होतें ? इतकेंच कीं, मूळ शब्द ब्रह्मन् ( ब्रह्मापासून). पुढें ब्राह्मण शब्द रूढ झाला, किंवा दोनहि एकदम रूढ असले तरी एक दुसऱ्यापेक्षा अधिक रूढ होता. पण पुढें गळला. हीच गोष्ट राजन्य, वैश्य

किंवा शूद्र शब्दाची. शूद्र हा शब्द नवीन रूढ झाला हें कबूल. त्यावरून शूद्रांचें चातुर्वर्ण्यांतलें अस्तित्व असिद्ध ठरूं शकत नाहीं. किंबहुना चातुर्वर्ण्यच त्रैवर्ण्याच्या मागाहूनचें हेंहि कबूल. त्यावरून त्रैवर्ण्य वा चातुर्वर्ण्य असिद्ध ठरूं शकत नाहीं. वैश्य शब्द विश शब्दापासून झाला हेंहि कबूल. पण विश हा वैश्य या शब्दाचे ऐवजीं कित्येक ठिकाणीं येतो हें सूरचे लक्षांत आलें नाहीं. जसें ब्रह्मन् व ब्राह्मण तसेंच विश व वैश्य. विश = प्रजा असाच अर्थ सर्वत्र घेणें अयुक्त. राजन्य आणि क्षत्रिय शब्दांची अशीच गोष्ट. राजन्य शब्द एकदांच पुरुषसूक्तांत आला असेल. त्यामुळें क्षत्रिय वर्गाचें अस्तित्व नाचावीत कसें होतें ! वेद हा चातुर्वर्ण्यांसंबंधीं ग्रंथ नव्हे. त्यात ओघानें शब्द आले तेवढीच शब्दसंपत्ति असा अर्थ नव्हे. तेवढीच शब्दसंपत्ति आज ज्ञात आहे इतकेंच.

(4) The word ब्राह्मण appears to have had at first the sense of, "sage", "poet"; next that of "officiating priest" and ultimately that of a "special description of priest." यौगिक अर्थानें वेद लावण्याची पद्धति पाश्चिमात्यांना मान्य झाली आहे. पण अशा अनेक पद्धति पूर्वी अस्तित्वांत होत्या. यौगिक पद्धतीमुळें अमुक अर्थ प्रथमचा व अमुक मागाहूनचा असें म्हणण्यांत येतें, परंतु ती पद्धति अनिश्चित शब्दांचे अर्थ कसे ठरवावयाचे हें पाहतांना आपण उपयोगांत आणित असलों तरी ज्ञात अर्थांचे वेळीं ही पद्धति उलटी उपयोगांत आणावी लागते. हें सर्वांच्या परिचयाचें आहे. म्हणजे अर्थावरून आपण शब्दांतील धातु शोधतों. कारण 'धातूंचे अनेक अर्थ आहेत' हेंच निरुक्ताचें मूळ सूत्र.

(5) In some of the texts which have been quoted (particularly I.108.7; IV. 50.8; VIII. 7.20; VIII. 45, 39; VIII. 53.7 VIII. 81.30; IX. 112.1; X. 85.29) ब्राह्मण seems to designate a "priest by profession."

यांपैकीं IV.५०.८ या ऋचेची चर्चा आम्ही केलीच आहे. त्या ठिकाणीं असें अर्थ करणें योग्य होय. मंत्रांपेक्षां जास्त अर्थ का

घ्यावा लागतो याविषयीं आणखी चर्चा पुढें येणार आहे. बाकी ऋचां-विषयीं सूत आम्हीं आपलें मत राखून ठेवतों.

(6) In other places the word seems rather to imply something peculiar to the individual and to denote a person distinguished for genius or virtue ( X. 107.6 ) or elected by special divine favour to receive the gift of inspiration ( X. 125.5 ). हें अनुमान अशक्य नाहीं.

( 7 ) ब्राह्मण *appears to be equivalent to* ब्रह्मपुत्र. " The son of a ब्रह्मण ( which as we have seen occurs in VI. 43.2 ) and the *employment of such a term seems necessarily to presuppose* that at the time when it began current, the function of a ब्रह्मण–*the priesthood–had already become a profession.*

आम्ही तरी हेंच म्हणतों कीं, ‘ ब्रह्मपुत्रं इव सवनेषु शंसति ’ या ऋचेंतील ब्रह्मपुत्र हा उल्लेख ब्राह्मण हा ‘ जन्मना ’ सिद्ध असून जन्मानेंच विशिष्ट गुणयुक्त होतो अशी मोठी बाळगतो. या गोष्टीकडे मूरचें लक्ष गेलेलें दिसत नाहीं. वैदिक इंडेक्सकारांचें गेलें आहे व त्याचा उल्लेख वर केलाच आहे. ब्राह्मणादि वर्गांचें जन्मजात अस्तित्व या एका शब्दावरून देखील ठरतें. ब्राह्मण ‘ अध्वर्यु ’ आणि ‘ पुरोहित ’ बनला होता. त्यांपैकीं पुरोहितांचें बुद्धिग्राह्य व विशिष्ट शिक्षणावर अवलंबून असल्यामुळें तें वृत्तिपर अर्थ घडेल इतकेंच म्हणता येईल; परंतु ‘ अध्वर्युत्व ’ सहसा कोणी पत्करणार नाहीं, हें आम्हीं वर दर्शविलेंच आहे. याशिवायहि ‘ दर्भभर सर्व ब्राह्मविणारा ’ वगैरे जीं विशेषणें त्यास लाविलेलीं आढळून येतात त्यांवरून तें शब्दांचें वापराप्रमाणेंच अधपड दिसतें. ब्राह्मण जसा कांहीं बाबतींत उपमान झालेला होता त्याप्रमाणेंच हो यज्ञाचा विषय वैदिक कालांतच झालेला होता, असें कित्येक ठिकाणीं आढळून येतें. या गोष्टी शुचिविषयकच असतील असें सांगत नाहीं. या गोष्टी दुआजरी असू शकतील किंवा आविर्भावादि असूं शकतील. अशा वैकल्पिक स्थितींत ‘ ब्रह्मपुत्र ’ या एका शब्दानें मात्र जन्मजात जाति निश्चित ठरूं शकली, ही गोष्ट समाधानकारक होय.

## कीथ व मॅक्डोनाल्ड-वैदिक इंडेक्सकार-यांचे मत

It seems *certain* that *in the* ऋग्वेद this ब्राह्मण is already a *separate caste* differing from the warrior and the agriculturist *castes*. The texts regularly claim for them a *superiority* to the क्षत्रिय *caste*. It is expressly recognised that the union of the क्षत्रिय and the ब्राह्मण is essential for complete prosperity ( ही ऋचा आम्ही दिलीच आहे, अशाच ऋचा इतर वेदांतहि आढळतात ). Towards the common people, on the other hand, the क्षत्रिय stood in a relation of well-nigh unquestionable superiority.

In the later संहिता and the ब्राह्मण the क्षत्रिय stands as a definite member of a social body distinct from the priest and the subject people and the slaves (?) ब्राह्मण, वैश्य and शूद्र. It is significant that राजन्य is a variant to क्षत्रिय and an *earlier one*. The connection of the क्षत्रिय with the ब्राह्मण was very close. The prosperity of the two is repeatedly asserted to be indissolubely associated especially in the relation of a king and domestic priest ( ? ).

The caste system is one that has progressively developed and that it is not legitimate to see in the ऋग्वेद the full caste system even of the यजुर्वेद; but at the same time *it is difficult* to doubt that the *system was already well on its way* to general acceptance.

It is admitted by Muir that in some passages it must mean *hereditary profession*. Moreover there are traces in the ऋग्वेद of the threefold or fourfold division of the people into ब्रह्म, क्षत्रिय and विश or into the three classes and the servile population (इटालिक व कंसातील मजकूर आमचा).

वरील सर्व विधानें वैदिक इंडेक्सकारांनी विशेषतः ऋग्वेदेतर पण वैदिक वाङ्मयांतून केलेलीं असली तरी तीं ऋग्वेदांतूनहि करितां येण्यासारखीं आहेत हें आमच्या एकंदर विवेचनावरून वाचकांना दिसून येईल.

वे. इं.कार यांचें खालील टिप्पण आमच्यांतील विद्वान् लोकांनींहि मनन करण्यासारखें आहे.

It is clear that ब्राह्मणs, *whatever their defects* represented the intellectual side of Vedic side and that the क्षत्रियs played the part only in a secondary degree and to a minor extent......A legend in the शतपथब्राह्मण shows clearly that the ब्राह्मणs regarded civilisation as being spread by them only; कोसल and विदेह are only rendered civilised and habitable by the influence of pious ब्राह्मणs. We need not doubt that the non-Brahmanical tribes had attained intellectual as well as material civilisation, but it is reasonable to assume that their civilisation was inferior to that of the Brahmins; *for the history of Hinduism is the conquest by the ब्राह्मणs not by arms but by mind*-of the tribes, Aryan and Non-Aryan.

आर्यांचा—आर्य ब्राह्मणांचा म्हणा—इतर आर्यांवर आणि अनार्यांवर जो मोठा विजय—विजय म्हणून मानण्यांत येतो तो शस्त्रसाधनांनीं नसून मंत्रसाधनांनीं किंवा ज्ञानसाधनांनीं होता, हें ऐकून कोणत्या ब्राह्मणाचें मन अभिनंदनानें उल्हसित होणार नाहीं? आणि ही गोष्ट खरीच आहे. 'अवस्यु' असा ब्राह्मण, निःशस्त्रांनीं किंवा 'वाचेनें वीर' ब्राह्मण, कैलासापासून कुमारीपर्यंत आणि काठेवाडापासून कलिंगापर्यंत आपलें वर्चस्व स्थापन करतो आणि सर्व हिंदुस्थान—मगधासारखा किंवा मद्रासारखा एखादा भाग सोडून—एका वैदिक धर्मभावनेनें बांधून टाकतो, आपली भाषा तर निम्मा अधिक पृथ्वीवर पसरवितो, ही गोष्ट जगांतलें एक असामान्य आश्चर्य नव्हे काय? यानें खरोखरच 'विश्व आर्य' करण्याची प्रतिज्ञा बहुतेक पुरी केली यांत शंका नाहीं. इतकेंहि करून त्याची आशा—त्याचें ध्येय-काय म्हणाल तर

त्वाम् इत् यवयुर्मम कामो गव्युर्हिरण्युः । त्वां अश्वयुः आ ईषते ॥

ऋ. ८.६७.१

अर्थ :—आजपर्यंत माझी वासना यव, गाई, हिरण्य, तसेंच अश्व यांविषयीं असे ( क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र म्हणजे समाजविषयक असे ); आतां मात्र ( देवा ), केवळ तुझाच ध्यास घेऊन बसली आहे.

ब्राह्मण व क्षत्रिय हे कसे उत्पमानभूत होऊन बसले होते, हें खालील उद्गारांवरून दिसून येतें :

(१) अवस्यवे ब्रह्मणे. (२) उवथशासः ब्राह्मणा इव. २.३९.१
(३) सोमिनः ब्राह्मणासः ७.१०३.८
(४) अतिरात्रे सोम न ब्राह्मणासः ७.१०३.७
(५) ब्राह्मणासः पितरः सोम्यासः ६.७५.१०
(६) संवत्सरं शशयानाः व्रतचारिणा ब्राह्मणाः मंडूकाः । ७.१०३.१
(७) वसूयन् देवासः । ऋ. १.१२८.८
(८) भूदेव-अथर्ववेद.
   (१) आ राजानां ··· क्षत्रिया यातमर्वाक् । ७.६४.२
   (२) धृतव्रताः क्षत्रियाः··· क्षत्रमाशतुः ॥ ८.२५.८

## चातुर्वर्ण्यसंबंधानें आणखी कांहीं पाश्चात्यांचीं मतें

डॉ. एम्. हॅग म्हणतात :—

It has been of late asserted that the original parts of the Vedas do not know the system of caste. *But this conclusion was prematurely arrived at without sufficiently weighing the evidence.* It is true that the caste-system is not to be found in such a developed form; the duties enjoined to the several castes are not so clearly defined as in the Law Books and Puranas. But *nevertheless the system is already known in the earlier parts of the Vedas or rather presupposed.* The barriers only were not so insurmountable as in later times [इटालिक आमचें].

डॉ. हॅग यांच्या असल्या विधानासंबंधानें आम्ही इतकेंच म्हणतों कीं, स्मृत्यादि ग्रंथांतील नियम वेदांतून काढलेले म्हणजे अनुमानलेले आहेत. ते वेदांत आहेत अशी परंपरा आहेच. आज दिसतात ते वेद संपूर्ण नाहींत, हें जुने ग्रंथ सांगतातच; पण आजचे अभ्यासकहि सांगूं शकतात. त्यामुळें कदाचित् स्मृतींतून आढळणारे सर्व नियम वेदांतून आढळत

नसतील. तथापि त्या बाबतींत ज्या विशिष्ट पद्धतीनें सूक्तें अभ्यासिणें अवश्य आहे त्या पद्धतीनें तीं अभ्यासिलेलीं नाहींत. त्यामुळें निश्चित अनुमान काढणें चुकीचें होईल. चातुर्वर्ण्याची सुरुवात वेदपूर्व आहे असें निश्चित झाल्यावर–वेदांतील पूर्वकालांत चातुर्वर्ण्य गृहीत आहे ही गोष्ट मान्य केल्यावर–त्याच्या कर्तव्याकर्तव्यांचा तपशील ठरविण्याचें काम फार मागाहून होणें असंभवनीय आहे. चातुर्वर्ण्याचा भेद ठरवितांनाच हें काम अंशतः होत असतें. त्यांतील कटिकोरपणा हा थोडा फार मागाहून ठरणें शक्य आहे.

डॉ. हौग यांना पार्शी झेंद अवेस्तांतहि त्रैवर्ण्य आढळलें आहे. किंबहुना, पारशांचे त्रैवर्णिकावरूनच ते असें म्हणतात कीं, हिंदु ( सिंधु किंवा आर्यावर्ती म्हणणें अधिक उचित ) आर्य आणि इराणी आर्य यांच्यांत भेद होण्यापूर्वीच तें रूढ असलें पाहिजे. कारण :

*There is evidence* in the Zend Avesta of division of the followers of Ahura Mazda into the three classes of Atharvas, Rathesthas and Vastryafshuyanas *which corresponds exactly to the Brahmans, Kshatriyas and Vaishyas of India.* The Atharvas or priests in particular formed a caste; they had secrets which they were prohibited from divulging; they were the spiritual guides of their nation; and none but the son of a priest could become a priest—a rule which the Parsis still maintain. ( इटालिक शब्द आमचे). त्यांच्या वेदांत आमच्या शूद्रांशीं कांहींचा समावेश होतो ही गोष्ट हौगसाहेबांचे लक्षांत आली नसावी.

**चातुर्वर्ण्यकाल–वेदपूर्व**

From all we know, the *real origin of the caste appears to go back to a time anterior to the composition of the Vedic hymns,* though its development into a regular system with insurmountable barriers can be referred only to the *latest period of the Vedic times.* ( इटालिक आमचे ).

हा अखेरचा काल कोणता हा वादाचा विषय होऊं शकेल. तथापि त्यांचे निर्णय व आमचे निर्णय यांत साम्य आहे. डॉ. हॉग म्हणतात कीं, आर्य लोक दक्षिणेंत सरकण्यापूर्वी ही गोष्ट सरस्वतीतीरावर घडून आली.

मूर म्हणतो: The difference between him (Dr. Haug) and other European scholars is one of age and not of principle, *for either party admits any distinction of race or congenital diversity between the three superior castes or classes*. ( इटालिक आमचें ).

रॉथसाहेबांनीं चातुर्वर्ण्याच्या उत्पत्तीसंबंधानें केलेलीं विधानें आम्हांला मान्य होण्यासारखीं नाहींत. त्यांचीं विधानें युरोपियन इतिहासांतील अलीकडील घडामोडींवर आधारलेलीं आहेत; वैदिक प्रमाणांवर आधारलेलीं दिसत नाहींत. तथापि त्यांच्या खालील विधानांतील सत्यता आम्हांस मान्य आहे. ते म्हणतात:

अधरोत्तरता

The position which the three superior classes occupied in the developed Brahmanical system *was one of gradation* as they differed only in the extent of their religious and civil prerogatives, the क्षत्रिय being in some respects less favoured than the ब्राह्मण and the वैश्य than the क्षत्रिय. With शूद्रs, on the other hand, the case was quite different. They were not admitted to sacrifice,[1] to the study of the Vedas, to investiture with the sacred cord. Thus the three higher castes stood in a closer relation to each other whether of descent or culture than any of them did to the fourth. The Indian body politic, morever, was complete without शूद्रs......Out of this community of the विशांs—the possession of the pure Aryan worship and culture, in contradistinction to all barbaric

---

१ यज्ञीय कोणत्याहि प्रकारें नव्हता हें म्हणणें खरें नाहीं. आत्रेय प्रकार तर तिघांसहि यज्ञांत समाविष्ट केले. मग शूद्र कसा चुकेल ?

races–the priesthood arose while क्षत्रियास *were the nobility descended in the main from the kings of the earlier ages.* The fourth caste–the शूद्र–consisted of a race subdued by the Brahmanical conquerors (? in what sense, political or moral and religious ?) whether that race may have been a *branch of the Arian stock which immigrated at an earlier* period into India or an autochthonous Indian race. (कंसांतील मजकूर व इटालिक आमचें).

रॉथसाहेबांचा व आमचा मतभेद कोठें आहे हें वाचकांना सहज उमजण्यासारखें आहे, सबब त्याचा येथें विस्तार करीत नाहीं. ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य हे एकाच वंशाचे–किंबहुना शूद्र देखील–येवढी गोष्ट वाचकांचे लक्षांत येईलच. शूद्र हे मूळ अनरस की तेहि बाहेरून आलेले असतील, याविषयीं रॉथसाहेबांना शंका आहे. आम्हांला वाटतें, सर्वच येथले–अनरस–असूं शकतील. आर्यांनीं हिंदुस्थानांत बाहेरून येऊन राजकीय स्थित्यंतर केलें ही गोष्ट आम्हांस मान्य नाहीं. शूद्र, दास वगैरे आणि आर्य सुद्धां उत्तर *हिंदुस्थानांतील* भूमि समुद्रांतून वर येऊन तयार होत असतांना आले असले तर तें अशक्य नाहीं. मूळची चतुःसीमापरिवेष्टित भूमि लहान असावी.

## या विभागांत उल्लेखिलेल्या ऋचा व त्यांचा सारांश

[ १ ] नृचक्षा रक्षः परिपश्य विक्षु तस्य त्रीणि प्रतिशृणीहि अग्रा
तस्य पृष्ठीः हरसा शृणीहि त्रेधा मूलं यातुधानस्य वृश्च ॥ १०.८७

( १ ) विशांमध्यें राक्षस वर्ग (समंग) एक (आर्य व राक्षस); (२) राक्षस व यातुधान यांचीं तीन मूलें व तीन अग्रें; ( ३ ) त्यांची पृष्ठभागांत.

[ २ ] शतं दासे बल्बूथे *विप्रः* तरुक्ष आददे ॥
ते ते वायो इमे जनाः मदंति इंद्रगोपा मदंति देवगोपा मदंति ॥
८.४६.३२

दास प्रवर्ग धनं ॥ ऋ. १.९२ ८

दैवो वै वर्णो ब्राह्मणः असुर्यो शूद्रः ॥
असतो वै एष संभूतः यच्छूद्रः ॥

(१) विप्रांकडे दास असत; (२) राजांकडे असून त्यांवर अधिकारी असे; (३) ' अर्पाचीने मदंति ' असे दास ' इंद्रगोपा मदंति '; (४) इमे जनाः=दासाः=शूद्राः; (५) ब्राह्मण दैव, शूद्र असुर्य, (१) ब्राह्मण (४) शूद्र.

[३] ब्रह्म जिन्वतं उत जिन्वतं धियः हतं रक्षांसि सेधतं अमीवाः ॥
क्षत्रं जिन्वतं उत जिन्वतं नृन् ,, ,, ,,
धेनू जिन्वतं उत जिन्वतः विशः,, ,, ,,
क्षिर्यंच

(१) विश हे धेनुपालक, क्षत्र वीर व पराक्रमी ब्राह्मण हे धीप्रधान. –विंपांचे तीन धंदे; (२) ब्राह्मण, क्षत्रिय व विश यांचा एकत्र व निःसंदेह उल्लेख आणि अनुक्रम; (३) त्यांचे शत्रु राक्षस व रोग, (४) ब्राह्मणांचें क्षत्रियांचें व विशांचें भिन्न भिन्न प्रतीक–धी, नृ, धेनु.

[४] असुर आणि देव, आर्य आणि दास —
इडानु मानवी यज्ञानुकाशिनी आसीत् ।
सा अशृणोत् असुरा अग्निं आदधाते इति ।
सा अब्रवीत् इडा मनुं तथा वै अहं तव अग्निं आधास्यामि
यथा प्र प्रजया पशुभिः मिथुनैः जनिष्यसे ।
अस्मिँल्लोके स्थास्यसि अभि सुवर्गं लोकं जेष्यसि इति ॥ तै. ब्रा.

(१) अन्यव्रतं अमानुषं अयज्वानं अदेवं ॥ ऋ. ८.६०.११.
(२) असुर नामयज्ञ करीत. भ. गी. १६.
(३) अनेन प्रसविष्यध्वम् एष वोऽस्तु इष्टकामधुक् । गीता ३...
(४) सर्वेण वै यज्ञेन देवा सुवर्गं लोकं आयन् ॥ तै. सं.
(५) देवेद्ध इति आह । देवाहि एतं ऐंधत ।
मन्विद्ध इति आह । मनुः एतं उत्तरो देवेभ्यः ऐंध ॥
(६) पाकयज्ञेन मनुः अश्राम्यत । सा इडा मनुं उपावर्तत ।
तां देवासुराः व्यह्वयंत । प्रतीची देवाः,पराची असुराः ।
सा देवान् उपावर्तत ॥

( १ ) असुर व देव दोघेहि यज्ञ करीत. यज्ञ एका दृष्टीनें समान धर्म, 'एवढेंच नव्हे तर आधान असुरांपासूनच आर्यांनीं म्हणजे मनूनें घेतलें. गीता–अ. नामयज्ञ करीत. ( २ )…अयज्ञिय, अव्रत=अन्ययज्ञिय, अन्यव्रती, अमानुष; ( ३ ) मनूची इच्छा; आर्यांची. [ अ ] प्र प्रजया पशुभिः मिथुनैः जनिष्यते, [ ब ] अस्मिँल्लोके स्यास्यथि, असुरांचा [ क ] सुवर्ग लोकं जेष्यथ । देवांचा मार्ग. ( १ ) इष्टकामधुक्, प्रजा; ( ४ ) यज्ञाचे बाबतींत मनूनें अनुकरण केलें; ( ५ ) इळेला देवांनीं व असुरांनीं बोलावलें असतां ती देवांकडे गेली. देवांनीं पुढून व असुरांनीं मागून बोलावलें. देवांचा व असुरांचा मार्ग भिन्न. देव माध्याह्नीं व मध्यरात्रीं, तर असुर सकाळ, सायंकाळीं आधान करीत. मानव सकाळ, दुपार व सायंकाळीं करीत.

[ ५ ] ब्राह्मणोऽस्यमुखमासीत बाहू राजन्यः कृतः ॥
ऊरु तदस्य यद्वैश्यः पद्भ्यां शूद्रो अजायत ॥ ऋ. १०.९०.१२

( १ ) चार वर्णांचें परस्परावलंबित्व, आनुक्रमिकत्व; ( २ ) एकाच समाजाचें विभजन, संघटन नव्हे ( राजवाडे व चापेकर यांस उत्तर ); ३ ) ब्राह्मण वरिष्ठ व शूद्र कनिष्ठ ठरला; ( ४ ) त्रैवर्णिकांचा अनुक्रम; ( ५ ) चातुर्वर्ण्याचा अनुक्रम.

[ ६ ] क्षत्राय त्वं श्रवसे त्वं महीयै इष्टये त्वम् अर्थमिव त्वं इत्यै ॥
विसदृशा जीविताभिप्रचक्ष उषा अजीगर्भुवनानि विश्वा ॥
ऋ १.११३.६

ब्रह्मा सुन्वतो इच्छति । ऋ. ९.११२.१

( १ ) क्षत्रिय व शूद्र, ब्राह्मण व वैश्य या चौघांचे व्यवसाय भिन्न ( जीवित ); ( २ ) क्षत्र, श्रवस्, मही इष्टि, अर्थ.

[ ७ ] युयुंजाथे वृषण अश्विना रथं घृतेन नो मधुना क्षत्रमुक्षतम् ॥
अस्माकं ब्रह्म पृतनासु जिन्वतं, वयं धना शूरसाता भजेमहि ॥
ऋ. १.१५७.२

( १ ) क्षत्र, ब्रह्म व धन–तीन वर्णांचा प्रतिकानें उल्लेख; ( २ ) पर-

स्परांतील आत्मीयत्व; ( ३ ) युद्धाचा अलंकार; ( ४ ) चवथ्यांशी आप्तिमत्व नाहीं; ( ५ ) क्ष.

[ ८ ] देवानां यः पितरं आविवासति श्रद्धामना हविषा ब्रह्मणस्पतिम् ॥
स इज्जनेन, स विशा स जन्मना स पुत्रैर्वाजैर्भरते नृभिः ॥
ऋ. २.२६.३

( १ ) जन=शूद्र; ( २ ) विशा=विश; ( ३ ) जन्मन्=ब्राह्मण; ( ४ ) नृपुत्र=राजन्य=क्षत्रिय. चार वर्ण, अनुक्रमांत थोडा फरक. ब्राह्मणाचें जन्मश्रेष्ठत्व किंवा निदान वैशिष्ट्य.

[ ९ ] सुजनिमानः न । ऋ. ७.६२.४

जन्मजाति-( १ ) जन्मना; ( २ ) सु किंवा शुभ जन्म आणि अशुभ जन्म असा भेद.··· पुण्ययोनि, पापयोनि; ( ३ ) शुभ्रं जन्म न सर्जं कृण्वानः ॥

[ १० ] स इत्क्षेति सुधित ओकसि स्वे तस्मा इळा पिन्वते विश्वदानीम् ॥
तस्मै विशः स्वयमेव नमंते यस्मिन् ब्रह्मा राजनि पूर्व एति ॥
अप्रतीतो जयति सं धनानि प्रतिजन्या उत या सजन्या ॥
अवस्यवे वरियः कृणोति ब्रह्मणे राजा तमवंति देवा ॥
ऋ. ४.५० ८,९

( १ ) त्रैवर्णिकांचा उल्लेख;( २ ) अनुक्रम-ब्राह्मण, क्षत्रिय (राजन्य), वैश्य; ( २ ) सजन्य-राजन्य व वैश्य, प्रतिजन्य असुर, राक्षस, शत्रु; ( ३ ) अवस्यु=ब्राह्मण-रक्षणेच्छु, ( २ ) अन्नाचीहि इच्छा न करणार ! ( ३ ) निर्लोभी, ( ४ ) अहृद (!) सर्वेभ्यो जनेभ्यो पुरो एति-अग्रमानार्हः भवति।

[ ११ ] तिस्रः प्रजाः ज्योतिरग्राः ॥ ऋ. ७.३३.७

ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य-( १ ) अग्निप्रमुख; ( २ ) ज्ञानाधिकारी; ( ३ ) ब्राह्मणप्रमुख.

[ १२ ] यदिद्राग्नी मदथः स्वे दुरोणे, यद्ब्रह्मणि राजनि वा यजत्रा
ऋ. १.१०८ ८

( १ ) ब्राह्मण; ( २ ) राजन्-क्षत्रिय.

[ १३ ] नेह भद्रं रक्षस्विने, नावयै, नोपयै उत ॥

( १ ) असुर व देव दोघेहि यज्ञ करीत. यज्ञ एका दृष्टीने समान धर्म, एवढेच नव्हे तर आधान असुरांपासूनच आर्यांनी म्हणजे मनूने घेतले. गीता–अ. नामयज्ञ करीत. ( २ )···अयज्ञिय, अनन्=अन्ययज्ञिय, अन्यव्रती, अमानुष; ( ३ ) मनूची इच्छा; आर्यांची. [ अ ] प्र प्रजया पशुभिः मिथुनैः जनिष्यसे, [ ब ] अस्मिँल्लोके स्थास्यसि, असुरांचा [ क ] सुवर्गं लोकं जेष्यसि । देवांचा मार्ग. ( १ ) इष्टकामधुक् , प्रजा; ( ४ ) यज्ञाचे बाबतीत मनूने अनुकरण केले; ( ५ ) इडेला देवांनी व असुरांनी बोलावले असतां ती देवांकडे गेली. देवांनी पुढून व असुरांनी मागून बोलावले. देवांचा व असुरांचा मार्ग भिन्न. देव माध्याह्नीं व मध्यरात्रीं, तर असुर सकाळ, सायंकाळीं आधान करीत. मानव सकाळ, दुपार व सायंकाळीं करीत.

[ ५ ] ब्राह्मणोऽस्यमुखमासीत बाहू राजन्यः कृतः ॥
ऊरु तदस्य यद्वैश्यः पद्भ्यां शूद्रो अजायत ॥ ऋ. १०.९०.१२

( १ ) चार वर्णांचे परस्परावलंबित्व, आनुक्रमिकत्व; ( २ ) एकाच समाजाचें विभजन, संघटन नव्हे ( राजवाडे व चापेकर यांस उत्तर ); ( ३ ) ब्राह्मण वरिष्ठ व शूद्र कनिष्ठ ठरला; ( ४ ) त्रैवर्णिकांचा अनुक्रम; ( ५ ) चातुर्वर्ण्याचा अनुक्रम.

[ ६ ] क्षत्राय त्वं श्रवसे त्वं महीया इष्टये त्वम् अर्थमिव त्वं इत्यै ॥
विसदृशा जीविताभिप्रचक्ष उषा अजीगर्भुवनानि विश्वा ॥
ऋ १.११३.६

ब्रह्म सुन्वतो इच्छति । ऋ. १.११२.१

( १ ) क्षत्रिय व शूद्र, ब्राह्मण व वैश्य या चौघांचे व्यवसाय भिन्न ( जीवित ); ( २ ) क्षत्र, श्रवस्, महा इष्टि, अर्थ.

[ ७ ] युवं श्रिये वृषणा अश्विना रथं घृतेन नो मधुना क्षत्रमुक्षतम् ॥
अस्माकं ब्रह्म पृतनासु जिन्वतं, वयं धना शूरसाता भजेमहि ॥
ऋ. १.१५७.२

( १ ) क्षत्र, ब्रह्म व धन–तीन वर्णांचा प्रतिकांनी उल्लेख; ( २ ) पर-

चातुर्वर्ण्य बनण्यापूर्वी येथेंहि प्रथम चातुर्वर्ण्य असलेंच पाहिजे; किंबहुना, चातुर्वर्ण्य बनविल्यावरहि कांहीं दिवस परस्परसमावेश (उ. अनुलोमविवाहानें) होऊं शकेल. प्रथम अनुलोमविवाहावरून–विवाहाच्या संततीवरून–ती गुणहीन वाटूं लागल्यावरून–फरक पडला, नंतर त्यास पितृसवर्ण ठरविणें किंवा मातृसवर्ण ठरवावयाचें हा वाद उत्पन्न झाला (मनु) व अखेर त्यास मातृसवर्ण ठरवून टाकलें. त्या वेळीं चातुर्वर्ण्याला आजचें जातिस्वरूप आलें. पण हें सर्व दीर्घतमस्काळीं म्ह. वेदपूर्वकाळीं घडलें.



गवे च भद्रं धेनवे वीराय च श्रवस्यते ॥
अनेहसा च ऊतयः सुऊतयः व ऊतय ॥ ऋ. ८.४७.१२

( १ ) रक्षस्–अवय, उपय असे दोन प्रकार– (अ) आपल्यांतले राक्षस=शूद्र, किंवा राक्षसांचे पुत्री; ( ब ) बाहेरचे राक्षस=शत्रु; (क) गवे धेनवे–वैश्य. ( २ ) वीर=क्षत्रिय; ( ३ ) श्रवस्यत्. यशेच्छु ब्राह्मण.

यांतील शुभ व अशुभ जन्मांचा संबंध पुण्ययोनी व पापयोनींकडे लागतो व त्यांतील पुण्ययोनींत ( १ ) जन्मना श्रेष्ठत्व किंवा जन्माचा विशेष अभिमान ब्राह्मणाला होता; ( २ ) ब्राह्मणाला देव म्हणतो; ( ३ ) ब्राह्मण सर्वांपुढें चाले; ( ४ ) ब्राह्मण अवस्यु=रक्षणार्ह; (अ) निर्लोभी, (ब) अद्रुह=जितशत्रु असा; (५) ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र यांची आनुक्रमिक श्रेष्ठता, तथापि परस्परावलंबित्व; ( ६ ) त्रैवर्ण्य प्रथम, ( ७ ) मागून चातुर्वर्ण्य-इतक्या गोष्टी दिसून आल्या.

यानंतर ( १ ) ब्राह्मणांत ( अ ) उच्च देव- भूदेव, संवत्सरभर व्रता-चरण करणारा, सोमनी; ( ब ) अवर–केवळ पाठ म्हणणारा, ( क ) विणण्याचा वगैरे व्यवसाय करणारा; ( २ ) ब्रह्मबंधु, ( ३ ) ब्रह्मपुत्र असे प्रकार; ( ४ ) बेडकांप्रमाणें ओरडणारे, असे ब्राह्मणांत फरक आढळतात.

( २ ) मिथुना धारयंतं क्षत्रियम् राजन्यबंधु– ( १ ) खरे व खोटे क्षत्रिय.

( ३ ) मिश्रजाति–विश किंवा वणिक, वृषल, कितव इ. इ.

असे प्रकार आढळतात. यावरून ( १ ) गुणकर्मांनें कनिष्ठ वर्णांत उतरत नसत. ( २ ) मिश्रजाति–खालीं उतरे–अनुलोमविवाह देखील. ( ३ ) गुणकर्मांनें वरिष्ठ वर्णांत चढण्याचा दाखला ऋग्वेदांत नाहीं. ( ४ ) मिश्र जातींचे अनेक उल्लेख यजुर्वेदांत–गुणकर्मांनें वर्ण असतील तर–हें शक्य नाहीं.

( १ ) जन्मजात जाति होती.

( २ ) केवळ आनुवंशिक धंदे होते याला प्रमाण !–तसें असेल तर (१) मिश्रजातीची कल्पना अशक्य. (२) आनुवंशिक धंदे असले तरी परस्पर-प्रवेश असे याचे दाखले सांपडले पाहिजेत व ते क्वचित् अपवादादाखल नसावे. आणि जे सांपडतील ते चातुर्वर्ण्यकालींतील उपयोगी नाहीं. कारण,

अर्थात् चार भिन्न समाज जोडले किंवा एकत्र केले गेले अशी त्यांची समजूत नाही. [ २ ] तो शारीरिक रंगामुळे निर्मिला किंवा जोडला गेला नाही. या शब्दांवरून 'गुण' शब्दाचे महत्त्व मुळीच नाही, असेहि दिसून येते आणि तीच गोष्ट खाली दिलेल्या दोन चरणांचा एकत्र विचार करील त्यास दिसून आल्याशिवाय राहणार नाही. गुणकर्मविभागशः हा समास 'गुणविभागशः आणि कर्मविभागशः' असा सोडविण्यापेक्षा तो गुणांमुळे उत्पन्न होणारी जी कर्मे त्यांनी विभागलेले असा आणि 'गुणविभागशः आणि कर्मविभागशः' असा समास सोडविला तरी अर्थ तोच. गुण आणि कर्मे यांनी चातुर्वर्ण्य किंवा चार वर्ण विभागले, प्रत्येक व्यक्ति विभागली किंवा विभागीत असा अर्थ नव्हे. 'चत्वारः वर्णाः एव चातुर्वर्ण्यम्' म्हणजे चार वर्ण हेच चातुर्वर्ण्य असा हा समास सोडविला जातो हे लक्षात ठेवले पाहिजे. चार वर्णांचे कर्म किंवा त्यांचा धर्म असा अर्थ विवक्षित नाही. चातुर्वर्ण्य यांत 'अ' हा प्रत्यय असून तो स्वार्थी आहे. याचा अर्थ असा की, वर्ण चार; पांच नव्हत. असे सांगण्याचे कारण असे की, चार वर्ण की पाच वर्ण असा वाद होऊन वर्ण चारच, पांच नव्हत असा निर्णय फार प्राचीन काळी झाला तो गीताकारांस मान्य होता. मनुस्मृतींत असेच सांगितले आहे.

४. वर्णभेद रंगावरून पडले नाहीत यासंबंधाने वे. इ.कार असे म्हणतात की, वर्ण ( colour ) in the ऋग्वेद is applied to denote classes of men, the दास and the आर्यन् वर्ण being contrasted on account of colour. Thero is no trace in Vedic litorature of any real distinction save this main one. म्हणजे आर्यवर्ण व दासवर्ण हेच तेवढे रंगावरून झालेले भेद. याच बाबतींत आर्य आणि दास यांच्या वर्णांत तुलना व वैषम्य दिसते. परतु ही वे. इ.कारांची चूक आहे असे पूर्वी केलेल्या विवेचनावरून कोणासहि समजून येण्यासारखे आहे. आर्य व दास यांत वर्णभेद म्ह. रंगभेद नसून ध्येयभेद होता किंवा धर्मसंस्थानाभेद होता. यावरून वर्ण शब्द मानवाला लावतांना त्याची निरुक्ति वर्ण=रंग या शब्दावरून करावयाची नसून वृ=निवड करणे या धातूवरून करावयाची आहे. ज्या कृष्ण शब्दावरून रंग असा अर्थ वाटतो

# त्रैवर्ण्य व चातुर्वर्ण्याचा पाया

## कर्मभेद वर्णसंकरण नव्हे

१. त्रैवर्ण्य आणि चातुर्वर्ण्य यांचे अस्तित्वाचा ऋग्वेदिक पुरावा मागील विभागांत दिला. यापेक्षां आणखी अनेक प्रमाणें देतां येण्यासारखीं आहेत; आणि ऋग्वेदांतून तशींच इतर वेदांतूनहि देतां देण्यासारखीं आहेत. तथापि तसें करणें हें निबंधाच्या मर्यादेच्या फार बाहेर जाईल म्हणून तूर्त तें आंखडतें घेऊन दुसऱ्या महत्त्वाच्या मुद्याकडे वळणें इष्ट आहे. इतर देशांत जसें श्रमविभागाचे तत्त्वावर चातुर्वर्ण्य उत्पन्न होतें तसेंच वैदिक चातुर्वर्ण्य होतें कीं मूळपासूनच हिंदु चातुर्वर्ण्याचें वळण निराळें होतें हा प्रश्न अधिक महत्त्वाचा असून तें मूळपासून निराळ्या वळणावर होतें, ही गोष्ट मागील विभागांत दिग्दर्शित केली आहेच. त्यास आणखी प्रमाणें देण्याचें या विभागांत योजिलें आहे.

२. कर्मक्रिया-विभेदेन चातुर्वर्ण्यं प्रतिष्ठितम् ॥ म. भारत वनपर्व. अ. १८०

चातुर्वर्ण्यं मया सृष्टं गुणकर्मविभागशः ॥ भ. गीता अ. ४.१३

कर्माणि प्रविभक्तानि स्वभावप्रभवैर्गुणैः ॥ भ. गीता १८.४१

चातुर्वर्ण्याची उत्पत्ति कशी झाली याविषयीं वरील महाभारतीय वाक्यांत उलगडा केला आहे. मूळचें चातुर्वर्ण्य कोणत्या पुरुषापासून झालें हें दर्शविण्याचा संकल्प करून त्यासंबंधानें अनेक श्रुतिस्मृति इतिहास-पुराणांतील विविध कथानकें उद्धरून त्यांतील परस्परविरोध दाखविण्याचा अट्टाहास केला आहे, त्यापेक्षा तें कोणत्या सामाजिक तत्त्वावर झालें याचा उलगडा करण्याचा प्रयत्न केला असता तर तें अधिक श्रेयस्कर झालें असतें असें आम्हांस वाटतें.

३. चातुर्वर्ण्य 'कर्मक्रियाविभेदानें' उत्पन्न झालें असें वरील तीनहि श्लोकांत सांगितलें आहे. यांत दोन गोष्टी भारतकारांनीं सांगितल्या [१] समाज विभागला गेला, व [२] तो कर्मक्रियांमुळें विभागला गेला.

अर्थात् चार भिन्न समाज जोडले किंवा एकत्र केले गेले अशी त्यांची समजूत नाहीं. [ ३ ] ते शारीरिक रंगामुळें विभागले किंवा जोडले गेला नाहीं. या शब्दांवरून 'गुण' शब्दाचें महत्त्व दिसतेंच नाहीं, असेंहि दिसून येतें आणि तीच गोष्ट खालीं दिलेल्या दोन चरणांचा एकत्र विचार करील त्यास दिसून आल्याशिवाय राहणार नाहीं. गुणकर्मविभागशः हा समास 'गुणविभागशः आणि कर्मविभागशः' असा सोडविण्यापेक्षा ते गुणांमुळें उत्पन्न होणारीं जीं कर्में त्यांनीं विभागलेले असा; आणि 'गुणविभागशः आणि कर्मविभागशः' असा समास सोडविला तरी अर्थ तोच. गुण आणि कर्में यांनीं चातुर्वर्ण्य किंवा चार वर्ण विभागले, प्रत्येक व्यक्ति विभागली किंवा विभागीत असा अर्थ नव्हे. 'चत्वारः वर्णाः एव चातुर्वर्ण्यम्' म्हणजे चार वर्ण हेंच चातुर्वर्ण्य असा हा समास सोडविला जातो हें लक्षांत ठेवलें पाहिजे. चार वर्णांचें कर्म किंवा त्यांचा धर्म असा अर्थ विवक्षित नाहीं. चातुर्वर्ण्य यांत 'अ' हा प्रत्यय असून तो स्वार्थी आहे. याचा अर्थ असा कीं, वर्ण चार; पांच नव्हत. असें सांगण्याचें कारण असें कीं, चार वर्ण कीं पांच वर्ण असा वाद होऊन वर्ण चारच, पांच नव्हत असा निर्णय फार प्राचीन काळीं झाला तो गीताकारास मान्य होता. मनुस्मृतींत असेंच सांगितलें आहे.

४. वर्णभेद रंगावरून पडले नाहींत याचेंबद्दल वे. इ.कार असें म्हणतात कीं, वर्ण ( colour ) in the ऋग्वेद is applied to denote classes of men, the दास and the आर्यन् वर्ण being contrasted on account of colour. There is no trace in Vedic literature of any real distinction save this main one. म्हणजे आर्यवर्ण व दासवर्ण हेच तेवढे रंगावरून झालेले भेद. याच बाबतींत आर्य आणि दास यांच्या वर्णांत तुलना व वैषम्य दिसतें. परंतु ही वे. इ.कारांची चूक आहे असें पूर्वी केलेल्या विवेचनावरून कोणासहि समजून येण्यासारखें आहे. आर्य व दास यांत वर्णभेद म्ह. रंगभेद नसून ध्येयभेद होता किंवा धर्मकल्पनाभेद होता. यावरून वर्ण शब्द मानवांना लावतांना त्यांची निरुक्ति वर्ण=रंग या शब्दावरून करावयाची नसून वृ=निवड करणें या धातूवरून करावयाची आहे. *ज्या कृष्ण शब्दावरून रंग असा अर्थ वाटतो*

तोच शब्द अलंकारिक अर्थानें योजलेला आहे. अर्थात्, ही कल्पना टाकून दिली म्हणजे चातुर्वर्ण्याचे बाबतींत वर्ण=रंग हें निरुक्त टिकत नाहीं असें वे. इ.कार कबूल करतातच. वर्ण शब्दाचा रंग असा अर्थ असेल अशी शंका घेऊन पाहावें तर त्या बाबतींत वैदिक वचनांत एकवाक्यता असावयास पाहिजे होती. परंतु ती वरील आढळून येत नाहीं' "गोपथ ब्राह्मणांत ब्राह्मणाचा रंग शुक्ल म्हटला आहे तर काठक संहितेंत वैश्याचा तो रंग वर्णिला आहे आणि राजन्याचा धूम्र दिला आहे, आणि पुढें (भारतांत वगैरे) ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र यांचे शुक्ल, रक्त, पीत व कृष्ण असे रंग दिल्याचें दिसून येतें." परंतु या बाबतींत भारतकारांनींच हे रंग शरिराचे नव्हेत असा तो प्रश्न उपस्थित करून निर्णय दिला आहे. तो सर्वथा ग्राह्य दिसतो.

५. 'चत्वारो वर्णाः' असे शब्द शतपथब्राह्मणांत आले आहेत. त्यांतच शूद्र वर्ण असा उल्लेख आहे. आर्य वर्ण आणि शूद्र वर्ण यांत काठकसंहितेंत व पंचविंशब्राह्मणांत व तैत्तिरीय ब्राह्मणांत भेद दाखविला आहे. ऐतरेय ब्राह्मण आणि बृहदारण्यकोपनिषदांत चार वर्णांचे उल्लेख आहेत [वे. इ.].

६. शूद्र वर्ण आणि आर्य वर्ण यांची तुलना वरील ग्रंथांत केलेली असली तरी शूद्र आणि आर्य यांची तुलना अथर्ववेद, वाजसनेयी, तैत्तिरीय आणि काठकसंहिता यांतून आढळतेच. शूद्र वर्णाचा (रंगाचा) आणि आर्य रंगाचा भेद काठकसंहिता व पंचविंश, तैत्तिरीय, ऐतरेय व शतपथ ब्राह्मणें, बृहदारण्यकोपनिषद्, तसेंच भारतांत दर्शविला आहे असें वे.इ.कार म्हणतात. परंतु त्या शब्दांचा आलंकारिक अर्थ असल्यामुळें त्या उल्लेखांचें महत्त्व नाहीं. 'शूद्राचे आचार भिन्न आहेत' या म्हणण्यांत आश्चर्य तें काय? ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य यांचेहि आचार भिन्न आहेत; एवढेंच नव्हे तर ब्राह्मणाब्राह्मणांतहि ते आज भिन्न आहेत आणि पूर्वी नसतील अशी काय खात्री आहे? आचार हे विचारबोधक आणि तदनुसार असतात.

७. 'शूद्रार्यौ' या शब्दावरून त्रैवर्णिक आणि शूद्र हे भिन्न दिसून येतात. याचा अर्थ असा कीं, त्रैवर्णिक हे बराच काल एकत्र असतांना शूद्रांचा समावेश या समाजांत झाला नव्हता; मागाहून झाला व चातुर्वर्ण्यघटित समाज बनला. दोघांत उच्चनीचपणा होता. शूद्र हा असुरांतून आला असें म्हणतात,

याचा अर्थच असा की, त्रैवर्णिकांचा समाज असुरांतून निघाल्याची कल्पना सामान्य लोकांतून रुजत चालली होती अशा वेळीं त्याचा समावेश आर्यांनीं चातुर्वर्ण्यांत केला. आर्य या शब्दानें केव्हां केव्हां केवळ विशांचा म्ह. वैश्यांचा बोध होतो. यावरून असें अनुमान निघतें कीं, असुर या शब्दाप्रमाणेंच मूळ विश हाच सर्वसमाजवाचक शब्द. त्यांतून ब्राह्मण व क्षत्रिय वेगळे करण्यांत किंवा निवडण्यांत आले म्हणजे असुरांतून प्रथम देव व पितर बाहेर पडले व नंतर 'विश' बाहेर पडले व नंतर विशाचे त्रैवर्णिक झाले. विभजनाची क्रिया विचारांच्या आंदोलनक्रियेनें एकदां सुरू झाली म्हणजे ती तर्कशास्त्रानुसार अखेर गांठणारच. त्यांतून मूळ विभजनाची क्रिया ज्या निवृत्तिकारक विचारामुळें सुरू झाली तो निवृत्तिपर विचार सदोदित सारखा राहूं शकत नाहीं. त्यांत दोन उलट सुलट क्रिया सुरू होतात. म्हणजे कांहीं लोक अधिकाधिक निवृत्त होतात, तर कांहींना निवृत्ति झेपत नाहीं आणि ते प्रवृत्तिपर बनतात. मनुस्मृतींत असें म्हटलें आहे कीं, वैश्य हे (१) ब्राह्मण अदर्शनानें, (२) क्रियालोपानें, व (३) अनवधानानें शूद्रवत् बनत चालले आहेत. हीच गोष्ट ब्राह्मणांत व क्षत्रियांतहि दिसून येते. खुद्द ब्राह्मणाब्राह्मणांतहि अधरोत्तरता दिसू लागली.

८. प्रथमतः ब्राह्मण आपल्यास जन्मानें श्रेष्ठ म्हणवी कीं विद्वत्तेनें श्रेष्ठ म्हणवी हें पाहूं. अविप्रो वा यत् अविधत् विप्रो वा इंद्र ते वचः॥ ८.५०.९. म्हणजे विप्र आणि अविप्र असे इंद्राची स्तुति करतात असें म्हटलें आहे. विप्र शब्दाचा यौगिकार्थ म्हणजे 'स्तुति करणारा' असा अर्थ येथें घेऊन कसें चालेल? अविप्रः वचः अविधत् याचा अर्थ अज्ञानी किंवा मूर्ख तुझी स्तुति करतो असा करणें म्हणजे 'वदतो व्याघात' नव्हे काय? येथें विप्र शब्द गुणजात जातिवाचक किंवा केवळ वृत्तिदर्शक घेऊन चालणार नाहीं. गुण नसतांना गुण आहे अशी स्वतःची फसवणूक करणें सोपें आहे, पण दुसरा त्यास गुणवान् कसा समजेल? वृत्ति म्हटली कीं त्यांत आजच्यासारखेच जाणते व अजाणते (Quacks) असू शकतील; पण अशी स्थिति वैदिक काळीं आली होती, असें समजावयाचें किंवा जाति-ब्राह्मण किंवा ब्रह्मबंधु उत्पन्न झाले होते, असें म्हणावयाचें येवढा प्रश्न

आहे. श्रमविभागाचे तत्वावर किंवा गुणतः वर्ग बनवात त्या वेळीं असें क्वचित् व्हावें, पण ब्राह्मण जन्मजात असेल तर ही गोष्ट अशी जाति उत्पन्न होऊन बराच काल झाला असेल तर होणें अशक्य नाहीं. 'वृत्ति किंवा जन्म' असा हा प्रश्न येथें उत्पन्न होतो. पुष्कळ विद्वानांचें मत असें आहे कीं, जन्मजात जाति इतक्या पूर्वकाळीं उत्पन्न झाल्या नव्हत्या. त्याचा निर्णय करण्यास आपली प्रमाणें सांपडतात कीं काय पाहूं.

यावन्मात्रं उषसो न प्रतीकं सुपर्ण्योवसते मातरिश्वः ।
तावद्धाति उप यज्ञमायन् ब्राह्मणो
अवरः ब्राह्मणः होतुरवरो निषीदन् ॥ ऋ. १०.८८.१९.

अर्थः— हे वायो, जों रात्रीं उषेचा प्रकाश झांकून आहे, तोंच होत्या ब्राह्मणांपैकीं (अगदीं) निकृष्टहि येऊन स्तुति करूं लागतो (चित्राव).

अर्थात् ब्राह्मणांत उत्कृष्ट आणि निकृष्ट असे दोन वा अनेक प्रकार उत्पन्न झाले होते हें उघड आहे.

(१) संवत्सरं शशयानाः व्रतचारिणः ब्राह्मणा (इव) मण्डूकाः पर्जन्यजीन्वितां वाचं प्र अवादिषुः ॥ ऋ. ७.१०३.१.

(२) अतिरात्रे सोमे न ब्राह्मणासः...वदन्तः मण्डूकाः ॥ ७.१०३.७

(३) परिवत्सरीणं ब्रह्म कृण्वंतः सोमिनः ब्राह्मणासः वाचं अक्रत ॥ अध्वर्यवः गुह्याः न आविः भवति ॥ ७.१०३.८.

या प्रत्येक ऋचेंत ब्राह्मणाची मण्डूकांशीं तुलना करून त्यांच्या वृत्तिविषयक आचाराचा सडकून उपहास केल्यासारखा दिसतो. अर्थात्, त्यांत *मूळ श्रेष्ठता उत्पन्न होऊन ते प्रथम उपमान झाले आणि नंतर त्यांजवर हा* उपहासाचा प्रसंग आला होता असें म्हणावें लागतें. ब्राह्मण देवासमान मानल्याचीं उदाहरणें ऋग्वेदात आहेत. अत्युच्च आचारशील अशींहि वर्णनें आढळतात आणि वरच्यासारखींहि आढळतात. यावरून ब्राह्मणांची उत्पत्ति, त्याची श्रेष्ठता आणि त्याची कनिष्ठता सर्वच वैदिक कालाच्या आरंभींच झाल्या होत्या यांत शंका उरत नाहीं.

[ १ ] चत्वारि वाक्परिमिता पदानि तानि विदुः ब्राह्मणाः ये मनीषिणः ॥ ऋ. १.१६४.४५.

सद्विप्र, मनीषि, अप्रज्ञ ब्राह्मण : विणकर व शेतकरी

[ २ ] एकं सद्विप्रा बहुधा वदंति अग्निं यमं मातरिश्वानमाहुः ॥ किंवा ४६.

[ ३ ] इमे ये न अर्वाङ् न परः चरंति न ब्राह्मणासः न सुतेकरासः ॥ त एते वाचमभिपद्य पापया सिरीः तन्त्रं तन्वते अप्रजज्ञयः ऋ. १०.७१.९.

अर्थ :— वाणीचे चार प्रकार आहेत. ते [सर्व] जे मनीषी ब्राह्मण आहेत तेच जाणतात. [२] सद्विप्र आहेत ते एकालाच अनेक भावांनी [ नावांनी ] हांका मारतात. जसें अग्नि, यम, मातरिश्वन् इ. [३] जे अरत्र नाहींत आणि परत्रहि जात नाहींत; जे ब्राह्मण नाहींत, सोमयागीहि नाहींत, ते अज्ञ या [ लौकिक ] वाचेचा आश्रय करून नांगर घेऊन शेतकी करतात [ १ विन्नाव—] (स्त्रीविणकराप्रमाणें वस्त्रें विणतात).

मनीषी किंवा सद्विप्र ब्राह्मण आणि अज्ञ शेतकी करणारे ब्राह्मण किंवा विणकर ब्राह्मण असे यांत वर्णन केले आहेत. हे शेतकी करणारे किंवा विणकर ब्राह्मण हे अर्थात् वृत्तीचे ब्राह्मण तरी म्हणतां येतील काय ? नाहीं. अर्थात् हे केवळ जन्मतः ब्राह्मणच असूं शकणार.

प्रश्न एवढाच कीं, जेथें निरुपायानें 'जन्मतः ब्राह्मण' असा अर्थ घेण्यावांचून गत्यंतरच नाहीं तेवढयाच ठिकाणीं, उ. या अलेरच्या ऋचेंत तेथेंच तेवढा जातिब्राह्मण असा अर्थ घेऊन इतरत्र वृत्तितः ब्राह्मण असा अर्थ करणार कीं सर्वत्र जातितः ब्राह्मण असा अर्थ करणार ? आणि जातितः सर्वत्र करण्यास हरकत कोणती ? वृत्तितः ब्राह्मण असा अर्थ केल्याचा पाश्चात्य पद्धतीचा एक विचित्र परिणाम असा कीं, जेथें जातितः ब्राह्मण असा घ्यावाच लागतो तेथें ती ऋचा केवळ तेवढ्याकरितां

अर्वाचीन ठरवावयाचों[1]? वास्तविक प्रश्न असा की, जन्मश्रेष्ठतेची कल्पना उत्पन्न झाली कधीं? पुरुषसूक्तांत जन्मश्रेष्ठतेची कल्पना आहे हर्शीच आपली कोठें आहे? असुरांतून निघतांना किंवा दोन वर्णांचा भेद करतांना ध्येय किंवा धार्मिक श्रेष्ठता त्यांना वाटली. त्यानंतर जन्मश्रेष्ठतेचा उगम झाला तो कधीं? 'नैचशाख' अधर, अधम, उत्तर किंवा उच्च या शब्दांवरून दास किंवा असुर कमी अधिकाराचे आणि आपण उच्च अधिकाराचे असें आपण ठरविलें. त्यानंतर जन्मानें श्रेष्ठता त्यांना वाटूं लागली असें दाखविण्यास कांहीं प्रमाण सांपडतें की नाहीं? ऋ. २.२६.१ यांतस जन्मना शब्द आढळून आले आणि तेथेंच या शब्दानें जन्मश्रेष्ठतेची कल्पना धारण करणारे ब्राह्मण असा अर्थ करणें अवश्य आहे असें दिसून आलें. तसेंच

सुजनिमानः नः ॥ ऋ. ७.६२.४

शुभ्रं जन्म न स्तज कृण्वानः ॥ ऋ. ४.३८.६

अशीं आपली दोन ठिकाणीं जन्मश्रेष्ठतेची कल्पना आढळून येते. तर मग तीच कल्पना इतरत्र का ग्रहण करूं नये? ब्राह्मण आपल्यास क्षत्रियापेक्षां श्रेष्ठ म्हणवी तो अनेक दृष्टींनीं असें कबूल केलें तरी त्यांत जन्मश्रेष्ठतेचीहि कल्पना आहे, असें कबूल केलें पाहिजे. ऋ. ४.३८.६ यांत आर्य लोक आपल्या स्वतःला शुभ जन्माचे किंवा श्रेष्ठ समजतात आणि माळा घालीत तशाच घोड्याला माळा घालीत असा अर्थ आहे. केवळ घोडा कुलीन समजून माळा घालीत आणि अकुलीन घोड्याला माळा घालीत

---

१ वरील ऋचापैकीं ७.१०३.१ यावर मूर टीप देतो ती अशी: Roth thus remarks on this passage: This is the only place in the first 9 मंडलs in the ऋग्वेद in which the word ब्राह्मण is found in its latter sense whilest the 10th मंडल offers a number of instances. *This is one of the proofs* that many of the hymns of this book were composed considerably later (than the rest of the ऋग्वेद). [ इटालिक आमचें ] हा दृष्टिदोष कसा मोंवतो पहा!

नसत असा अर्थ नाहीं. ऋ. ७.६२.४ यांत आम्हा 'जन्मश्रेष्ठांचें' रक्षण करा अशी स्पष्ट प्रार्थना आहे. हीं तीनहि मंडलें पुनींच आहेत. यांत जन्मश्रेष्ठतेची कल्पना आहे. असे जे ते आरणास जन्मानें श्रेष्ठ म्हणवितात त्याचें कारण खालील ऋचेंत दिलें आहे.

ते देवानां सधमादः ऋतवानः पूर्व्यासः कवयः इत् आसन् ॥
पितरः गूळ्हं ज्योतिः अनु अविंदन् । सत्यमंत्राः उषसं अजनयन् ॥
ऋ. ७.७६.४.

अर्थ :— ते देवांसह यज्ञांत आनंदित होणारे, ऋतवान् असे आमचे प्राचीन कवि येथें आहेत. ते आमचे पितर गूढ असें तेज प्राप्त करून घेते झाले. त्यांचे मंत्र सत्य असून त्यांनीं उषा निर्माण केली.

अशा विवरांचा व त्यांजपासून जन्म पावल्याचा त्यांना विलक्षण अभिमान वाटावा यांत नवल तें काय ? पूर्वी यजुर्वेदांतली एक ऋचा उतरून दाखविलेंच आहे कीं, आपल्या घराण्यांतल्या ऋषींचा व प्रवरांचा त्यांस अभिमान वाटे. सारांश, या श्रेष्ठतेच्या मुळाशीं जन्मानें ती प्राप्त होते ही कल्पना आहे. जन्मानें जर घोडाहि जातिवंत ठरतो तर मानव कां ठरूं नये ? आणि अशी कल्पना करून विवाहावर कटाक्ष ठेवला असल्यास नवल काय !

सारांश, जन्मश्रेष्ठता किंवा ब्राह्मणवर्णता दिसूं लागली कीं त्या ऋचा अर्वाचीन व दहाव्या मंडलाच्या कालांतील ठरवावयाच्या अशी रॉथ-मूरवृत्ति कबूल नसेल तर ब्राह्मण हा जन्मश्रेष्ठता मानी, चातुर्वर्ण्यांत त्यानें अग्रता संपादन केली, चातुर्वर्ण्यांत स्वतःपुरतीच नव्हे तर परस्परांत अधरोत्तरता ठरविली, आणि त्यानंतर प्रत्येक वर्णांत देखील अधरोत्तरता दिसूं लागली तशीच ब्राह्मणांत सद्विप्र, असद्विप्र, ब्रह्मबंधु [ उपनिषदें ] अशा नांवाचा ब्राह्मण सद्विप्र, असद्विप्र, मनीषी व तदितर, अधर व अवर, विणकर किंवा शेतकरी असे ब्राह्मण दिसूं लागले,[१] असाच सरळ अर्थ करणें भाग आहे. क्षत्रियांतहि राजन्य व राजन्यबंधु असे दिसूं लागले आणि वैश्य

[१] अत्रिस्मृतींतील दशविध ब्राह्मण पाहा. ब्रह्मबंधु हा शब्द ब्राह्मणांतहि आढळतो. अशिक्षित आणि अकुलीन ब्राह्मणहि आढळतात. तसेंच **महाब्राह्मणहि** वर्णिलेले आढळतात.

हे शूद्राचार बनूं लागले, पैकीं अखेरची गोष्ट आपण मनूवरून घेतली असून ब्राह्मण व क्षत्रियांची अधरता वैदिक वचनावरूनच ठरविली. पण ही अधरोत्तरता दिसून आल्यावर भल्या व बुऱ्या दोनहि दृष्टींनीं उपमानारद झाल्यावर चातुर्वर्ण्य तत्पूर्वीचें समजावयाचें कीं तदुत्तर समजावयाचें याचा निराळा निर्णयच नको. तें तत्पूर्वच ठरलें पाहिजे.

ब्राह्मणाची अधरता, तो शेतकी किंवा विणकाम करूं लागला यावरून, ठरविली किंवा होत्याचें काम उत्तम तऱ्हेनें करण्याची अपात्रता दिसून आल्यावरून ठरविली तशी त्याची उत्तमता त्याला देव समजण्याइतकी लोकांची तयारी दिसून आली असें वसून् देवासः म्हणजे वसु इच्छिणारे (भृ) देव–ऋ. १।१२८।८ त्यावरून ठरवितां येते. अर्थात्, निवृत्तिधर्मीय मनुष्यांपैकीं कांहीं व्यक्तींची फिरून प्रवृत्तीकडे भावना होऊं लागते तर कांहीं व्यक्ति अतीव कोटीच्या निवृत्तीला जाऊन पोंचतात. उ. उंछवृत्ति. असा हा क्रमच आहे. क्षत्रियांत 'राजन्य बंधु' आणि 'मिथुया धारयन् क्षत्रिय' निघाले (खोटे क्षत्रिय) तसेंच वैश्य हे शूद्र बनत चालले. खोट्या क्षत्रियापेक्षां मात्र वैश्यदेखील वरिष्ठ दर्जाचे असें समजत. असा हा मनुष्य स्वभाव आणि जीवनक्रमच आहे. तथापि त्यांत जितकें समाजाचें हित साधतें तितकें दुसऱ्या कोणत्याहि पद्धतींत साधत नाहीं. एक तर समाजाचा गुणोत्कर्ष अधिकांत अधिक साधतो आणि तज्ज्ञांची संख्या व सरासरी वाढत जाते. तथापि हा विषय या निबंधाचा एक स्वतंत्र विभाग होण्यासारखा असल्यामुळें त्याचा तूर्त विचार सोडून वस्तुस्थिति कशी होती एवढ्याचा आढावा घेऊं. विकासदृष्टीनें पाहूं लागल्यास समुद्राच्या लहरींप्रमाणें एकेक विचारलहरी येऊन ती समाजास थोडथोडी पुढें नेत आणि प्रतिक्रिया होऊन कांहीं मागें नेत असते. परंतु एकंदरीन समाजाची एका बाजूनें प्रगति होत जात असते. जन्मतः जातींमुळें प्रथम प्रथम गुणोत्कर्ष होऊन आणि जीवनकलहाची तीव्रता कमी होऊन समाजस्वास्थ्य वाढलें आणि समाजाचें आयुष्य वाढलें.

• रा सा. ना. गो. चापेकर यांच्या टीका

नानाप्रदेशांची कल्पना अशी कीं, चातुर्वर्ण्य म्हणजे चतुर्वर्णांचा धर्म.

चातुर्वर्ण्य हें भिन्न वंशांच्या लोकांचें संघटन–हा एक अभूतपूर्व प्रयत्न करण्यांत आला. अर्थात्, एका समाजाचे चार तुकडे–एका चमसाचे चार चमस जणुं काय–ही जुनी कल्पना चुकीची व त्यास अमान्य. चातुर्वर्ण्यांतील आनुक्रमिक श्रेष्ठतादी त्यांच्या भेटीच्या कालानुक्रमावरून ठरली.

(१) शंका: ऐतरेय ब्राह्मणांत अशी कथा आहे कीं क्षत्रियांना यज्ञांत प्रथम स्थान नव्हतें तें त्यांस मागाहून कांहीं शर्तीवर मिळालें. मूळचाच एक समाज असता तर असें होतेना. उत्तर: शं राज्यं अग्निः (ऋ. ७.४.३१), विप्रराज्ये यशेषु (ऋ. ८.३.४) असे यज्ञाचें मूळचें रूप अशा या 'शं राज्यांत' किंवा विप्रराज्यांत कांहीं विशिष्ट यज्ञांत–क्षत्रिय मागाहून आला असेल. कारण यज्ञसंस्था सर्वांचीच; ती अत्यंत प्राचीन असुरांत देखील चालू. अखेर ती पंचजनांची झाली! सारांश, यज्ञांत मज्जाव असलाच तर कांहीं विशिष्ट यज्ञांत असेल. अशांपैकीं एखाद्या विशिष्ट यज्ञांत त्यांना कांहीं अटींवर घेतलें. त्या अटींवरून त्या शमदमप्रधान यज्ञात क्षत्रियास न घेण्याचें कारण क्षत्रियांचा उग्रपणा असें दिसून येतें. प्रसादाविषयींहि क्षत्रिय बेफिकीर असत. ती बेफिकीरी सोडून दिली तेव्हां त्यास तो दरवार खुला झाला! क्षत्रियांकरितां स्वतंत्र यज्ञहि झाले, त्यांत ब्राह्मणांस दुय्यम स्थानहि मिळालें. पण लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट अशी कीं, याच आख्यायिकेंत ब्रह्मक्षत्रांची समकालीन उत्पत्ति दिली आहे. अर्थात् 'क्षत्रात्पूर्वं ब्राह्मणम्' याचा अर्थ सन्मान्ज्येष्ठं ब्राह्मणम् असा.

(२) शंका: हाडामासानें व धार्मिक समजुतीनें एकजीव असलेल्या समाजास छिन्न भिन्न कसें करतां येईल? स्वयमेव सेवकवर्गांत कोण जाईल? उत्तर: (ही शंका सर्व समाज सर्व प्रकारें एकजीव (homogenous) अशा कल्पनेवर काढलेली दिसते. परंतु ही समजूतच मूळ चुकीची. समाज सर्वतः एकजीव नसतो; तसा भास असतो; कांहीं विशिष्ट दृष्टीनें एकजीव दिसतो. उ. आजचा हिंदु समाज सर्वथा छिन्नविच्छिन्न आहे, ही गोष्ट निर्विवाद आहे. तथापि परकीय समाजांचे दृष्टीनें तो अद्याप एक आहे. (२) समाजांत निरनिराळ्या विचार-

म्हणी प्रसंगोपात्त उत्पन्न होत असतात. आजच पाहिलें तर गेल्या ५० वर्षांत अशीं अनेक राजकीय व सामाजिक आंदोलनें झालीं आणि त्या कारणानें समाजांचीं वर्गीकरणें कितीतरी झालीं! उ. सुधारक, उद्धारक; शुक्ल, कृष्ण; मवाळ, जहाल, ज्वलज्जहाल; कट्टर, चौफेर, साम्राज्यांतर्गत राहू इच्छिणारे स्वातंत्र्यवादी; अत्याचारी, अनत्याचारी इ. इ. (२) इतर जीवनोपायाच्या अभावीं मनुष्य सेवावृत्तीकरितांहि किती धडपडत असतो याविषयीं आजचा ताजा अनुभव आहे. मूळ शूद्र वर्ण नव्हताच. तो दास किंवा आसुरवर्गांतून आला, पण अन्नार्थी असल्यामुळें सेवकवर्ग बनला! सर्वच दास सेवक बनणें शक्य नव्हतें.

(३) शंका: प्रत्येक समाजांत चातुर्वर्ण्य असतेंच. येथें मात्र चातुर्वर्ण्य. तें कां? समाधान: चातुर्वर्ण्य = चातुर्वर्ण्य (श्रमविभाग-पद्धति) + आनुवंशिक तत्त्व + समलोमविवाह + कर्माची जबाबदारी. यावरून असें दिसून येईल कीं, चातुर्वर्ण्य हा चातुर्वर्ग्यांच्या पुढील विकास आहे. अश्वांची जात सर्वत्र आहे. परंतु चळू घोडा पाळून किंवा इतर रीतीनें त्याची सुधारणा करणें ही पुढची पायरी. गाई सर्वत्र दूध देतात. पण त्यांजकडून ५०।६० शेर दूध काढणें व तशी त्यांची जाति बनविणें हा विकास आहे. आतां कोठें पाश्चात्यांत समाजशास्त्र आणि प्राणि व वनस्पति-शास्त्र (*Biology and Botany*) निघून चातुर्वर्ण्य उत्पन्न करण्याकडे लक्ष लागलें आहे (National Welfare and Decay series चीं पुस्तकें पाहा.) असें सांगतात कीं, हिंदुस्थानांतल्याप्रमाणें चातुर्वर्ण्य कायद्यानें प्रस्थापित करण्याचा विचार रोमन लोकांत निघाला होता पण तो सिद्धीस गेला नाहीं. आनुवंशिक तत्त्व इतर समाजांत मुळींच नव्हतें असें नाहीं. त्यास अलिखित नियम (unwritten laws किंवा custom) चें स्वरूप होतें. अलिकडील सुधारणेच्या काळांत तें पाश्चात्यांनीं झुगारून दिलें, याबद्दल केसरलिंग आपल्या Book of Marriage मधील स्वतःच्या Choice of Parents या निबंधांत काय म्हणतो पाहा— Without doubt during the course of history mankind has certainly not improved, but actually deteriorated both from a psychological

and physical point of view. अर्थात्, त्यांच्या समाजाचें स्वास्थ्य बिघडत चाललें असून पूर्वी विशिष्ट गुणयुक्त प्रजा ( types of men ) उत्पन्न होत त्याप्रमाणें आतां होत नाहींत. आमचेकडे विभजनप्रवृत्तींत आनुवंशिक तत्त्व सामील करून घेतल्यामुळें वर्णसंकरास आळा बसून आतां कोठें उलट प्रवृत्ति दिसूं लागली आहे. त्याचे परिणाम पाहावयास कांहीं शतकें गेलीं पाहिजेत.

( ४ ) शंका : समाजविभजन झालें, संघटन झालें नाहीं याला प्रमाण काय?

( १ ) उत्तर : विभजनक्रिया नैसर्गिक आहे, एकीकरण कृत्रिम आहे. तेव्हां प्रमाणांची जबाबदारी एकीकरण झालें म्हणणारांवर पडते. तीं नानाशोधांनींच द्यावीं म्हणजे त्यांचा कोठें उल्लेख असल्यास सांगावा. आमच्यावर जबाबदारी नाहीं. तथापि

(१) यत्पुरुषं व्यदधुः कतिधा व्यकल्पयन्? मुखं किमस्य इ. ब्राह्मणोऽस्य मुखमासीत् इ. –पुरुषसूक्त

(२) कर्मभिः वर्णतां गतम् ॥ महाभारत

(३) कर्मक्रिया विभेदेन चातुर्वर्ण्यं प्रतिष्ठितम् ॥ भारत

(४) कर्माणि प्रविभक्तानि स्वभावप्रभवैर्गुणैः ॥ भ. गीता

हीं प्रमाणेंच नव्हत काय? (२) पण केवळ विभजनहि नाहीं. शूद्रांचा समावेश एकीकरणहि दर्शवितो.

(५) शंका : ऋग्वेदकालीं चातुर्वर्ण्य दृढमूल झालें नव्हतें. उत्तर : पण तें स्मृतिकालीं झालें म्हणून व स्मृतिकाल व वेदकाल एकच म्हटल्यावर ( वैदिक निबंध पा. १९७ ) फरक तो काय पडला? शूद्र शब्दाचा अभाव तें नामकरण मागाहून झाल्याचा तसेंच त्याचा समावेश मागाहून झाल्याचा पुरावा असूं शकेल. मूळ त्रैवर्ण्य. त्रैवर्ण्याच्या वेळीं अवशिष्ट समाज 'जन,' 'दास' म्हणून असे. तो गुणहीन समाज दास समाजांतून आला म्हणून त्याचें तें मूळ नांव इकडे प्रथम दास, मग जन व नंतर शूद्र म्हणून घेतलें. या अविशिष्ट पण गुणहीन समाजाचें विभजन करूं नये, असा पक्ष मनुस्मृतिकालीं होता. कोणी त्यांत विभजन करीत. उ. शूद्र, अतिशूद्र; सच्छूद्र;

अरुन्तुद वगैरे पुढें झालेच. शूद्रांची आर्योंशी यजुर्वेदांत तुलना केली आहे. एक गुणविशिष्ट तर दुसरा गुणहीन.

( ६ ) चातुर्वर्ण्य म्हणजे चार वर्णांचा धर्म असें नानासो म्हणतात. पण चातुर्वर्ण्य म्हणजे 'चत्वारः वर्णाः एव' चारच वर्ण, पांच नव्हत असा भाव. परोक्षप्रिय वेदांत विधिनिषेधादि नियम नाहींत. वेद व स्मृतिकाल एकच असल्यास ते कोठेंहि असले तरी सारखेंच.

( ७ ) शंका : दास व दस्यु कांहीं शूद्र नव्हत. उत्तर : सर्वच दास कांहीं शूद्र नव्हत. जे इकडे आले व ज्यांचा समाजांत समावेश करून चातुर्वर्ण्य बनविलें तेवढेच शूद्र. ते अनार्यों व मित्रवत् 'इंद्रगोपाः देवगोपाः मदंति' असे. त्यांना मारायला इंद्र कसा येईल ? दास शूद्रांत एकसमानाधिकरण मूळचें खरें. पण त्यांना आर्यांचें उच्च ध्येय नसलें तरी ते त्यांच्या देवांच्या उपासनेंत सामील झाले, आर्यांचा 'द्रोह' सोडला तेव्हां ते समावेश करण्यास योग्य-धर्म्य-झाले. पुढें त्यांत फिरून विभजन झालें तें मूळचा सर्वच एकीकरणाचा प्रयत्न असता तर होतें ना. दास=विन् किंवा चरट्या नाकाचे, मुंड नव्हत.

( ८ ) शंका : दास समर्थ, शूद्र असमर्थ व निर्धन हें कसें ? उ. (१) हा फरक तत्त्वदृष्ट्या खरा, परंतु व्यवहारांत दिसत नाहीं; (२) शूद्र राजप्रधान असल्याचें वर्णन शतपथब्राह्मणांत आहे तर मनुस्मृतींत 'शूद्र राज्यांत राहूं नये' असा निषेध आहे. मैत्रायणी संहितेंत व ब्राह्मणग्रंथांतच याउलट प्रमाणें आढळतात. यावरून शूद्र शब्द प्रथम जरी चातुर्वर्ण्यांत समाविष्ट झालेल्या लोकांस लावला तरी तो पुढें सर्वच दासदस्यूंना लावला हें उघड आहे. शूद्र व्यापार करू शके असें स्मृतींवरून स्पष्ट दिसतें. अर्थात्, शूद्र निर्धनच केवळ हें खरें नाहीं. शूद्र निर्धन याचा अर्थ इतकाच कीं, तें धन त्याच्या स्वामीचें असें म्हणण्याचा प्रघात असावा.

( ९ ) शंका : शूद्राच्या सुधारणेच्या निमित्तानें त्याचा समावेश केला व तो पुढें द्विजवत्सेव्य झाला ! उत्तर : निर्धन शूद्र द्विजवत्सेव्य कोणाला, कसा व कधीं झाला, यावद्दल प्रमाणांची अपेक्षा आहे. महाराष्ट्रांतील संतांप्रमाणें झाला असेल कदाचित्. असें असेल कीं, शूद्र व

दास यांतील फरक समजेनासा झाल्यावर कोणी यवन, म्लेंच्छ किंवा संत शूद्र असेल तर द्विजसेव्य झाला असेल.

(१०) शंका: शूद्र स्मृतिकालीन आणि स्मृति श्रुत्युत्तर? उ. (१) मग त्यांचा उल्लेख ऋग्यजुर्वेदांतून कसा सांपडतो? ऐतरेय ब्राह्मण-कालीं चार वर्ण रूढ झाले असें म्हटलें आहे (पा. १२३, वैदिक निबंध). उलट ऋग्वेदकालीं ते दृढमूल झाले नव्हते–अर्थात् रूढ होते–असें म्हणून श्रुतिस्मृतिकाल एकच म्हटल्यावर हें एक कोडेंच बनतें. तें कसें सोडवावें? यजुर्वेदांतील उल्लेख दर्शवितात कीं, शूद्रस्त्रीपुरुषांचा अतिनिकट संबंध येई. अत्यंत परकी लोकांचा इतका अतिनिकट संबंध व त्या संबंधाचा उल्लेख शक्य दिसतो काय? याचे उलट मनुस्मृतींत तर या निकट संबंधाविरुद्ध बंदोबस्त केलेला आढळतो आणि कामतः अनुलोमहि होऊं शके असेंहि दिसतें. याहि पुढील पायरी म्हणजे वेदांतून मिश्र जातींचा उल्लेख आढळतो. यापेक्षां आणखी चातुर्वर्ण्याचें काय प्रमाण पाहिजे? चातुर्वर्ण्य, त्याचें आनुक्रमित्व, आणि विवाहनिषेध यांवाचून?

(११) इतर कोठें चातुर्वर्ण्य कां नाहीं? उ. (१) देवांतील चातुर्वर्ण्यासंबंधानें परस्परविरुद्ध उल्लेख वैदिक निबंध पा. ७२ व १२२ यांवर आहेत. सर्वच देव एकदम शूद्रास जात याला कांहीं प्रमाण आहे काय? देवांतील चातुर्वर्ण्य बृहदारण्यकांत दिलेंच आहे. (२) भारतांत भीष्मपर्वांत मग, मशक, मानस व मंदग असें एक चातुर्वर्ण्य उल्लेखिलें आहेच. मग हे इराणचे पूर्वीचे बहुधा– मद् (Medes)–असावे, हें नानासो यांचें म्हणणें आम्हांस कबूल आहे. हें वैदिक चातुर्वर्ण्याहून भिन्नच नव्हे काय? परस्पर अन्नव्यवहार येथेंहि कांहीं लोक मांसनिवृत्त होईपर्यंत असूं शकेल. वैवाहिक निषेध आमच्यांतहि मूळ नव्हता. परंतु प्रतिलोमविवाहनिषेध वेदपूर्वकालीन सुरू झाला. आमच्यांतील निषिद्ध चाली या असुरांत गोरदाववाल्याच. अर्थात्, आमच्याइतकें कट्टर चातुर्वर्ण्य त्यांच्यांतहि सांपडतें हेंच आश्चर्य. प्रसंगोपात्त कांहीं लोकांची अपरोक्षता पाहून प्रथम प्रथम त्यांचा परस्परसमावेश झालाहि असेल असें गुरूनें गोळा केलेल्या पुराव्यावरून वाटतें. तथापि त्या पुराव्याचें निरीक्षण

फेलें पाहिजे. शिवाय, पुढें केवळ जन्मजात चातुर्वर्ण्य व समलोमविवाहच कायम झाले यावरूनहि हाच प्रत्यय येतो कीं, सर्व निर्बंध एकदम आले नाहींत; अनुभवोत्तर निर्बंध वाढत गेले किंवा विभजनाची प्रक्रिया वाढत गेली. आणि हाच या विभजनांतील मोठा दोष कीं, हें विभजन वाढत जातें, त्याबरोबर क्षुल्लक कारणावरून द्रोह वाढत जातो आणि त्याबरोबरच परकीय आक्रमणाची भीति वाढत जाते. तथापि वंश किंवा जातिभेद राहूं शकतो ही गोष्ट गेल्या महायुद्धांतील रजपुतादि लोकांच्या पराक्रमावरून दिसून येते. तसेंच समाजजीवित वाढतें ही गोष्ट आमच्या आजच्या अस्तित्वावरून आणि इतर समाजाच्या नाशावरून सिद्ध होते. (३) ॲटलॅंटिस खंडातील चातुर्वर्ण्य: Story of Atlantis by W. Scott Elliot p. 8 (1896) पाहा. त्यात चार रंगांचें चातुर्वर्ण्य-Enthological types म्हणून (१) वर्णिल्याचें दिसतें. (४) इजिप्शियन देशांत चार रंगांचे लोक किंवा रंगविलेले पोषाखांचे लोक (painted) तेथील चित्रांवरून दिसतात (ख्रि. पू. २३००) असें टॉर्नीनाई म्हणतो. शिवाय Ancient Egypt by Rawlinson पा. २५, २७ व ४४ पाहा. त्यांत थेट आमच्याप्रमाणेंच दोन व चार वर्ण दाखविलेले आहेत. हे वर्ण म्हणजे Castes नव्हत असें Rawlinson म्हणतो. The line of demarcation might be crossed. *आमच्याकडेहि अशी शक्यता ग्रंथांतून–श्रुतिस्मृतिपुराणांतून अर्थात् पूर्वकालीं अधिक व उत्तरकालीं कमी–दिसून येते.* (५) इराणी लोकांत चातुर्वर्ण्य-नव्हे त्रैवर्ण्य होतें असें नानाशी म्हणतातच. चवथा वर्ण नव्हता असें ते म्हणतात. पक्ष तर आमच्याकडेहि मूळ चातुर्वर्ण्य नसून त्रैवर्ण्यच होतें, तेव्हां तसें शक्य आहे. तथापि चवथा कारूंचा वर्ण दिलेला आढळतो. कारू शूद्र नव्हत असें का त्यांचें म्हणणें ? तसें असल्यास तें बरोबर नाहीं.

*शूद्रस्य वार्ता शुश्रूषा द्विजानां कारुकर्म च ॥ अत्रिस्मृति. १.१५.*

शिवाय, पराशरस्मृतींत त्यांना व्यापार करण्याची मोकळीक दिसते (१. ७२, ७३ पाहा.). इराण्यांतील ब्राह्मणांत विवाह व अन्ननिषेध आहेच. (६) ग्रीक व रोमन लोकांत चातुर्वर्ण्य होतें असें म्हणतात.

त्यांत आनुवंशिकता, अधरोत्तरता, विवाहनिषेध परस्परसमावेश वगैरे व्यावहारिक दृष्ट्या होतीं कीं नाहीं एवढाच प्रश्न. अधरोत्तरता होती हें खास. इतर गोष्टी नसतील. परस्परसमावेश आमच्यांतच कांहीं काळ होता. आमचें अनुकरण ज्यांनीं ज्या कालांत केलें तेवढेंच त्यांच्यांत दिसून यावयाचें. आमचें उदाहरण दुसऱ्यांनीं घ्यावें असा आमचा लौकिक मनुस्मृतींत आढळतोच. आजहि मनुस्मृतीचें अनुकरण करावें अशी चळवळ पाश्चात्यांत आहे. Laws of immigration बद्दल बहिष्काराचे प्रयोग तिकडे नुकतेच सुरू झाले आहेत व वंशश्रेष्ठता मानण्यास फिरून सुरुवात झाली आहे असें दिसून येतेच.

( १२ ) शंका: असुर, राक्षस, दासदस्यु वगैरे भिन्न होते. उ. या म्हणण्याला प्रमाण काय? कल्पना नको. आम्हाला वैदिक प्रमाणें उलट वाटतात. हे शब्द परस्पर बदलूं शकतात. ज्यास एकदां असुर त्यास दुसरीकडे दास म्हटलेलें आढळून येतें. ( २ ) त्यांस लावलेलीं विशेषणें सर्वत्र एकाच प्रकारचीं आहेत. अर्थात् वैदिक लोक ज्या धार्मिक दृष्टीनें पाहतात त्या दृष्टीनें ते सर्व एकच. इंद्र जसा दस्यूंयेकरितां जन्मास येतो तसा शूद्राकरितां कसा येईल? शूद्र आर्यांस अनुकूल आणि 'देवगोप व इंद्रगोप' झाल्यामुळें 'मदंति' म्ह. हर्ष पावतात. शूद्र सुधारावे ही इच्छाच आहा पण जेथें अनवधानानें, कर्मलोपामुळें ब्राह्मण अवर दिसूं लागले, क्षत्रियांत खोटे आणि राजन्यबंधु निघाले, वैश्य अनवधानानें व कर्मलोपामुळें हातचे सुटूं लागले तेथें शूद्र किनीसे चढणार? कोणी द्विजसदृश्य झाले ही काय थोडी प्रगति झाली? तरी ते 'एकजाती'च राहिले. द्विजाति बनले नाहीत म्ह. ते संस्कार व प्रत्यक्ष वेदशिक्षणविरहितच राहिले. वेदशिक्षणविरहित राहिले याचा अर्थ व्यावहारिक किंवा धर्मशिक्षणविरहित राहिले असेंहि नव्हे.

(१३) शंका: वर्णातिक्रम होऊं शकें कीं नाहीं? उ. दोन वर्णांचे चावतींत होऊं शके असें वैदिक वचन पूर्वीं दिलेंच आहे. 'यया दासानि शूद्राणि आर्या करो' असें ऋग्वेदात म्हटलेंच आहे. चातुर्वर्ण्यांतहि वर्णातिक्रम घडण्याचा संदर्भ: शक्य पण बहुधा अशक्य दिसतो. मूर्तें वर्णां-

तिक्रमाचीं अशीं पुष्कळ उदाहरणें[१] गोळा केलीं आहेत. वसिष्ठविश्वामित्रांच्या भांडणाची गोष्ट खरी असेल तर या सर्व गोष्टी व हीं सर्व उदाहरणें तत्पूर्वीची असें ठरवावें लागेल किंवा त्यांतील अटी फार कठीण वाटूं लागल्या असें वसिष्ठविश्वामित्रांचें भांडण सुचवितें असें म्हणावें लागेल. स्मृत्युक्तविशिष्ट सात पिढ्यांनंतरची वर्णातिक्रमाची अटहि त्यानंतरची असेल. वसिष्ठविश्वामित्रकुलापैकीं कोणत्या व्यक्तींचीं भांडणें झालीं, त्या व्यक्ति कोणत्या कालांतल्या होत्या वगैरे ठरवावें लागेल. त्या वेदकालीन असें वाटत नाहीं.

(१४) शंका : चार वर्णांचे पूर्वज भिन्न दिसतात. उत्तर : यांच्या उत्पत्तिक्रमांत फार भिन्नता दिसते. त्यांतली अमुक एक घेऊन चालणें आज तरी कठीण आहे. 'देवानां पितरं ब्रह्मणस्पति' असें ऋग्वेदांत आढळतें, तर देव व मनुष्यें पितरांपासून झालीं असें दुसऱ्या वेदांत सांपडतें. 'ब्राह्मण सप्तर्षींपासून (पितर) उत्पत्ति दर्शवितात. क्षत्रिय व

१ या बाबतींत वे. इं. कार यांचे मत बहुशः आमच्याप्रमाणेंच आहे. पाहा: That warriors became priests, *that an actual change of caste took place is quite unproved by a single genuine example.* It is probably a fair deduction that the royal caste did not much concern itself with the sacred lore of the priest, though it is not unlikely that individual exception occurred. विश्वामित्र किंवा देवापि वगैरेंचीं उदाहरणें वेदांतून–क्षत्रियाचे ब्राह्मण झाल्याचें–आढळत नाहींतच. एवढेंच नव्हे, तर वे. इं. कार *आमचाच अनुवाद खालील वाक्यांत करीत आहेत असें दिसतें–* But a priest cannot be said to change caste by acting in this way. It would be unwise to deny (altogether) the possibility of caste exchange but is not clearly indicated by any record. It may therefore be held that *the priests and the nobles practised hereditary occupations and that either class was a closed body in which a man must be born.*

वैश्य मनूपासूनचे असें दिसतें.' पण इतरत्र सर्वच त्रैवर्णिक मनूपासूनचे आढळतें. ब्राह्मण तरी देवोत्पन्न कसे म्हणावे ! क्षत्रिय व वैश्य जर मनूत्पन्न तर त्यांत अधरोत्तरता कां किंवा भिन्न तरी कसे ! आनुवंशिक तत्त्व आणि अनुप्रतिलोमविवाहबंदी या दोन गोष्टी म्हणजे चातुर्वर्ण्याच्या प्राणभूत गोष्टी ! ( तिसरी गोष्ट म्हणजे रोटीबंदी. परंतु ती गोष्ट मांसाशननिवृत्तीमुळें आणि सात्त्विकता किंवा ब्राह्मण्य संभाळण्यासाठीं आहे, केवळ चातुर्वर्ण्यासाठीं नाहीं. ) यामुळेंच परकी चातुर्वर्ग्य आणि हिंदु चातुर्वर्ण्य यांत भेद उत्पन्न झाला आहे; पण वर्ण म्हणजे कांहीं मानववंश नव्हत. आर्य, रेड इंडियन, मंगोलियन आणि नीग्रो हे रंग वगैरे दृष्टीचे चार वंश होत. चातुर्वर्ग्य व चातुर्वर्ण्य दोनहि कर्मोत्पन्नच; पण एकामध्यें 'स्वकर्मणा तं अभ्यर्च्य'

---

( मागील टीप पुढें चालू )

या बाबतींत याज्ञवल्क्यस्मृतींतील खालील दोन श्लोक महत्त्वाचे आहेत.

सवर्णेभ्यः सवर्णासु जायंते हि सजातयः
अनिंद्येषु विवाहेषु पुत्राः संतानवर्धनाः ॥ ९०
जात्युत्कर्षो युगे ज्ञेयः सप्तमे पंचमेऽपि वा ।
व्यत्यये कर्मणां साम्यं पूर्ववच्च अधरोत्तरम् ॥ ९६

यांतील 'संतानवर्धनाः' याचे अर्थ दोन-( १ ) संतान अधिक दिवस टिकेल, (२) गुणांत श्रेष्ठ निपजेल. पहिला नियम सवर्ण स्त्रीपासूनच सजाति संतति (type) उत्पन्न होते. सवर्ण नसतील तर ( १ ) क्षेत्रजस्तु मातृसमानजातीयः असें ही स्मृति सांगते. उ. यथा धृतराष्ट्र पाण्डु-विदुराः । यांतील धृतराष्ट्र व पांडु क्षत्रिय ठरले, पण विदुर दासीपुत्र ठरला ! केवळ विदुराचें आचरण पाहिलें तर त्यास पितृसमान म्हणजे व्यासाप्रमाणें ब्राह्मण ठरावयास पाहिजे होतें. अर्थात्, त्यापूर्वीचे व्यास ब्राह्मण ठरले याचें कारण केवळ पराशरप्राप्तजन्म नव्हे. व्यास तरी मत्स्यगंधाप्रमाणें कोळी ठरावयास पाहिजे होते किंवा विदुर तरी व्यासाप्रमाणें ब्राह्मण ठरावयास पाहिजे होते. अर्थात्, ह्या नांवें उदाहरण अपवादक ठरतें. कै. राजवाडे गंगा, भीष्म, शकुंतला आणि मद्रद्रुह् यांची उदाहरणें देतात. यांपैकीं 'गंगा' म्हणजे एखादी पर्वतकन्या असें राजवाडे मानतात.'

म्हणजे स्वकर्मानें ईश्वराला संतुष्ट करण्याची जी कल्पना आहे, ती जगांत कोठें सांपडते काय ? ही कल्पना साध्य होण्याला म्हणजे हा गुण सर्वोत्तम बनविण्याकरितां त्या कर्मोत्पन्न चातुर्वर्ण्याचें-श्रमविभागाचें-स्वरूप सोडून त्याला वरील कर्मार्चनाला आनुवंशिक तत्त्वाची जोड द्यावी लागली. पण आनुवंशिक तत्त्वाची जोड दिल्याचा परिणाम मात्र असा झाला कीं, जो तो आपला भिन्न जन्म मानूं लागला. कोणी ब्रह्मदेवापासून, कोणी मनु, कोणी पितर म्हणजे सप्तर्षि असें मानूं लागला ! हा प्रथमजन्म कोणी पाहूं शकेल काय ? अर्थात् नाहीं. मग त्याविषयींच्या या भिन्नभिन्न कल्पना निघाल्या यांत नवल काय ? मूरसाहेबाला वाटलें कीं, भिन्न भिन्न कथा आहेत तेव्हां या प्रमाणभूत कशच्या ? सगळेंच थोतांड; सगळेच ब्राह्मणाचे खेळ ! दुसरें काय ! पण त्या कथा म्हणजे खरोखरी कल्पनाच ( Theories ). त्या कथा म्हणजे कांहीं चातुर्वर्ण्याचें सर्वस्व नव्हे. त्यांतील आनुवंशिक तत्त्व हेंच काय तें खरें ! या इतक्या परस्परविरुद्ध कथा-बनावट म्हणा पाहिजे तर-आनुवंशिक तत्त्व निःसंशय सिद्ध करतात. दोघेंक

---

तथापि ती 'अनार्य'च होती, ही गोष्ट राजवाडे कशावरून ठरविणार ! केवळ कल्पना ! वास्तविक स्त्री अज्ञात. अज्ञात म्हणजे कांहीं अनार्य नव्हे ! अर्थात्, भीष्म हे पितृसवर्णच ठरावयाचे. शकुंतलेचा काल कोणता ? त्या वेळीं विश्वामित्र तर ब्राह्मण बनले होते ( पौराणिक कथेवरीलकडचा आधारच नाहीं ! ) पौराणिक कथेप्रमाणें त्या वेळीं विश्वामित्र ऋषि दिसतात-मग ब्रह्मर्षि असोत कीं राजर्षि असोत. ते राजर्षि असतील तर शकुंतला क्षत्रिय ठरावी यांत काय आश्चर्य ! ती गंधर्व ठरली नाहीं, कारण माता अज्ञात होती. विश्वामित्र राजर्षि नसून ब्रह्मर्षि असले तरी शकुंतला-जन्म कांहीं ब्रह्मर्षिपणांतला खास नव्हे. राजा दुष्यंत आणि त्या वेळीं तो विश्वामित्राला ब्राह्मण ऋषि समजतो. पण शकुंतला झाली त्या वेळीं ब्राह्मणत्व प्राप्त झालेलें नव्हतें. अर्थात्, शकुंतला क्षत्रिय ठरली यांत विशेष तें काय ! निमेर यदुद्रह्यूंचें. यदुद्रुह्युसंबधान देखील पौराणिक कथेवाचून कांहींच आधार नाहीं ! आणि त्यांचा कालहि सांगतां येत नाहीं. त्या काळीं ब्राह्मण, क्षत्रिय असे वर्ण पडले होते असें राजवाडे कबूल करतात असें दिसत

दृष्टीमुळें व टर करण्याच्या बुद्धीमुळें साहेबाचें लक्ष परस्परभिन्नत्वांकडे जातें, आणि त्यांतील सत्त्व किंवा सार काढण्याची बुद्धि आमची म्हणून त्या परस्परविरोधी कथांतून समानाधिकरण असें आनुवंधिक तत्त्व आम्ही घेतों. नानासाहेबांचें जें परस्परविरोधाकडे लक्ष लागलें त्याचें कारण त्यांना हा कर्मभेद व समाजभेद यांतील कार्यकारणभाव लक्षांत आला नाहीं आणि ते म्हणूं लागले कीं, विभजन खरें नसून संकरणच खरें. वास्तविक यत्र-शिवाय त्रैवर्णिकांच्या संकरणाची कल्पना आम्हांला फारच वावडी आणि भीतिजनक वाटते. परंतु ती विभजनाची कल्पना अर्वाचीन वाटून आणि आमच्यांतील आचारभिन्नता पाहून त्यांना भिन्न समाजाचें हें एकीकरण किंवा संघटना ही राजवाड्यांची कल्पना खरी वाटली !

वर्ण हा सहसा बदलतां येत नाहीं. तो उपनयनप्रसंगींच—अध्ययन-पूर्व प्रधान शास्त्र्यांच्या मताप्रमाणें समावर्तनाचे सुमारास नव्हे—सांगावा लागे. वर्णान्तराच्या गोष्टी तर इतक्या थोड्या आणि प्राचीन आहेत, कीं त्यांवरून कांहीं अनुमानच काढतां येत नाहीं. आम्हांला वाटतें कीं, विश्वामित्र-वसिष्ठांचें भांडण क्षत्रियांतून ब्राह्मणवर्गांत जाण्याकरितां दिलेलें नसून पूर्वींच्या सर्व उदाहरणांवर पडदा पाडण्याकरितां व समावेशाची कल्पना वाचकांच्या मनांतून काढून टाकण्याकरितां दिलें आहे. ही कथा क्षत्रियाचा विजय दर्शवीत नसून त्याचें अपवादत्व किंवा ब्राह्मणाचा विजय दाखवितें.

---

नाहीं. मग या उदाहरणांचा उपयोग काय ? जीं दोन उदाहरणें राजवाडे अर्वाचीन म्हणजे पेशवेकालांतलीं देतात त्यांपैकीं एक अपवादात्मक आणि एक अज्ञात मातेचें ! प्राचीन दोन उदाहरणें अशा कालांतलीं कीं त्या वेळीं आश्रमपाठारच्या जाति उत्पन्न झाल्या नव्हत्या, असें राजवाड्यांनीं समजून ! त्यांतहि एक अज्ञात मातेचें ! या यदुवंशाला एके ठिकाणीं दास म्हटलें आहे. त्यांची गणना आर्यवंशांतहि केली जाते. अशा अज्ञात माणसाबद्दलची पांचमिश्राची कथा घेऊन हे राजवाडे काय सिद्ध करतात ? जातयुक्त-पांचा वर दिलेला नियम ख्रिस्तपूर्व ५।७ शिस्तानंतर अंमलांत येणारा म्हणजे असंभवनीयच होय.

नानासाहेबांनीं दिलेल्या ऋ. ९. ११२. ३ यांतील उदाहरणाचा विचार करूं. त्यांत ऋषि म्हणतो 'मी कारु, माझा बाप किंवा मुलगा भिषक्, आणि माझी नना उपलप्रक्षिणी'। पण यांत काय दिसून आलें? यव कुटणारी किंवा भाजणारी किंवा यवांतून उपल निवडणारी (उपलप्रक्षिणी) हा काय तिचा धंदा? कीं 'धंदा–धरकाम' असें न्यायकोटींत वाचकांविषयीं म्हणतात तोच? किंवा ही जाति? आतां बापलेकसंबंधानें–मग तत शब्दानें dad म्हणजे बाप घ्या किंवा संतान समजून लेक घ्या–पाहिलें तर ते भिन्न दिसतात कीं काय तें पाहूं. कारू आणि भिषक् दोघेहि ब्राह्मणच किंवा दोघेहि वर्णांतील कोण हे सांगतां येत नाहीं; काहीं तरी एक म्हणा! उलटपक्षीं यांतील एक मात्र ब्राह्मण आणि दुसरा मात्र ब्राह्मण नाहीं, याला कांहीं प्रमाण आहे काय? (नि. ६.५ पाहा) इ.

'कारुः' 'स्तोमानां कर्ता'–स्तोमकर्ता स्तुतीनां प्रयोक्ता यज्ञकर्मणि होतृत्वेन अवस्थितः।

बहिर्वा यज्ञात् प्रियवक्ता लौकिकार्थि वाचो युक्तिभिः जीविका परतया।

भिषक्[1]–ब्रह्मा, स हि प्रायश्चित्तरोगे उत्पन्ने यज्ञस्य करोति।

यदुक्तम्–"भेषज्कृतो ह वा एष यज्ञो यत्रैवंविद् ब्रह्माभवति।

इतरो लौकिको वा भिषक्।

*उपलप्रक्षिणी–सक्तूनां पेष्ट्री। दासी पिनष्टि इति हि उक्तम्।*

सारांश, तिघेहि यज्ञसंपादक असें यास्काचार्य व दुर्गाचार्य समजतात. पूर्वीच्या लोकांच्या समजुतीप्रमाणें दोघे बापलेक ब्राह्मणच. या शब्दांचे स्मृत्युक्त अर्थ घेतले तरी बापलेक दोघेहि ब्राह्मण असूं शकतील. पाहा—

नृपायां विप्रतः चौर्यात् सजातो यो भिषक् स्मृतः॥ स्मृति

म्हणजे भिषक् याचा बाप विप्रच! पितृसावर्ण्य मानलें तरी भिषक् हा विप्रच! नना म्हणजे आई किंवा मुलगी. कदाचित् दासीहि असेल. तो शब्द सोडला तरी पितापुत्र कोणत्याहि अर्थानें पाहिले तरी ब्राह्मणच दिसतात.

---

१ भिषक् हा ब्राह्मण–१०.९७.२२ पाहा. यस्मै कृणोति ब्राह्मणः तं राजन् पारयामसि। १०.९७.६ पाहा. विप्रः स उच्यते भिषग् रक्षोहामीवचातन्।

सारांश, यांत बापलेक व आई भिन्न वर्णांची मानण्याला यत्किंचित्‌हि प्रमाण मिळत नाहीं.

पण नानासाहेब यांचे मताप्रमाणें देवासुरमानव येवढे मूळ तीनच प्रकार मानवांचे. त्यांत चातुर्वर्ण्य प्रत्येकांत होतें कीं फक्त मानवांत? कसेंहि मानलें तरी प्रथम तीन वर्ग झाले, ते फिरून फुटले—किती झाले कोणास ठाऊक!—आणि नंतर त्यांपैकीं चार फुटलेल्या वर्गांचें एकीकरण झालें! अशा या फुटलेल्या वर्गांत किंवा त्यांपैकीं कोणत्या एखाद्या वर्गांत हें भिषक् आणि कारु होते असें समजावयाचें? तें सांगतां येईंपर्यंत या उदाहरणाचा काय उपयोग? संकरण करतांना निरनिराळे धंदे करणारे पाहून त्यांचें एकीकरण झालें कीं यदृच्छया चार लोक भेटले ते भिन्न-भिन्न व्यवसाय करीत, पण एकीकरणाचे वेळीं त्यांनीं करार मदार करून निरनिराळे व्यवसाय करण्याचें ठरविलें व ते वंशानुवंश चालवण्याचें कबूल केलें?

(१५) शंका: कृतयुगांत एक आणि त्रेतायुगांत तीन वर्ण झाले अशी आख्यायिका आहे. उ. याचा अर्थ विभजनलक्षणें नवीनच त्रेतायुगांत उत्पन्न झालीं किंवा ठरविलीं किंवा श्रमविभागाचें तत्त्व नवीनच आदळून आलें असा करावा लागेल. दोनहि तऱ्हें मूळचा एक समाज सुचवितात; भिन्न समाजांचें एकीकरण सुचवीत नाहींत.

(१६) शंका: स्मृत्युक्त चातुर्वर्ण्य व गीतेंतील चातुर्वर्ण्य भिन्न दिसतें. तीन गुण व चार कर्मे यांचें समीकरण सयुक्तिक वाटत नाहीं.

उत्तर: भगवद्‌गीतेंतील ४.१३ व १८.४१ हे श्लोक एकत्र वाचले म्हणजे याचा उलगडा होतो. गुणैः कर्माणि प्रविभक्तानि म्हणजे गुणैः कर्माणि उत्पन्नानि तानि चतुर्धा प्रविभक्तानि असा अर्थ आहे. सत्त्वरजतमो गुणांनीं कर्मे उत्पन्न होतात. त्या कर्मांचे चार विभाग करण्यांत आले. दोन विभागण्या स्वतंत्र करून त्यांचें समीकरण घालण्यांत आलें. पण गुण-कर्मे स्वयंसिद्ध कीं स्वयंनिर्णयात्मक हा खरा प्रश्न. गुण प्रकृत्युत्पन्न–अर्थात् जन्मसिद्ध–म्हटल्यावर ते स्वयंनिर्णयात्मक असे कसे म्हणावयाचे? कर्मे

तर या गुणांवर अर्थात् अवलंबून म्हणजे फिरून जन्मसिद्ध असा गीतेचा अभिप्राय आहे. कर्मे स्वयंबुद्धिनिर्मित नसून जन्मसिद्ध असल्यामुळेच तीं सदोष किंवा विगुण वाटतात व आपल्यास न आवडणारीं कर्मेहि प्रसंगोपात्त करावीं लागतात. स्वयंनिर्णयावर तीं अवलंबून असतील तर स्वतः होऊन, स्वतःस सदोष व विगुण वाटतात तीं कर्मे करण्यास कोणी प्रवृत्त होणार नाहीं आणि मग अर्जुनानें जो प्रश्न उपस्थित केला तो उत्पन्नच होऊं शकला नसता ! कोणतेंहि कर्म 'धूमावृत' म्हणजे गुणदोषयुक्तच असतें असें मानलें तरी त्यांत एकदां खराखरी ठरवून स्वयंनिर्णय केल्यावर विगुणत्व व सदोषत्व कसें राहूं शकेल ! आणि राहिलें तर मनुष्य शरिरांतील घाण बाहेर टाकलो तद्वत् टाकू शकेल. त्याला गीता कशाला ! उलटपक्षीं जन्मतः कर्म अंगावर पडल्यावर तें सदोष वाटूं लागलें तरी स्वधर्म (स्वकर्म) म्हणून करणें भाग पडतें व मग गीता उद्भवते. गुणांमुळे उत्पत्ति नसून उत्पत्तीमुळें गुण प्राप्त होत असतात. गुणांमुळें उत्पत्ति असली तर ते गुण पूर्वजन्मींचे. वर्णांचीं कर्मे वैदिककालींच निश्चित झालीं होतीं हें ८. ३५—१६, १७, १८ वरून सिद्धच आहे. तीं गीतेंत फक्त अनुवादलेलीं आहेत. हीं कर्मे जुन्या व नव्या (१, २, ४, ७, ८, १०) दोनहि मंडलांतून असल्यामुळें तीं वेदपूर्वच आहेत. विकासदृष्टीनें त्यांचीं बीजें त्यापूर्वींचीं. मग भगवंतांनीं

चातुर्वर्ण्यं मया सृष्टम् ॥ गीता ४.१०

म्हटलें यांत नवल काय ! तें मानुषेतर लोकांत नाहीं असें शंकराचार्य म्हणतात. त्या वेळीं मनुष्य म्हणजे देवासुरमानवांतला समजावयाचा कीं विग्नादि गुंडाळणारा मनुष्य समजावयाचा ! तें देवासुरांतहि गीतापूर्व आढळून येत असल्यामुळें मानुषलोकापलीकडे म्हणजे भूलोकापलीकडे नव्हतें असें मानावें लागतें. असुरांकडे चातुर्वर्ण्य होतें असें म्हणण्यास तसें एक वैदिक प्रमाण उपलब्ध आहे. 'मिथुया धारयंतं क्षत्रियं न' ऋ. ७.१०४.१३ अशी उपमा राक्षसांना दिलेली आहे. याचा अर्थ खोटेंच क्षत्रियत्व धारण करणारे (श्रुतिबोध) किंवा बळ नसतांना बलाचा आविर्भाव दाखविणारे असा होतो; खोटें बोलणारे

वलिष्ठ ( चित्रार्थ ) हा अर्थ योग्य वाटत नाहीं. संदर्भ पाहिला तर पहिलाच अर्थ योग्य वाटतो. या वचनावरून जातिवंत क्षत्रिय आणि स्वपराक्रमानें क्षत्रिय म्हणविणारे असे दोन प्रकार त्या कालीं असून त्यांतला पहिला प्रकार आर्यांना मान्य होता व दुसरा नव्हता ही गोष्ट स्पष्ट दिसते. अर्थात्, आर्येतर समाजांत हें दुसरें चातुर्वर्ण्य अनुमित करता येतें. असे हे दोन प्रकारचे चार वर्ग ज्ञात जगांत ज्ञात कालापासून असलेले पाहून 'चातुर्वर्ण्यं मयासृष्टं'[1] असें भगवानांनीं म्हटलें असावें. गीतेंत ज्या अर्थी जाति, जातिधर्म, वर्ण आणि वर्णसंकरभीति आणि चारच वर्ण अशा गोष्टी स्पष्ट आढळतात त्या अर्थी गीता जन्म आणि संस्कारयुक्त चार वर्ण प्रतिपादिते ही गोष्ट सूर्यप्रकाशाइतकी स्पष्ट आहे. वर्णसंकरभीति अर्जुन व श्रीकृष्ण दोघेहि दाखवितात. अर्थात्, जन्मनिष्ठ बेटीबंद चातुर्वर्ण्य तत्कालीनच नव्हे तर त्यांना जेवढा काल ज्ञात होता तेवढ्या कालांत होतें असें म्हटल्यावांचून गति नाहीं. तें वैदिक कालींच होतें असें म्हणणाऱ्या पाश्चात्य तज्ज्ञांचीं मतें पूर्वी दिलींच आहेत.

यजुर्वेदांत मिश्र जातींचा उल्लेख पुष्कळच आहे हें सर्वांसच कबूल आहे, पण ऋग्वेदांत त्या नाहींत असें नाहीं. वृषल, कितव आणि बहुधा भिषक् हे शब्द मिश्र जातींचे दिसतातच. पण वणिक् हा शब्दहि तसाच दिसतो हें पुढें 'दीर्घतमस् ऋषीचा वंशवेल' या विभागांत दिसून येईल. वृषल तर अस्पृश्यच यांत शंका नाहीं. वेदांत अस्पृश्यता नव्हतीच असें म्हणणाऱ्यांनीं जपूनच बोललें पाहिजे असें वाटतें. चातुर्वर्ण्य आनुवंशिक व रोटीबंद असल्यांखेरीज मिश्र जातींचा उल्लेख अशक्य आहे. अर्थात्, ऋग्वेदांत चातुर्वर्ण्य होऊं घातलेलें नसून प्रत्यक्ष रूढच काय पण मिश्र जातींचा उल्लेख करण्याइतकें दृढ झालें होतें.

१ (१) मया सृष्ट म्हणजे मजकडून उत्पन्न झालें—मी प्रत्यक्ष उत्पन्न केलें—असा अर्थ नव्हे. अर्थात्, सृष्टिक्रमांत यथाकालीं उत्पन्न झालें ( अर्थात् त्याचीं बीजें होतीं म्हणून ) असा अर्थ कोणी करतात. तो विचारांत घेण्यासारखा आहे. (२) गीतेंत चातुर्वर्ण्यांखेरीज पांचवादि वर्ण एक दोन ठिकाणीं दोवाचतो. पण त्याचा तूर्त विचार नको.

(१७) शंका: दस्युहत्यकरितां इंद्र अवतार घेतो व त्या करितां आर्य प्रार्थना करितो. शूद्र जर त्यांतलाच तर त्याच्या हत्येकरितां इंद्राला कां बोलावीत नाहींत? समाधान: गोष्ट खरीच आणि योग्यच, असें यापूर्वी केलेल्या विवेचनावरून कोणाला-हि दिसून येईल. शूद्र असुरांतून आले ही आमची कल्पना. त्याला वैदिक आधार मिळाल्यामुळें ती सिद्धांताच्या स्वरूपास पावली आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. आता 'दस्युहत्या' या शब्दावर कितपत जावें समजत नाहीं. कारण

देवासः दासस्य मन्युंश्चम्नन् ते न आवक्षन् सुविताय वर्णम् ॥ऋ. १. १०४. २. अर्थ : 'सर्व देव मिळून दासाचा क्रोध नाहींसा करून आमच्या वर्णाच्या लोकांस ते कल्याणाच्या मार्गाकडे घेऊन आवोत.' अशा ऋचा स्पष्टपणें उलट सांगतात. Conquest not by arms but by peaceful means असें जे म. इं. कार म्हणतात तेंच सर्वथा युक्त. आपा शस्त्रयुद्धाची पण मतलब शांतियुद्धावा असा प्रकार आज म. गांधींनी आमच्या अनुभवास आणून दिला आहे. करितां या नवीन दृष्टि-कोणानें विद्वानांनीं या वैदिक वाक्याकडे पाहावें अशी त्यास नम्रतापूर्वक विनंती आहे. वास्तविक शूद्र त्यांतून आला असला तरी मूळचा शत्रु नव्हे, मित्र म्हणून आला, हें लक्षांत ठेवणें जरूर आहे. शूद्र हा शब्द 'शोक करणारा' या अर्थाच्या धातूपासून व्युत्पादतात तो याच कारणानें.

या बाबतींत आणखी एक सूचना करणें इष्ट आहे. गेल्या वर्षी आम्हांस असुर, राक्षस, दास, दस्यु यांसंबंधानें शंका येऊं लागल्या. तेव्हांपासून लक्षपूर्वक पाहूं लागलों असतां असुर, राक्षस, दास, दस्यु इ. शब्दांची अदला-बदल होते असें आम्हांस दिसून आलें आहे. त्यांत काहीं भिन्नता असेल, पण ती आमच्या लक्षांत आली नाहीं. आम्ही तूर्त सर्वांना एका असुर-वृत्तीचे समजतों. असुरवृत्तीच्या लोकांना बाहेर काढल्यावर, आणि आमचें आम्हीं त्रिवर्गांत वर्गीकरण केल्यावर, जो गाळ राहिला आणि ज्यांत बहुधा मित्रत्वच अधिक पण प्रत्यक्ष शत्रुत्व तर नाहींच; जे 'इंद्रगोपा मदंति' त्यांना मारण्याकरितां इंद्र कसा येईल आणि त्याला बोलावील कोण?

पुढें फिरून परागति व विकास सुरू होऊन कांहीं सच्छूद्र व कांहीं असच्छूद्र बनले त्यांना बाहेर काढण्याची क्रिया बंद झाली तेव्हां त्यांजवर नुसते निर्बंध मात्र ठेवले गेले. वास्तविक शूद्र हे मूळचे हलक्या आचारविचारांचे लोक. त्यांचा समावेश तीन कारणांनीं झाला.—(१) समाजाच्या पूर्णत्वासाठीं. (२) असुरांतून सुटलेल्या लोकांना व आमच्या या नवीन वर्गांत पडण्यालायक लोकांना आधार म्हणून; कारण मळ हेतु 'विश्व सर्वं किंवा आर्य' करण्याचा (वास्तविक तो वर्गीकरणामुळें दुर्घट होत चाललाच होता.). (३) आमच्यांतील गाळ फिरून फिरून काढण्याकरितां एका वर्गाची आवश्यकता होतीच. अशा या लोकांच्या सुधारण्याकरितांच मूळ प्रयत्न होता हा नानासाहेबांचा अभिप्राय कबूल आहे. सच्छद्र हें त्या सुधारणेचें लक्षण व इष्ट फल. तेवढ्यापुरता हेतु साध्य झाला, परंतु जेथें अनवधानादि कारणांनीं वैश्य हातचा जाऊं लागला तेथें शूद्राची काय वार्ता? अर्थात्, ब्राह्मण संख्येनें कमी पडले गेले हें खास. प्रवृत्तिपरतेमुळें सर्वस्वीं सुधारणें शक्यहि नव्हतें. कांहीं शूद्रांचे ठिकाणीं कर्मनिष्ठा तर राहोच पण टवाळी दिसूं लागली तेव्हां यज्ञादि क्रियांतील त्यांचें अंग कमी करणें भाग पडलें. बुद्धीनें, शौर्यानें दास दस्यूंपरोपरीने तसे सब शूद्र नव्हते. सच्छूद्र वर चढले, द्विजवत्श्रेष्ठ झाले. असच्छद्रांतहि कांहीं राजे होऊं शकले, पण त्यांच्या राज्यांत राहूं नये अशी शिस्त मनूला घालावी लागली. आम्हांला वाटतें कीं, दास, दस्यु हीं नांवें जाऊन शूद्र हाच शब्द वापरण्यांत आला.

## वेदिक इंडेक्सकारांचें मत

It seems *certain* that *in the* ऋग्वेद *the* ब्राह्मण *is already a separate caste* differing from the warrior and the agriculturist castes. The texts regularly clai m for them a *superiority to the* क्षत्रिय *caste*....It is expressly recognised that the union of the क्षत्रिय and the ब्राह्मण is essential for complete prosperity. (इंग्लिश शब्द आमचे, हो चौथ्या मंडलांतील ऋचा आम्हीं दिलीच आहे.) Towards the common people, on the other hand, the क्षत्रिय stood in a relation of well-nigh unquestioned superiority. In the later संहिता's and the

ब्राह्मण the क्षत्रिय stands as a definite member of the social body distinct from the priest and the subject people and the slaves (!), ब्राह्मण, वैश्य and शूद्र. It is significant that राजन्य is a variant to क्षत्रिय and an earlier one. The connection of the क्षत्रिय with the ब्राह्मण *was very close.* The prosperity of the two is repeatedly asserted to be indissolubly associated especially in the relation of a king and domestic priest.

हीं विधानें ऋग्वेदेतर वैदिक वाङ्मयावरूनच करतां येतात असें नसून ऋग्वेदावरूनहि करतां येतात हें आम्हीं यापूर्वी दाखविलेंच आहे.

The caste-system is one that has progressively developed and that it is not legitimate *to* see in the ऋग्वेद the full caste-system even of the यजुर्वेद; but at the same time *it is difficult to doubt that the system was already well on its* way to general acceptance.

It is admitted by Muir that in some passages it must mean *a hereditary profession.* Moreover there are traces in the ऋग्वेद of the threefold or fourfold division of the people into ब्रह्म, क्षत्र and विश or into the three classes and the servile population.

ऋग्वेदापेक्षां यजुर्वेदांत मिश्र जातींचा उल्लेख जास्त आहे. ऋग्वेदांत मिश्र जाति अजिबात नाहींत असें नाहीं उ. कितव, वृषल, आणि भिषक् हे *मिश्र जातींचेच द्योतक आहेत आणि वृषल हा तर* अस्पृश्य देखील आहे. मिश्र जातींचें अस्तित्व चातुर्वर्ण्य पूर्णपणें अधिष्ठित झाल्याशिवाय शक्य नाहीं. त्या अर्थी ऋग्वेदकालींच तें बसून गेलें होतें; बनावयाचें राहिलेलें नव्हतें. मूर समजतो त्याप्रमाणें तें केवळ आनुवंशिक धंद्याचे स्वरूपाच नव्हतें. तें विशिष्ट गुणसंपत्तीवर आनुवंशिक व बेटीबंद होतें. मनुस्मृतींत सांगितल्याप्रमाणें धर्मतः सवर्णस्त्री आणि कामतः अनुलोम असवर्ण स्त्रियांशीं लग्नें होत असतील, परंतु अशा अनेक विवाहांची संख्या आजच्याप्रमाणेंच तत्कालींहि थोडीच असणार.

चातुर्वर्ण्याचा उल्लेख पुरुषसूक्तांतच केवळ आहे आणि तें पुरुषसूक्त १० व्या मंडलांत असून तें मंडल अर्वाचीन आहे या समजुतीवर पुष्कळांना असें वाटतें कीं, चातुर्वर्ण्य अर्वाचीन आहे. ही समजूत चुकीची आहे. त्यांतहि १० व्या मंडलांत आनुवंशिक चातुर्वर्ण्य वर्णिलेलें नाहीं. त्यामुळेंत धंद्यांच्या दृष्टीनें पडलेले चार वर्ग असे कित्येकांना भासतात. धंद्यांच्या दृष्टीचे वर्ग पडले तरी ते आनुवंशिक असतातच असें नाहीं. मूरनें ते धंद्यांचे दृष्टीनें पण आनुवंशिक असें कबूल केलें. नानाशो वैद्यांची मजल येथवर जाते कीं नाहीं कोण जाणे! वे. इ.कारांची मजल त्यांच्यांत आनुक्रमिकता किंवा अपरोत्तरता मानण्यापर्यंत जाते. चातुर्वर्ण्य ऋग्वेदकालीं बनण्यास आरंभ होऊन यजुर्वेदकालीं पूर्णावस्थेस पोहोंचलें असें वे. इ. कार म्हणतात. परंतु तें वेदपूर्वकालींच बनून राहिलें होतें, असें त्या चातुर्वर्ण्याचे जे प्राचीन मंडलांतून उल्लेख सांपडतात त्यावरून मी म्हणतों; तसेंच तें जन्मजात होतें असेंहि म्हणतों. त्यामुळेंच भिन्न जातींचा उद्भव संभवतो. चार वेदांच्या संहिता अलीकडे (सु. ५००० वर्षांपूर्वी) भिन्न भिन्न करण्यांत आल्या. त्या मूळपासून तशा नव्हत्या. त्यामुळें ऋग्वेद व यजुर्वेद यांत जें कालांतर मानतात तें चिल्ल वाटतें. तथापि जन्मजात धटीवद चातुर्वर्ण्य पातंजलिकालीन असें म्हणणें धाडसाचें आहे. पातंजलिपक्ष मान्य केला तरी तें २००० वर्षांचें आहे. आणि आमचें मत ग्राह्य ठरलें तर हें चातुर्वर्ण्य किती हजार वर्षांचें आहे हें कोणीं सांगावें? चातुर्वर्ण्यासंबंधानं आणखी पुरावा (१) पंचजन आणि (२) दीर्घतमस् ऋषींचा वंशावळ यांत पुढें येणार आहे. दरम्यान् 'जातिस्यवस्था' या आयसमाजिस्टी विपर्यासाकडे व सूरच्या अज्ञानाकडे वळूं.

---

# जन्मजात चातुर्वर्ण्यावरील आक्षेप

## 'जातिव्यवस्था' पुस्तकांतील विपर्यास

## मूर्खचें अज्ञान !!

'जातिव्यवस्था' हें पुस्तक कोल्हापूर येथील राजाराम कॉलेजचे प्रिन्सिपल डॉ. बाळकृष्ण यांनीं बाबू गंगाप्रसाद यांच्या 'कास्ट सिस्टिम' या पुस्तकाचा अनुवाद प्रो. दा. ग. लोंढे-(सदर कॉलेज) यांजकडून करवून छापलें आहे. मूळ पुस्तक आमच्या वाचण्यांत नाहीं. येथील टीका 'अनुवादा'-वरून केली आहे. पुस्तकास डॉ. बाळकृष्ण यांनीं लहानशी प्रस्तावना लिहिली आहे. त्यांत ते म्हणतात: "या पुस्तकांत जन्मनिष्ठ जातिव्यवस्था प्राचीन नाहीं असें अनेक आधारांवरून दाखविल्यावर तिची उत्पत्ति व वाढ कशी होत गेली याचें विवेचन केलें आहे." भाषान्तरद्वारा 'आर्य-समाजाच्या कामगिरीबद्दल सक्रिय सहानुभूति दाखविल्या-बद्दल' प्रो. लोंढे याचे त्यांनीं आभार मानले आहेत. उपोद्घातांत प्रो. लोंढे ईश्वर एक व मानवजातीचा जनक आहे, अथात् सर्व मानवां-मध्यें बंधुत्वाचें नातें क्रमप्राप्त होतें म्हणून व्यक्तिव्यक्तीमध्यें जन्माधि-ष्ठित भेद निर्माण करणें हें निसर्गविरुद्धच नव्हे तर ईश्वराच्या इच्छेच्याहि विरुद्ध आहे असें आर्यसमाजी व खिस्ती तरुण यांनीं जाहीर केलें आहे यांत नवल नाहीं.

जातिव्यवस्था प्राचीन नव्हे हें सिद्ध करण्याकरितां वेदांपासून तों अर्वा-चीन साहेबी ग्रंथांपुढां सर्वांचे उतारे दिले आहेत. हा प्रयत्न प्रथम मूर्खें ५० वर्षांपूर्वीच केला. मूळ पुस्तककारानें दिलेले उतारे बहुधा त्यांतूनच घेतले असावे.

या उताऱ्यांचा कच्चा विचार करण्यापूर्वी कांहीं गोष्टींचा सामान्यतः उल्लेख करणें अवश्य दिसतें, (१) असा एक काल होता कीं, त्या वेळीं जन्मजात चातुर्वर्ण्य नसावें. (२) प्रथम चातुर्वर्ण्य उत्पन्न झालें, त्यानंतर

जन्मजात चातुर्वर्ण्य उत्पन्न झालें. ( ३ ) त्यानंतरहि कित्येक वेळां वैयक्तिक गुणदोष पाहून जातिनिष्ठ वर्णांतून उत्तम, मध्यम किंवा अधम वर्णांत वर्गावर्गी होत असे. ( ४ ) परंतु पुढें या वर्गावर्गीपासून इष्ट हेतु साध्य होत नाहीं असें पाहून वर्गावर्गी बंद झाली. ( ५ ) हा सर्वच काळ फार प्राचीन आहे. यांपैकीं पहिल्या तीन गोष्टींबद्दल कोणाचा वाद असेल असें वाटत नाहीं. ४।५ बद्दल पुस्तककार किंवा अनुवादकार किंवा तत्सम लोकांचा वाद असावा असें वाटतें, व त्या गोष्टींचे बाबतींत आम्ही आपली बाजू मांडणार आहोंत. आमच्या समजुतीनें पूर्वपक्षांत ( पुस्तककाराच्या ) आलेल्या सर्व कथांचा याच उपपत्तीनें नीट उलगडा पडतो. एरवीं पडत नाहीं.

पूर्वपक्षाची समजूत अशी कीं, वेदांत पुरुषसूक्ताची १२-वी ऋचा हाच काय तो जुन्या पक्षाचा आधार.[1] पण ही समजूत किती चुकीची आहे हें आतापर्यंत दिलेल्या आधारांवरून आणि केलेल्या विवेचनावरून कोणासहि समजून आलेंच असेल. म्यूरची हीच समजूत; किंबहुना, म्यूरच्या समजुती घेऊनच, त्यांत कोठें चूक असेल किंवा त्यांवर जुन्या पक्षानें कोणतें उत्तर असू शकेल अशा शंका न घेतां, शास्त्रीजी यांनीं आपला ग्रंथ लिहिला आणि आर्यसमाजानें अनुवाद करविला आहे ! या ऋचेचा अर्थ करणारे चुकले असा आक्षेप घेतांना पुरुषसूक्ताच्या ११ व्या ऋचेच्या उत्तरार्धाचा आधार दिला आहे. पण पूर्वार्धांत

यत्पुरुषं व्यदधुः कतिधा व्यकल्पयन्

म्युर : When the Gods divided the पुरुष into how many

---

१ म्यूर म्हणतो : This celebrated hymn contains, as far as we know, the *oldest extant passage* which makes mention of the fourfold origin of the Hindu race तसेंच, मॅक्समुल्लर म्हणतो: It ( पु. सू. ) costains *the only passage* in the ऋग्वेद where the four castes are mentioned. ( इटालिक आमचे ) परंतु ही दोनहि विधानें चुकीचीं आहेत. हें पुरुषसूक्त चारहि वेदांत किंचित् फरकानें येतें. [ यजु° ( वा° ३१ ) अथर्व° ( १९·६ ) साम... ]

parts did they cut him up? त्या पुरुषाचे तुकडे पाडिले तेव्हां त्यांनीं त्याचे किती तुकडे केले? असें म्हटलें आहे. तो पूर्वार्ध कां गाळला! किंवा तिकडे दुर्लक्ष झालें! ज्यांना विभजनाचा वैदिक पुरावा पाहिजे असेल त्यांना ही ऋचा आम्ही अर्पण करतों. (२) हे वर्णभेद नसून वर्णभेद आहेत; कारण येथें सर्वांच्या जन्मकथा-या विराट् पुरुषापासून काण कोण जन्मलें याच्या कथा-येथें दिल्या आहेत. (१) तस्माद्यज्ञात्......चक्र, (८) तस्माद्यज्ञात्...
...जज्ञिरे...अजायत, (९) पद्भ्यां शूद्रो अजायत, (१२) चंद्रमा मनसो जातः चक्षुः सूर्यो अजायत। मुखादिंद्रश्चाग्निश्च प्राणाद्वायुरजायत. (१३) यावरून संदर्भ जन्माविषयींच आहे. अर्थात्, या संदर्भावरून जुन्या परंपरेचाच अर्थ बरोबर आहे; पुस्तककारांनीं दिलेला शब्दशः अर्थ चुकीचा आहे. आमच्या अर्थाला तै. सं. चा खास आधार सांपडतो तो असा:

प्रजापतिः अकामयत प्रजायेय इति। स मुखतः त्रिवृतं निरमीमत ब्राह्मणो मनुष्याणा असृजत। तस्मात् ते मुख्याः मुखतोहि असृज्यंत। उरसो बाहुभ्यां पंचदशं निरमीमीत।

अन्वसृज्यत...राजन्यो मनुष्याणाम्। इ. इ.

इतर ग्रंथ पाहिले तरी हाच अर्थ नक्की ठरतो. अर्थात् त्यांत 'श्रमविभागाचें तत्त्व अभिप्रेत' आहे कीं 'जन्मनिष्ठ जाति प्रतिपाद्य' आहेत हें उघड दिसतें! पूर्वपक्षानें उलट अनुमान काढलें आहे. पण तें सपशेल चुकलें आहे. मग "अखिल वेदग्रंथांत असा कोणताहि मंत्र नाहीं कीं जो जातिभेदाचा यत्किंचित् पुरस्कार करतो; उलटपक्षीं, वेदविद्येचा एकंदर रोख जातिभेदाच्या विरुद्ध आहे" हीं सर्व विधानें घाडसाचीं असून पोल ठरतात!!

वेदांतील दुसरें उदाहरण घेतलें आहे तेंहि चुकलेंलेच आहे. त्याचाहि विचार आम्हीं पूर्वी केलाच आहे.

कारुरहं, ततो भिषक्, उपलप्रक्षिणी नना॥ ऋ. ९.११२.३
या ऋचेच्या उत्तरार्धांत

नानाधियः वसूयवोऽनुगा इव तस्थिम इन्द्रायेन्दो परिस्रव ॥
९.११२.३

'नानाधियः' असे शब्द आहेत. त्याचा अर्थ "आपल्या आवडी-नुसार वेगळे धंदे ( १ धियः )" असा होऊं शकत नाही. "पैसा मिळविण्याच्या इच्छेने नाना प्रकारें आपली बुद्धि- या एकाच यज्ञव्यवसायांत चालवितो असा अर्थ होतो. यास्क असाच अर्थ देतात. 'धी' शब्दच बुद्धिविषयक अशा ब्राह्मणाचा धंदा सुचवितो ( ऋ. ९.३५.१६ पाहा ). या ऋचेचा खरा अर्थ आम्ही दिलेलाच आहे. तिकडे वाचकांचें लक्ष वेधतों ! येवढाच काय तो वैदिक पुरावा.

यानंतर तिसरें उदाहरण-औपनिषद् सत्यकाम जाबालीचें घेतलें आहे. पण हें उदाहरण सर्वस्वी अंगलट येणारें आहे. पाहा :

( १ ) वर्ण हा शब्द वृ=वरणें, निवड करणें यापासूनच ग्रंथकारांनीं व्युत्पादला आहे. पण त्याचा अर्थ 'धंद्याची अथवा वृत्तीची निवड असा करावा, असें उपोद्घातांत सुचविलें आहे. आतां येथें पाहावें तर जाबालाचा गुरु त्यास तुझें गोत्र काय तें विचारतो व त्यावर जाबाल म्हणतो

नाहमेतद्वेद भो यद्गोत्रोऽहम् ॥

महाराज, मला माझें गोत्र माहीत नाहीं. मी आईला विचारलें. ती म्हणाली

बह्वहं चरन्ती परिचारिणी, यौवने त्वां अलभे, सा अहम्
न वेद यद्गोत्र त्वमसि ।

"मी परिचारिणी. हिंडत होतें. यौवनांत तूं प्राप्त झालास. मला नाहीं माहीत तुझें गोत्र कोणतें तें." तात्पर्य काय, गुरु जाबालाला जन्म कोणापासून आणि त्या पित्याचें गोत्र कोणतें तें विचारतात. त्याला कोणत्या धंद्याची इच्छा अगर आवड अथवा निवड विचारीत नाहींत किंवा स्वतः ठरवीत नाहींत. प्रशानशास्त्री म्हणतात त्या-प्रमाणें हा गोत्राचा प्रश्न समावर्तनप्रसंगीं नसून विद्यारंभीं आहे. सारांश,

जन्मजात वर्णाची गुप्त चौकशी करीत असून धंद्याची करीत नाहींत. जाबालाचा गुण पाहात नाहींत, त्याचें कर्म पाहात नाहींत, त्याची आवड (inclination) विचारीत नाहींत. आणि अखेर त्याची सत्यकामता पाहून ही सत्यकामता त्याला ब्राह्मणपित्यामुळें प्राप्त झाली असें ठरवून त्याला प्रथम ब्राह्मणवर्णाचा ठरवितात व विद्या शिकवितात, असें हें उदाहरण ग्रंथकाराच्या बाजूचें आहे कीं त्यांच्याविरुद्ध आहे? आई परिचारिणी; पण बाप ब्राह्मण. मातेकडे लक्ष न देतां पितृसावर्ण्य पाहून जाबालाचा वर्ण ठरविला. असा कोणी पितृसावर्ण्यानें किंवा कोणी मातृसावर्ण्यानें वर्ण ठरवीत असें मनुस्मृतींत म्हटलेंच आहे. येथें वर्ण म्हणजे धंद्याची अगर वृत्तीची निवड केली आहे काय?

(२) उपनिषत्कारांनीं हें तत्कालीन उदाहरण म्हणून दिलें आहे कीं प्राचीन म्हणून, याचाहि ग्रंथकारांनीं विचार केलेला नाहीं आणि 'केवळ जन्मानें झालेले उच्चनीच भाव तत्कालीन समाजांत लुप्त होते' असा कांहीं तरी भरमसाट धोंडा ठोकला आहे!! ग्रंथकारांनीं स्वतःची व वाचकांची ही खोडसाळपणानें फसवणूक केली आहे. कारण

गुरु, वर्णजन्मोत्पन्न समजून, गोत्राची चवकशी करीत असतां
जन्मोत्पन्न उच्चनीच भाव तत्कालीन समाजांत लुप्त होते

असें ग्रंथकार वर्णन करतात. हा खुळेपणा कीं खोडसाळपणा?

(३) उपनिषदांतून दुसरें उदाहरण घेतलें आहे तें छांदोग्यांतील अरुणी व उद्दालकाचें!! हेंहि उपनिषत्कालीन नव्हे; फार प्राचीन आहे. ज्या वेळीं वैवाहिक बंधनें नव्हतीं, आई पतीच्या व वयांत आलेल्या मुलाच्या देखत परपुरुषाबरोबर निघून जाते आणि मुलगा रागावला असतां बाप म्हणतो कीं, स्त्रियांची अशी चालच आहे त्या 'गावस्थिति' म्हणजे पशुसमान स्थितीच्या कालांतली आहे. बाप शांत आहे, पण मुलगा संतापला आहे, आणि अखेर

आजपासून स्त्रियांचा मनुष्यधर्म मी स्थापन करतों

असें म्हणत आहे. त्या कालांतील ही गोष्ट आहे! उपनिषत्कालीं गावस्थिति प्रचारांत होती असें का ग्रंथकारांना म्हणावयाचें आहे? तसें अस-

त्यास ती त्यांची घोडचूक आहे! याचा अधिक विचार आम्ही आपल्या 'वेदपूर्व जग' या निबंधांत केला आहे, त्यावर हवाला देऊन आणि विवाहविकासांतील ही दुसरी पायरी वेदपूर्वच आहे असें सांगून पुढें चालतों. अशा प्राचीनतम काळीं "ब्राह्मण मानहानि न मानतां क्षत्रियांकडे विद्यासंपादनार्थ जात" असें ग्रंथकारांना म्हणावयाचें असलें तर फारच उत्तम! इतक्या प्राचीन कालीं ब्राह्मण व क्षत्रिय वर्ण जन्मानें उत्पन्न झाले होते ही गोष्ट त्यांना कबूल आहे असें तरी मानतां येईल. असें हे वर्ण कीं जन्मजात वर्ण याचाहि यांत उलगडा होतो. सत्यकाम अद्याप विद्यार्थी आहे, धंद्याला लागला नाहीं, तरी तो ब्राह्मण आहे. अर्थात् जाबालाप्रमाणें तो जन्मजात ब्राह्मण आहे आणि राजाहि जन्मजात क्षत्रिय आहे. विद्या शिकवितो म्हणून ब्राह्मण असें ग्रंथकार अगर उपनिषत्कार मानीत नाहींत. हें उदाहरण काय ग्रंथकारांच्या बाजूनें कीं उलट? हा खुळचटपणा कीं खोटसाळपणा हें वाचकांनीच ठरवावें.

झाला; वैदिक वाङ्मयांतील पुरावा संपला. आतां महाभारतांतर्गत पुरावा पाहूं. त्याचीहि हीच रड! मूळ ग्रंथकारांनीं पुराव्यांची छाननीच केली नाहीं. त्यांना अगर अनुवादकांना काटेकोरपणाच नाहीं. बहुधा मूरनें लिहिलें आणि त्यांनीं अंधपणानें स्वीकारलें. मूरला त्यांतील खाचाखोंचा कळतील तर यांना कळायच्या! महाभारतातील पुराव्याचाहि आम्हीं पूर्वीच विचार केला आहे. भृगुभारद्वाजसंवादांतील आणि यमधर्मसंवादांतील वचनें पूर्वपक्षाच्या कितपत उपयोगी पडणार? केवळ मास आणि अज्ञान यांत वर्णोत्पत्तीची कथा सांगितली आहे. ती अशी :

सर्वं ब्राह्ममिदं जगत् ।
ब्रह्मणा पूर्वसृष्टं हि कर्मणा वर्णतां गतम् ॥

मूळ एकच वर्ण. त्याला 'ब्राह्म' किंवा 'ब्राह्मण' (ब्रह्ममय हा अर्थ सुचविणारें पुढील 'द्विजाः क्षततो गताः' यावरून उघड आहे.) म्हणावयाचें. मूळ सर्वच ब्राह्मण. पण पुढें

कामभोगप्रियाः तीक्ष्णाः क्रोधनाः प्रियसाहसाः ॥

त्यक्तस्वधर्माः रक्तांगाः ते द्विजाः क्षत्रतां गताः ॥

ते द्विज-येथें द्विज म्हणजे केवळ सत्वगुणोपेत ब्राह्मण. कारण त्या वेळीं क्षत्रिय अगर वैश्य नव्हतेच उत्पन्न झाले-स्वधर्म सोडून म्हणजे पूर्वीचा सात्त्विक स्वभाव आणि निवृत्तिप्रधान धर्म सोडून रजोगुणी ( रक्तांगाः ) झाले. अर्थात् प्रवृत्तिधर्मांत आले आणि क्षत्रिय बनले. कारणें अनेक असतील. असुरांतून निघाल्यामुळें आणि असुरांच्या द्रोहामुळें ब्राह्मणांना स्वसंरक्षणाची जरूरी भासूं लागली तेव्हां ब्रह्मणरक्षणार्थ त्यांतल्याच कांहीं-ब्राह्मणांना क्षात्रधर्माचा पुरस्कार करावा लागला, हीच प्राचीन परंपरेची कथा सत्य आहे व तीच येथें दिली आहे. त्यांतच आम्ही म्हणतों, ती प्रवृत्तीहि दर्शविली आहे. मूळचीं निवृत्तवृत्तीचीं माणसें पण आतां कामभोगप्रिय, क्रोधन आणि साहसप्रिय झालीं. निवृत्तींतून प्रवृत्ति म्हणजे Evolution नसून Devolution आहे हाच जगाचा नियम आहे. जे ब्राह्मणच राहिले त्यांचा Evolution-विकास-झाला. बाकीचे अपकर्षांत झाले. मूळचे 'अक्रोधन' आतां 'क्रोधन' बनले. मूळचे निवृत्त आतां कामभोगप्रिय झाले, मूळचे सौम्य आतां तीक्ष्ण झाले. अक्रोधन व सौम्य असतांना ते सर्वस्वीं यशस्वर होते. क्रोधन व तीक्ष्ण झाल्यावर यशस्वरता कमी झाली. त्यामुळें त्यांचें यज्ञांतील स्थान गेलें. त्यांनीं क्रोध व तत्सदृश वेष टाकला तेव्हां त्यांना यज्ञस्थान मिळालें असा ऐतरेय ब्राह्मणांतील कथेचा अर्थ वाटतो ( चांदेकर म्हणतात तसा नव्हे. ). याप्रमाणेंच कोणी वैश्य-समाजरक्षणार्थ-व कोणी शूद्र बनले व

इत्येतैः कर्मभिर्व्यस्ता द्विजा वर्णांतरं गताः ॥

अर्थात्, कर्म ( निवृत्तिपर ) सोडल्यामुळें हीन वर्णाला पोंचले. आणि ( शुद्धाचे ) रक्तपीत व कृष्ण बनले असेंहि येथें म्हटलें आहे. असे हे स्वधर्म असूं शकतील काय ? पुढें यांत एक महत्त्वाची गोष्ट सांगितली आहे त्यामुळें या प्रश्नावर चांगलाच प्रकाश पडतो.

धर्मो यज्ञक्रिया तेषां नित्यं, न प्रतिषिध्यते ।
इत्येते चतुरो वर्णा येषां ब्राह्मी सरस्वती ।
विहिता ब्रह्मणा पूर्वं लोभात् अज्ञानतां गताः ॥

या सर्वांचा धर्म नित्ययज्ञक्रिया. निषेध नव्हता. असे हे चार वर्ण. ब्राह्मी सरस्वती ही यांची होती. ब्राह्मी सरस्वती म्हणजे वेद किंवा विद्या. परंतु लोभामुळे हे अज्ञानदशेला पोहोंचले. लोभ = प्रवृत्ति, ऐहिक आकांक्षा वाढल्यामुळे वेद व विद्या त्यांनीं घालविली ( भ. गीता १४.१२ ). "धर्म व यज्ञक्रियांचा शूद्रावरयेत व अज्ञानावरयेत देखील त्यांचा अधिकार होता" हा केवळ विपर्यास आहे. कर्माची जबाबदारी आहे ती लायकीवर असते, केवळ इच्छेवर नसते. आणि इच्छा तरी कोठें होती ?

सर्वभक्षरतिः नित्यं सर्वकर्मकरः अशुचिः।

त्यक्तवेदः तु अनाचारः स वै शूद्र इति स्मृतः ॥

हा श्लोक ग्रंथकारांनीं उद्धृत केला आहेच. त्यांतील 'त्यक्तवेदः' — ज्यांनीं वेद टाकले, ज्यांनीं भक्ष्याभक्ष्य, कर्माकर्म आणि शौचाशौच टाकलें म्हणजे विधिनिषेध टाकले, नित्य वाटेल तें भक्षणार, वाटेल तें कर्म करणार, आणि वाटेल तसें वागणार ( वरील श्लोकाचा पूर्वार्ध ) त्यांना यज्ञाचा अधिकार आहे, निषेध नाहीं, असें सांगण्याचा भारतकारांचा उद्देश आहे कीं ग्रंथकार वाचकांना त्यांचा हेतु सांगण्याचा आव घालून फसवीत आहेत बरें ! या वेळीं जाति जन्मजात नव्हत्या असें सांगण्याकरितां

न वै शूद्रो भवेच्छूद्रो, ब्राह्मणब्राह्मणो न च ।

हें वचन भारतकारांनीं सांगितलें आहे काय ! शूद्र हा शूद्र नव्हे म्हणजे काय ? जन्मजात शूद्र आहे तो वास्तविक शूद्र नव्हे, असाच ना सांगणाराचा आशय ! या श्लोकाचें अनुवादकारांना भाषांतर करण्याचें धैर्य कां झालें नाहीं हें सांगावयास नकोच. अशा या विवेचनपद्धतीनें वाटेल ती गोष्ट चुटकीसरशी सिद्ध होऊं शकेल. वास्तविक येथें दिलेलीं लक्षणें ब्राह्मण वगैरेंचीं आहेत, ब्राह्मण वगैरेंचीं नाहींत.

यानंतर मनुस्मृतींतील पुरावा घ्या. पण पद्धति सर्वत्र एकच; म्हणजे विरुद्ध गोष्टींचा विचारच टाळावयाचा किंवा भलताच अर्थ करावयाचा. आम्ही स्पष्ट सांगतों कीं, हा पुरावा देखील अनुवादकाराच्या विरुद्धच आहे.

विप्रांत अत्यंत ज्ञानी, क्षत्रियांत सर्वांत वीरश्रेष्ठ, वैश्यांत सर्वांत अधिक धनधान्यसंपन्न आणि शूद्रांत कुलवान् असेल तो श्रेष्ठ असें पहिला श्लोक

सांगतो. हा श्लोक पूर्वपक्षाला यत्किंचितहि अनुकूल नाहीं. श्लोक जर खालीं दिलेल्याप्रमाणें असता म्हणजे

नराणां ज्ञानतो वैप्र्यं क्षत्रियत्वं तु वीरतः ॥

वैश्यत्वं धान्यधनतः शूद्रत्वं जन्मत, एव च (किंवा गुणहीनत्वत)

तर पूर्वपक्षाला अनुकूल खरा. ज्ञान असेल तरच विप्र वीर असेल, तरच क्षत्रिय धनधान्यसंपन्न असेल, तरच वैश्य आणि दुसरा कांहींच गुण नसेल तर शूद्र (चातुर्वर्ण्यांत एवढाच गुण आहे तो श्लोक घेतला तर जन्मतः श्रेष्ठत्व येतेंच, पण प्रकृष्ट गुणवान् असेल तो त्या सर्वांत श्रेष्ठ इतकाच अर्थ होतो.) शूद्राला देखील जन्मानें श्रेष्ठत्व, मग इतरांची गोष्ट कशाला? पहिले तीन वर्ण द्विज, शूद्र एकजन्मी. इतरांना संस्कार आणि विहित कर्मे आहेत, शूद्राला नाहींत. म्हणून जन्मतः जो शूद्र तोच शूद्र असें सांगितलें आहे.

(२) दुसरा श्लोक घ्या. 'द्विज-ब्राह्मण-असून वेदार्थ श्रम न करतां इतरत्र करतो (उ. विणकरपणा) तो सान्वय शूद्र होतो.' सान्वय = संततीसह. जन्मतः वर्ण नसेल तर तो द्विज कसा? वृत्तीनें द्विज असेल तर वेदार्थ श्रम न करतां इतरत्र करतो असें म्हणतां येईल काय? अन्वय म्हणजे परिवार असा अर्थ घेऊन कसा भागेल? कारण वृत्ति व्यक्तिनिष्ठ आहेत. पण सान्वय = संततीसह असा सामान्य अर्थ नव्हतो, म्हणूनच टाकला ना? पणि 'परिवारासह' म्हटलें तरी नव्हतोच! हें दृष्टांत आलें नसेल तर अपात्रता आणि दृष्टांत असेल तर!

गुणानें द्विज किंवा शूद्र असेल तो शूद्र किंवा द्विज कसा होईल? जन्मतः असेल तोच होऊं शकेल. वेदाध्ययन न करतां गुणानें द्विज होऊं शकेल तरी कसा? आतां पुढील श्लोक घ्या:

(३) शूद्रो ब्राह्मणतां याति ब्राह्मणश्चैव शूद्रताम्।

क्षत्रियाज्जातं एवं तु विद्यात् वैश्यात्तथैव च ॥

द्वितीयार्धांत क्षत्रियापासून जन्मला असेल तोच क्षत्रिय आणि इतर तसेंच असें म्हटल्यावर राहिलें काय? जन्मतः मिळालेल्या वर्णाचे गुण नसतील तर तो हीन वर्णाचा असाव ना याचा अर्थ? पण मग जन्मतः

वर्ण आहे ही गोष्ट कबूल करण्यावाचून गत्यन्तर नाहीं याची वाट काय ? ब्राह्मणता = ब्राह्मण्य प्राप्त होतें याचा अर्थ ब्राह्मण होतो असा नव्हे. तुकाराम सदेह स्वर्गास जाण्याइतका मोठा झाला, त्याला ब्राह्मण्य प्राप्त झालें, पण तो ब्राह्मण झाला नाहीं. कारण, खालील क्षत्रियाप्रमाणेंच ब्राह्मण जन्मानें होतो.

आतां वर्णाच्या अपरोत्तरतेसंबंधानें पाहतां म्हणजे ब्राह्मणाचा शूद्र किंवा शूद्राचा ब्राह्मण होतो, याचा अर्थ इतकाच कीं, तो अवर ब्राह्मण होतो किंवा 'भिक्षुया धारण करणारा क्षत्रिय होतो' इ. इ. भिक्षुया, क्षत्रियत्व धारण करणारा म्हणजे ( १ ) जन्मजात क्षत्रिय नसतां क्षत्रिय म्हणविणारा, किंवा ( २ ) जन्मजात क्षत्रिय असूनहि त्याचे ठायीं वीर्य नाहीं असा. शूद्राला ब्राह्मणता येते म्हणजे त्याला ब्राह्मण म्हणूं लागतात व ब्राह्मणसमाजांत समाविष्ट होतो असा अर्थ नव्हे. दर पिढीला वर्ण बदलतो किंवा वर्णांचा विचार करावा असा कोठें आधार असेल तर गोष्ट वेगळी.

आपस्तंबसूत्रांतील श्लोकांत देखील 'जाती'चा उल्लेख आहेच. जाति म्हणजेच जन्मतः प्राप्त होत असलेली. जातिपरिवर्तन होतें असें येथें म्हटलें आहे; तथापि तें केव्हां, कोणत्या परिस्थितींत होतें हें येथें सांगितलेलें नाहीं. याज्ञवल्क्य स्मृतींत सात पिढ्यांपर्यंत स्त्रियांचीं लग्नें पित्याच्या उच्च वर्णांमुळें उच्च वर्णांत झाल्यास जाति बदलते असें म्हटलें आहे. तसाच हा प्रकार दिसतो. तथापि अनुलोमविवाह बंद झाल्यावर हें जातिपरिवर्तन बंद झालें. अनुलोमविवाह व जातिपरिवर्तन बंद झालें तें कां, याचा विचार पुढें करणार आहों.

## पुराणांतर्गत पुरावा

हे आधारहि आतांपर्यंतच्या आधारांप्रमाणेंच कच्चे आहेत. जन्मजात जाति व्यवहारांत होत्या हें प्रत्येक श्लोकावरून उघड होतें.

( १ ) यांतील दोन अर्थ परस्परविरुद्ध आहेत. वर्णाभिव्यंजक लक्षण एकदां सांगितल्यावर तें जेथें दिसेल तेथें तो वर्ण म्हणावा असें सांगितल्यावर 'यदन्यत्रापि दृश्यते' असें म्हणणें अशक्य आहे. याचा अर्थच असा कीं, जन्मजात वर्ण असूनहि व्यक्तिनिष्ठ अपरोत्तरता असूं शकेल.

अनुवादक म्हणतात, 'एखाद्याच्या ठिकाणीं अन्य वर्णाचीं लक्षणें असतील तर...' हा अर्थ बरोबर असेल तर त्याचा मूळ वर्ण व्यवहारांत जन्मजात असून तो मानूं नये असा अभिप्राय आहे. पण जन्मजात वर्णच व्यवहारांत होता हें निःसंशय.

( २ ) पंचलक्षणी मनुष्याला ब्राह्मण म्हणावें असा वक्त्याचा अभिप्राय आहे; पण लोकाचार तद्विरुद्ध असल्यामुळेंच ना हा अभिप्राय सांगण्याची पाळी आली ? वास्तविक हीं लक्षणें ब्राह्मण्याचीं आहेत. ब्राह्मण जन्मानें होतो आणि वृत्तीनेंहि होतो, ही गोष्ट उदाहरणांनीं सिद्ध करूं. खरा न्यायाधीश होण्याला अमुक गुणांची आवश्यकता आहे, असें सांगितल्यावर न्यायाधिशाचे स्थानावर बसलेल्या प्रत्येक मनुष्याचे ठिकाणीं ते आढळून येत नाहींत हा अनुभव सर्वत्र आहे. सिंहासनाधिष्ठित प्रत्येक मनुष्याचे ठिकाणीं—मग तो स्वतः राज्याधिकारी झालेला असो वा वडिलार्जित गादी असो—राजाचे गुण नसतात. वैद्याचा धंदा करणारे पुष्कळसे वैदू ( quacks ) असतात. अशीच जन्मतः प्राप्त होत असलेल्या वर्णांत गुणांमुळें असंरोचरता दिसून येते. ही गोष्ट वेदांतहि आढळून येते. तसाच हा प्रकार. असा प्रत्येक वेळीं वर्णपरिवर्तन होतें असा पुरावा पाहिजे. किंबहुना, कुटुंबांतील प्रत्येक व्यक्तीचा वर्ण भिन्न असून तो ठरविण्याचा काळ निश्चित पाहिजे आणि तोहि वारंवार बदलण्याची शक्यता पाहिजे. खरा ब्राह्मण तोच, कीं जो पंचलक्षणसंपन्न असेल; इतर ब्राह्मणजाति ब्राह्मण, नामब्राह्मण किंवा ब्रह्मबंधु हें तत्त्वतः कबूल; पण व्यवहारांत ? फक्त जातिब्राह्मणच.

( ३ ) या श्लोकांत हेंच सांगितलें आहे कीं, 'खरा ब्राह्मण क्रियेमुळें—आचारामुळें—होतो; केवळ जातीनें किंवा कुलानें होत नाहीं. चांडाल उत्तम आचरणाचा, ब्राह्मण्यलक्षणाचा असेल, तर तोहि ब्राह्मणच म्हणावा. पण मूळ तो चांडाल कसा झाला ? जन्मानेंच ना ? त्याला ब्राह्मण म्हणावें हा वक्त्याचा अभिप्राय व्यवहारांत चालू असता तर असें सांगण्याची पाळीच आली नसती.

( ४ ) न जातिर्दृश्यते राजन् गुणाः कल्याणकारकाः ।
गुण हे कल्याणकारण, केवळ जाति म्हणजे विशिष्ट कुलांत जन्म कल्याण

कारक नव्हे. ही गोष्ट नाकबूल कोण करील? हाच देवांचा अभिप्राय ही वक्त्याची समजून, तसें असावें ही वक्त्याची इच्छा म्हणून.

(५) या श्लोकांत 'जाति' आणि 'गुणकर्म' यांचा विरोध दाखविला आहे. ग्रंथकाराचा हा अभिप्राय. ग्रंथ कांहीं स्मृतितुल्य नाहीं.

अब्राह्मणांना ब्राह्मण केल्याचीं उदाहरणें

(१) सत्यकाम जाबाल: हा जातीनें ब्राह्मण नव्हता असें सिद्ध झालेलें नाहीं. आई परिचारिणी. पण जाबाल 'सत्यकाम' दिसला तो पितृसावर्ण्याचा गुण मानून गुरूनें ब्रह्मविद्या शिकविली. कोणी वर्ण पितृसावर्ण्यानें मानीत तर कोणी मातृसावर्ण्यानें मानीत (आईबाप भिन्न असतील तेथें मनुस्मृति). अनुलोमविवाह बंद झाल्यावर या भेदानें कारण राहिलें नाहीं.

(२) ऐतरेय कवष—ऐतरेय ब्राह्मणाचा कर्ता हा दासीपुत्र.

दास्याः पुत्रः कितवः अब्राह्मणः। कथं नो मध्ये दीक्षिष्ठेति। असें ब्राह्मण म्हणूं लागले, यावरून व्यवहार असाच होता हीच गोष्ट सिद्ध होत नाहीं काय? कवषाची पुढें परीक्षा घेऊन तो आत्मविद् ठरल्यावर ब्राह्मणांत बसूं लागला. ही गोष्ट जाबालाच्या कथेप्रमाणेंच आहे.

घटकाभर असें समजूं कीं, व्यक्तिनिष्ठ गुण पाहून त्याची जाति बदलीत असत. परंतु सर्वांस नियम काय? हीं उदाहरणें केवळ अपवादात्मक नव्हतीं तर यांचा असा उल्लेख झालाच नसता. वसिष्ठविश्वामित्रांचें भांडण ब्रम्हत्त्या समजुतीनें जात्युत्कर्षाकरितांच होतें ना? तरी पण वरील उदाहरणें विनवोभाट घडून आलीं? उलटपक्षीं हीं विनबोभाट तर पुढें फिरून निषेध कधीं व कसा उत्पन्न झाला? तो सकारण कीं अकारण? अपवादामुळें नियमांचीच सिद्धि होते.

आतां अशी कल्पना करूं कीं, पूर्वी अशीं जातिपरिवर्तनाचीं अपवादक उदाहरणें दिसून येतात; परंतु मागाहून तसें करण्याचें बंद झालें. तेव्हा प्रश्न असा कीं, अशी बंदी केली ती तरी कां? चुकीनें, लुच्चेगिरीनें कीं सकारण? ग्रंथकाराचा अभिप्राय असा कीं, ती सकारण नव्हे. त्यावर आमचें उत्तर असें कीं, सकारण. व्यक्तिनिष्ठ अपवादक गुण संततींत सहसा उतरत नाहींत, असे दिसून आल्यावरून आणि असल्या परिवर्तनामुळें

समाजांत अनवस्था उत्पन्न होते म्हणून ही बंदी करण्यांत आली. असाच अनुभव आजच्या शास्त्रज्ञांना आलेला आहे. ग्रंथकारांना या अनुवादकांना हा नियम माहीत नाहीं म्हणून ते निष्कारण दूषणें देत आहेत. या नियमामुळेंच जाति जन्मनिष्ठच ठरवाव्या लागतात व अपवादक गुण सोडावे लागतात. अपवादक गुणांमुळें अधरोत्तरता ठरवूं लागल्यास दुहेरी नुकसान होतें. म्हणजे त्या अपवादक गुणांच्या त्या मूळ जातीला उपयोग होत नाहीं आणि परिवर्तित जाति मात्र हीन होऊं लागते. कारण, त्यामुळें मूळ जातींतील बुद्धिमानांचें प्रमाण कमी होतें आणि परिवर्तित जातीला त्यापासून कांहीं फायदा होत नाहीं, उलट तोटा होतो; कारण सृष्टीचा असा नियम आहे कीं, कनिष्ठ दर्जाचा मनुष्य वरिष्ठाला खालीं ओढीत असतो.

केसरलिंग म्हणून एका पाश्चात्य थोर विद्वानानें विवाहावर अनेक निबंध मागवून ते छापले आहेत (Book of Marriage). त्यांत त्यानें वरवधूंच्या निवडीसंबंधानें स्वतःचा एक निबंध छापला आहे. त्यांत तो म्हणतो:

या जगांत The lower tends to pull down the higher...It leads to personal deterioration and proves a cultural retrogression for the human race. म्हणजे खालचा वरच्याला खालीं ओढतो. त्याचा परिणाम वैयक्तिक परागतींत होतो आणि मनुष्यजातीची व त्यांच्या संस्कृतीची विच्छेहाट होते. तर मग मनुष्याची प्रगति व विकास होण्याचा मार्ग कोणता ? तो म्हणतो:

*The most rigorous selection can alone save the mankind from an irredeemable deterioration.*

*Statistics* have *too clearly shown*, that *not only intllectual but also moral endowments are hereditary.* म्हणजे अत्यंत कडक निवड केली तरच मनुष्याचा अपरिवर्तनीय ऱ्हास थांबूं शकेल. आंकडेशास्त्रानें असें फारच स्पष्टपणें सिद्ध केलें आहे कीं, नुसते बैदिकच नव्हे तर नैतिक गुण देखील आनुवंशिक आहेत.

अलीकडील लोकांना हे नियम कबूल नसल्यामुळें पाश्चात्य देशांतील लोकांचा निःसंशय ऱ्हास झाला आहे व होत आहे. आपणा हिंदी लोकांची याचे उलट समजूत आहे. म्हणून केसरलिंगाचा अभिप्राय विशेषतः वाचनीय आहे. तो म्हणतो:

Without doubt during the course of history *mankind* has certainly *not improved but actually deteriorated* both from a psychological and physical point of view.

Everywhere the classes with the best spiritual and moral endowment have irresistibly died out. Either they had to face greater dangers or spent themselves in other way.

In olden times it was principally the nobility which was extremely vital. Today the opposite is true. The tremendous increase of population in Germany *during the last hundred years have multiplied principally the inferior stock* so much so that *the type of the great old times is rarer than old Red Indians* in North America.

याचा आशय: ऐतिहासिक कालांत मानवजाति सुधारली तर खास नाहीं, पण खास अवनतावस्थेला–शारीरिक व मानसिक अशा दोनहि दृष्टींनीं–पोंचली आहे. जिकडे तिकडे धार्मिक व नैतिक गुणयुक्त अशीं उत्कृष्ट माणसें प्रतिकार अशक्य होऊन नाहींशीं झालीं आहेत. त्यांच्यावर फार मोठीं संकटें आलीं किंवा दुसऱ्या कोणत्या तरी रीतीनें त्यांचा निकाल लागला.

प्राचीन काळीं विशेषेकरून वरिष्ठ दर्जाचीं माणसें विशेषतः संतानयुक्त असत. आज पाहावें तर त्याचे उलट स्थिति आहे. जर्मनींतील गेल्या शंभर वर्षांतील लोकसंख्येची वाढ मुख्यतः हलक्या प्रतीच्या लोकांत आहे–इतकी कीं, प्राचीन काळचा नमुना उत्तर अमेरिकेंतील ताम्र लोकांपेक्षांहि कमीच आहे.

असा हा परिणाम कशानें घडून येत आहे? तो म्हणतो : " क्रियेक वतके युरोपांतील बहुतेक देशांतील लोक समवर्ग स्त्री पाहूनच विवाह करीत. म्हणजे भिक्षुक, वकील व सैनिक आपआपल्या वर्गांतलीच वरवधू पाहात. त्याचा परिणाम असा झाला कीं, त्यांची प्रजा म्हणजे विशिष्ट वर्णांचीच उत्पन्न झाली (they have become types). सरदार घराण्यांतले विवाह असेच होत; म्हणजे आपल्या बरोबरीच्या दर्जाच्या लोकांतूनच वधूवरनिवड होई. पौर्वात्य देशांत तत्त्वज्ञानी, कवि आणि धंदेवाले लोक असेंच करीत. (पण) आतां पाहावें तों मोठमोठे लोक आपल्या दर्जाची मुलगी क्वचितच पाहतात. त्यांनीं आपल्या दर्जाच्या मुलींशींच विवाह केले असते तर, जरी अपवादक असे गुण तगले नसते—अपवादक गुण फार कालपर्यंत टिकत नसतात, कारण त्यांतील शारीरिक मूलभूत द्रव्याला जें tension लागत असतें तें सृष्टिक्रमांत शाश्वत स्वरूपानें राहूं शकत नाहीं[१]— तथापि सामान्य संस्कृतीला जो अवश्य गुण लागतो तो म्हणजे वरिष्ठपणाची इयत्ता टिकून राहते. सारांश, एखाद्या अपवादात्मक गुणांच्या मनुष्याला वरच्या वर्णांत घेतल्यानें कांहीं उपयोग होत नसतो. संस्कृति टिकवावयाची असेल तर वर्ण उत्पन्न करून त्या त्या वर्णांतील लोकांनीं आंतर किंवा समवर्णविवाहच केले पाहिजेत. तेच विवाह वर्ण टिकवूं शकतात. अर्थात्, वर्ण म्हणजे विशिष्ट उद्योग करणारांचा वेगळा संघ, ज्यांत समवर्णविवाहानें विशिष्ट व शारीरिक, मानसिक व नैतिक गुण उत्पन्न करण्यांत येतात तो (type of men).

आतां कोणी असें म्हणेल कीं, जन्मसिद्ध वर्णांत जर त्या त्या वर्णांचे

---

१ मूळ वाचल्यास समजूत अधिक पटेल म्हणून तो देतों. If they had done this although the exceptional endowments could not be preserved—it cannot be preserved for a long time as it requires as its physiological base a state of tention which the nature cannot support as a permanent condition—the one thing essential to general culture could be retained i. e., the standard of superiority.

गुण उतरतात तर नामब्राह्मण कसे उत्पन्न होतात आणि उलटपक्षी शूद्रांत ब्राह्मण्यगुण कसे उत्पन्न होतात ? एखाद्या पुरुषांत कांहीं अपवादक गुण उत्पन्न करणें हा जसा एक सृष्टीचा खेळ किंवा natural selection चा प्रकार आहे, त्याचप्रमाणें एखादी व्यक्ति गुणहीन उत्पन्न करणें हा देखील तिचा खेळच होय. वास्तविक एखाद्या व्यक्तीवरून समाजाचे नियम ठरवावयाचे नसतात; ती व्यक्ति अपवाद म्हणून सोडूनच द्यावयाची. परंतु त्यांतहि विचार करील त्यास काय दिसून येतें ? याविषयीं शास्त्रज्ञ उत्तर देतात तें असें : वाल्टर हा आपल्या जेनेटिक्स या ग्रंथांत म्हणतो : A genius must be born of potential germ plasm. *There are no self-made men.* Each has within from his *ancestry* the *potentiality* of whatever he becomes. No amount of faithful plodding application can compensate for the lack of divine heredity at the start. केसरलिंग म्हणतो : Nature appears to produce *talented people and geniuses in proportion to the cultured heritage* distributed in the population. The requisite ferment...is transmitted through *the female and not the male.* ( इटालिक आमचें ).

सारांश, एखाद्या वर्णांत अलौकिक बुद्धिमत्तेचीं माणसें उत्पन्न होतात तीं त्या वर्णांत जी संस्कृति आनुवंशिक पद्धतीनें अवतरलेली असते तीवर अवलंबून आहे. त्याकरितां जें विपाकक्रियात्मक द्रव्य लागतें तें स्त्रीकडून मिळत असतें, पुरुषाकडून नसतें; हें खरें असेल तर स्त्रिया स्ववर्णांच्याच असण्याची खबरदारी घेणें अत्यवश्य होय.

### स्त्रीषु दुष्टासु वार्ष्णेय जायते वर्णसंकरः

असें अर्जुन म्हणतो, त्यांतील तथ्य केसरलिंगाच्या उताऱ्यावरून स्पष्ट दिसून येतें. वाल्टर तर म्हणतो कीं, कोणीहि स्वपराक्रमानें मोठा होत नसतो. त्या त्या वर्णांत जें स्वसामर्थ्ययुक्त बीज ( किंवा चैतन्य – germ plasm ) असतें त्यांतून तो उत्पन्न होत असतो. हें सामर्थ्ययुक्त बीज आनुवंशिक

गुणांनीं वाडवडिलांपासून प्राप्त होतें व त्या योगानेच ती व्यक्ति हा विप्राक होय. सुरुवातीलाच जर असें उत्तम बीज प्राप्त न होईल तर मनुष्य कितीहि प्रयत्नशील असो, त्याला मोठें होतां येणार नाहीं. आपल्याकडे जी 'बीजशुद्धीची कल्पना' आहे तीच येथें दिलेली आहे. पित्यानुपित्या भक्तिभावांत रमल्या तेव्हां कोठें महाराष्ट्रांतील साधुपुरुष उत्पन्न झाले, असें जें आपण पाहतों त्याचा अर्थ हाच. मात्र साधुपुरुषांना जें विशेष चैतन्य व विकास दिसतो तो त्यांच्या वंशजांत दिसेलच असें नाहीं. कारण तें असाधारण वैशिष्ट्य होय. समाजांत शिवाजीचें शौर्य (वर्णगुण) आलें पण त्याचें धोरण व राजनीतिनिपुणता आली नाहीं. यासाठींच शाश्वत असे कुलधर्म व जातिधर्म असतात ते पाळावयाचे आणि तदनुकूल असे नवे नवे गुण त्या त्या जातींत वाढीस लावावयाचे. तसेंच व्यक्तिनिष्ठ जे दोष दिसतात ते निर्मूल करण्याचा प्रयत्न करावयाचा. यासाठींच केसरलिंग म्हणतो,

The most rigorous selection can alone save mankind from an irredeemable destruction. अधःपात टाळावयाचा असेल तर अत्यंत कसोटीनें निवड केली पाहिजे.

असो. मुद्दा असा कीं, वैयक्तिक गुणाला भाळून त्याचा वर्ण चढविणें किंवा दोषाची हकाटी करून वर्णांतून उतरविणें या दोन गोष्टी ग्रंथकार व अनुवादक चांगल्या समजतात, आणि अशी पद्धति चालू होती तें सुवर्णयुग समजतात तें केवळ अज्ञान होय. बीजशुद्धि स्त्रियांचे बाबतींत विशेष चिकित्सक बुद्धीनें पाहण्याची आवश्यकता असल्यामुळें जाबाल, सत्यकाम किंवा ऐतरेय यांचे बाबतींत जी गुरूंनीं किंवा ब्राह्मणांनीं हरकत घेतली ती योग्यच होती. व्यक्तिनिष्ठ गुणांनीं—ते पितृगत समजून—जाबालाचा किंवा ऐतरेयाचा समावेश झाला तो अपवाद म्हणून. तथापि शास्त्राची प्रगति होऊन निरीक्षण वाढून किंवा अनवस्था होऊं लागली म्हणून हे अपवाद कळेल हें योग्यच झालें. हा समाजशास्त्रदृष्ट्या विकास ( Evolution ) असून ही अधोगति नाहीं, असें आजचें समाजशास्त्रज्ञांनीं तसेंच वनस्पतिशास्त्रज्ञांनीं हजारों प्रयोग करून ठरविलें आहे. त्यामुळें आमचे जुने सिद्धांत शास्त्रीय कसोटीस उतरले आहेत व ते नियम सोडून आम्ही वर्णसंकर करूं पाहूं

तर आमचे विशिष्ट गुण जातील आणि अधिकाधिक दोष मात्र येतील. ऐतरेय ब्राह्मणापर्यंत जी व्यक्तींची चढउतार होत होती त्याचा काल कोणता? या प्रश्नाचें उत्तर देण्याची आवश्यकता नाहीं. तथापि ब्राह्मणग्रंथ हे वेदोपबृंहणार्थच असल्यामुळें त्यांचा काळ ४।५ हजार वर्षांच्या तरी पूर्वीचा. इतक्या प्राचीन कालापासून ही उत्तम व्यवस्था चालत आली आहे. ती मोडून समाजाचा नाश करण्यास कोणी प्रवृत्त होऊं नये. त्या व्यवस्थेस कांहीं दोष आढळले तर ते दुसऱ्या कांहीं युक्तीनें टाळण्याचा प्रयत्न करावा हें उत्तम; पण मूलें कुठारः असें करूं नये.

कोणी म्हणेल कीं, 'तं देवा ब्राह्मणं विदुः' विशिष्ट गुणयुक्त मनुष्यालाच देव ब्राह्मण समजतात.' यावरून हीच अधोत्तरतेची पद्धति तत्कालीं चांगली वाटली असा भारतकारांचा अभिप्राय नव्हे का? नव्हे. यम आणि धर्म यांच्या संवादांत यम ही व्यक्ति पूर्वपिढी दर्शविते आणि धर्म ही व्यक्ति अलीकडील पिढी दर्शविते. या दोघांमध्यें जी या विषयाची चर्चा झाली ती तत्कालीं या विषयासंबंधानें विशेष विचार चालू होता असें दर्शविते. देवांमधील नियम उत्तम असा अर्थ नाहीं. देव-प्राचीन लोक. त्यांच्या कित्येक चाली आर्यांनीं वाईट म्हणून त्याज्य ठरविल्या. उ. बंधुभगिनीविवाह. प्राचीन लोक सर्वच रानटी लोक नग्न स्थितींत हिंडत व व्यवहार करीत होते म्हणून ती स्थिति तेवढ्यामुळेंच उत्तम असें कोणी प्रतिपादूं शकणार नाहीं. नग्न स्थितीचे फायदे असतील ते अनुभवावे, पण ती केवळ प्राचीन म्हणून नव्हे. सारांश, देवांचे नियम म्हणून उत्तम नव्हेत. ते चांगले म्हणून ठरले पाहिजेत.

असो. तर आयाल, ऐतरेय, पराशर, व्यास, वसिष्ठ, विश्वामित्र हीं सर्व आर्वाचीन वा प्राचीन उदाहरणें यांच वर्गांतलीं. वसिष्ठविश्वामित्रतंटा काय सांगतो? क्षत्रिय व ब्राह्मण यांच्यामधील हा तंटा नसून व्यक्तिगत गुण-मग ते जन्मजात असोत वा प्राप्त असोत-वरिष्ठ वर्णाधिकार प्राप्त करून देतो कीं नाहीं? हा तंटा वैदिक कालांतील नसावा अशी आमची समजूत आहे. कारण, तसा असता तर पुढील उदाहरणें घडतीं ना. खुद्द कुण्डापुत्र वसिष्ठ म्हटला तरी त्याला ब्राह्मण्याधिकार कसा प्राप्त झाला अशीहि शंका येऊं

शकेल. पण अशी शंका विश्वामित्राने घेतलेली दिसत नाहीं. उलटपक्षी विश्वामित्राला आपल्या मुलांपैकी निम्मीं मुलें आपल्या वर्णाचीं नाहींत असें म्हणावें लागलें याचा अर्थ काय? यापुढील ग्रंथकाराच्या किंवा अनुवादकाच्या किंवा मूरच्या वैयक्तिक उदाहरणांचा विशेष विचार करण्याचें कारण नाहीं. त्यांचे किंवा तत्सम अलीकडील विद्वानांचे किंवा आर्यसमाजिस्टांचे विचार अज्ञानोत्पन्न व त्याज्य होत. कांहीं अपवादक उदाहरणांत वैदिक ऋषींचा समावेश झाला असेल, पण तेवढ्यावरून तो मान्य ठरवितां येणार नाहीं. किंबहुना, वैदिक सूक्तें म्हणजे सर्व ब्राह्मणांचीच अशीहि अभिप्राय नसेल. तरी तीं आहेत असें समजणें म्हणजे ब्राह्मणादि वर्ण तत्कालीं उत्पन्न झाले होते व त्या कालीं व्यक्तिनिष्ठ गुणदोषांनीं अधरोत्तरता किंवा परिवर्तन होत असे इतकेच फार तर म्हणतां येईल. पण ही गोष्ट मूर, ग्रंथकार किंवा अनुवादक यांपैकीं कोणाला तरी मान्य आहे काय? मग या उदाहरणांचा उपयोग काय?

*जातिव्यवस्था या पुस्तकांत पुढें जीं उदाहरणें दिलीं आहेत तीं सर्व* तपश्चर्येनें प्राप्त झालेल्या ब्राह्मणांचीं किंवा ब्राह्मण्याचीं आहेत. केवळ गुणनिष्ठ व्यक्तींचीं नाहींत. उ. वसिष्ठ, विश्वामित्र, अरिष्टषेण, सिंधुद्वीप वगैरे. *तपश्चर्येमुळें काय प्राप्त होतें कोणी सांगावें! पण आजचा प्रश्न तो नाहीं.* आज तपश्चर्याविरहित गुणनिष्ठांना वरच्या वर्णांत नेण्याची इच्छा आहे. आणि गुणहीन ब्राह्मणांना खालच्या वर्णांत नेण्याची इच्छा आहे.

(२) *प्रथम केव्हां तरी जेव्हां वर्ण ठरविण्यांत आले, त्या वेळीं अर्थात्* ज्यांनीं जीं कर्में अंगिकारिलीं होतीं त्यांवरूनच ठरविण्यांत आले. त्यानंतर असा कांहीं काल गेला असेल कीं ज्या वेळीं फिरून कित्येक घराण्यांत *कर्मांची अदलाबदल झाली किंवा जे तपश्चर्येनें वरिष्ठ वर्णांत चढले. आनुवंशिक तत्त्व मान्य झाल्यामुळें तीं घराणीं ब्राह्मण कुळांचीं अशीं मान्य* करण्यांत आलीं. त्यानंतर एकाच घराण्यांत दर पिढीला बदल झाला *अशीं कांहीं उदाहरणें मिळतील तेव्हांच या ग्रंथकारांचा किंवा अनु*वादकांचा सिद्धांत मान्य करतां येईल. त्यांतूनहि पुढें बंदी झाली ती अयोग्य असें ठरवितां येईल तर. परंतु आमचे प्रयोगवश शास्त्र ही बंदी योग्य म्हणत आहेत. म्हणून यापूर्वींच्या उदाहरणांचा आतां

काही उपयोग नाही. ज्या पुराणिकांनी अशी ही पूर्वकालीन उदाहरणें लिहून व राखून ठेवली त्यांच्या सत्यप्रियतेबद्दल आपण खरोखर ऋणी असलें पाहिजे.

आतां वर्णसंकराचे परिणाम किती भयंकर होतात याविषयींचे पाश्चात्य ग्रंथकारांचे अभिप्राय सांगून हा भाग पुरा करतों.

'हेरिडिटी अँड युजिनिक्स' किंवा 'अनुवंशता आणि सुप्रजाजनन-शास्त्र' या पुस्तकांत ग्रीस व रोम या राष्ट्रांसंबंधानें ग्रंथकार म्हणतो :

Nelson discusses the downfall of Greece and Rome from a racial and biological point of view. He points out that both countries apparently took their origin by the establishment of races by isolation and inbreeding after a mixture or invasion of races had taken place. *There was a great diversity of races in the Roman Empire and Roman rule* tended to mix them up. Previously isolation and inbreeding had kept them relatively pure races. Under the shelter of Roman peace and Roman administration they mingled and the result was unlimited hybridising of types destroying the many fixed types which had existed and giving rise *to instability of disposition and culture. This blending of many races is regarded as the most destructive agency in the downfall of Rome.* This would furnish an unhappy outlook for the results of the heterogenous intermixture which is going on in America on a scale never before equalled (P. 238).

Once a particular stock having exceptional qualities is lost, it is very questionable whether it can ever be replaced. The history of Greece and Rome and other de-

cayed nations shows that once a human stock has disappeared *for whatever reason* it is gone for ever. *An obvious duty rests upon the most highly endowed members in all ranks of society to perpetuate their kind.*

It seems clear, for example, that in the U. S. A., the Anglo-Saxon stock is failing to hold its own and this is particularly true of the more highly trained graduate of the universities. Similarly, in England the decline in the birthrate since the eightees has occurred chiefly in the elements of the population whose inheritance is most valuable to the nation (p. 245). (इटालिक आमचें.)

याचा सारांश असा कीं, ग्रीस आणि रोम या दोनहि देशांच्या इतिहासाकडे वंशदृष्ट्या आणि प्राणिशास्त्रदृष्ट्या पाहिलें तर असें आढळून येतें कीं, प्रथम जरी भिन्न भिन्न वंशांच्या लोकांची यांत भेसळ झाली तरी पुढें त्यांनीं आपआपसांत विभाग पाडले आणि त्या त्या विभागांतच आंतरविवाह सुरू केले. अशा प्रकारें बेटीबंद विभागणीनें (वर्णांनीं) बनलेल्या समाजांचीं हीं राष्ट्रें बनलीं. अगोदरच रोमन साम्राज्यांमध्यें अतिभिन्न अशा वंशाचे लोक होते. रोमन राज्यपद्धतीमुळें यांचें मिश्रण होण्यास सुरुवात झाली. पूर्वी विभागणी आणि आंतरविवाह यांमुळें ते इतरांचे दृष्टीनें शुद्ध बनले होते. रोमन राज्यामुळें जी शांतता प्राप्त झाली त्यांत त्यांचा अत्यंत वर्णसंकर सुरू झाला. त्यामुळें पूर्वीचे वर्ण बनले होते ते सर्व मोडले. या वर्णसंकरामुळें विचारचापल्य उत्पन्न झालें आणि संस्कृत्यभिमान नष्ट झाला. हा वर्णसंकर रोमन साम्राज्यनाशाचीं जीं अनेकविध कारणें आहेत त्यांतील अत्यंत महत्त्वाचें असें कारण समजलं गेलें आहे. हल्लीं अमेरिकेंत जो आजपर्यंत कधीं न झालेल्या प्रमाणांत वर्णसंकर सुरू झाला आहे त्याकडे या दृष्टीनें पाहूं गेल्यास भावी चिन्हें कांहीं नीट दिसत नाहींत.

एकदां विशिष्ट गुणसंपत्तियुक्त असा वर्ग नाहींसा झाला म्हणजे त्याची जागा कोणी भरून काढूं शकेल कीं नाहीं शंकाच. रोम, ग्रीस व इतर नष्ट झालेल्या राष्ट्रांचा इतिहास सांगतो कीं, कोणत्याहि कारणानें को होईना असा वर्ग एकदां नाहींसा झाला म्हणजे झाला. अर्थात्, भिन्न भिन्न दर्जाचे जे अति गुणसंपन्न असतील त्यांजवर एक प्रकारचें असें कर्तव्य येऊन पडतें कीं, त्यांनीं आपआपली जात शाश्वत राहील अशी खटपट करावी.

यावरून काय अनुमान काढावयाचें हें ज्यानें त्यानें ठरवाव. आमच्या पूर्वजांनीं वैवाहिक बाबतींत घालून दिलेले नियम आजपर्यंत पाळले गेल्यामुळें आमचा फायदा झाला कीं तोटा झाला याचा विचार करावा. युरोपियांचे मतानें आमचें आजे यांची येथें वस्ती सुमारें चार पांच हजार वर्षे आहे. आमच्यांतील नवीन पंडितांच्या मतानें ती ७।८।१० हजार वर्षांची आहे. आमच्या समजुतीनें आम्ही पूर्वापार येथलेच. तथापि क्षणभर आम्ही उत्तर ध्रुवावरून इकडे आलों असें म्हटलें तरी ४ किंवा ८ हजार वर्षे येथें असलों तरी-त्याचा अर्थ असा कीं, आम्ही ग्रीक, रोमन, खाल्डियन या संस्कृतींचें अस्तित्व आणि विलय पाहिलीं तरी तगत राहिलों आहोंत. आमच्यांतील शौर्य, धैर्यादि गुण अलीकडे मारण्याचा प्रयत्न सुरू आहे. तो बंद झाला तर आम्ही अद्यापिहि कियेक सहस्रकें टिकूं. पण इंग्रजी राज्यकारवाईनें जर आमच्यांत वर्णसंकर उत्पन्न झाला तर आमचें मरण ओढवलेंच म्हणून समजाव. कांहीं सामाजिक दोष उत्पन्न झाले असले तर ते घालविण्यास अन्य उपाय शोधले पाहिजेत.

## दीर्घतमस् ऋषीचा वंशवेल आणि पहिल्या मिश्र जातीचें नांव

वेदांतून कालानुक्रमिक इतिहास गोळा करण्याचें काम फार अवघड आहे. आमच्या समजुतीनें कालानुक्रमिक इतिहासापेक्षा सांस्कृतिक इतिहास श्रेष्ठ आहे व त्याचे भरपूर मासले वेदांतहि आढळतील आणि महाभारत व पुराणांतून तेच सांगितले जातात. हिंदी आर्यांना ऐतिहासिक बुद्धि नाहीं असें नाहीं; पण कालानुक्रमिक इतिहासाची अखेर म्हणजे जो सांस्कृतिक इतिहास तो लिहिण्यास सुरवात झाल्यावर कालानुक्रमिक इतिहास लिहिण्याची आवश्यकता वाटेनाशी झाली. आर्यसंस्कृतीचा प्राण म्हणजे धर्मबुद्धि, कर्म-

भूमि, जन्मजात वर्ण वगैरे. त्यांचा विकास किंवा परागति त्यांनीं इतिहास-द्वारें दाखविण्याचा प्रयत्न केला. असो.

ऋग्वेद आणि पुराणें यांवरून आम्ही दीर्घतमसाची व तद्वंशियांची *माहिती देणार आहों. त्यावरून वर्णसंस्था ऋग्वेदीय किंवा तत्पूर्व आहे अशी* खात्री पटते किंवा पटण्यासारखी आहे. दीर्घतमसाचा वंशवृक्ष जरूरीपुरता येथें देतों.

उशिज

उतथ्य = (१) ममता (१) = बृहस्पति = (२) जुहू[1]

औशिज दीर्घतमस्= (१) प्रद्वेषी (२) उशिजा (३) अंगराणी

बहुत मुलें

औशिजदीर्घश्रवस् (वणिग्) — ?

ऋजिश्वन् (?)

कक्षीवत= एक अर्था

तीन किंवा अधिक पुत्र

ऋजिश्वन् (?) — जरासंध

घोषा—कुष्ठी अमात्. — ?

१ (१) बृहस्पतीची एक बायको सोमानें पळविली होती. ती पुढें देवांनी परत आणून 'ती शुद्ध आहे' अशी ग्वाही दिली. ही कथा ऋग्वेदांत आली आहे ती याच घराण्यांतली आणि याच कालांतील असावी. पुढील दीर्घ-तमसाचीहि बायको पळून जाण्याचा प्रयत्न करते. पण दीर्घतमसानें एक नवीन धार्मिक नियम घालून (स्त्रियांचा एक पति जिवंत असतां पुनर्विवाह बंद) तिला प्रतिबंध केला किंवा पायबंद घातला.

दीर्घतमसाची कांही माहिती 'वेदपूर्वसमाज' या निबंधात दिली आहे. त्यांत विवाहविकास कसा व केव्हां सुरू झाला व विवाहाचे बाबतींत दीर्घतमसानें पहिला निर्बंध कसा घातला हें दर्शविलें आहे. 'बालविवाहाची प्राचीन परंपरा' या लेखांत कक्षीवंत व त्याची मुलगी घोषा यांची उदाहरणें दाखल आहेत. आज दुसऱ्या एका दृष्टीनें औशिज, दीर्घश्रवस् व कक्षीवंत यांजकडे लक्ष द्यावयाचें आहे. तसेंच, या एका घराण्यांत ज्या अनेक कथांचा उल्लेख सांपडतो त्याचें कारण शोधावयाचें आहे.

मूळ उशिज. त्याचे दोन मुलगे उतथ्य आणि बृहस्पति. ममता ही उतथ्याची बायको. ही उशिजाची बायको आणि दीर्घतमा हा बृहस्पतीचा पुतण्या असें मा. मा. ए. कोशकर्ते म्हणतात. परंतु तसें मानल्यास बृहस्पतीनें मातृगमन केलें असा अर्थ होतो. तो मान्य करवत नाहीं. शिवाय, ममता उतथ्यापासून गर्भवती झाली होती असें इतरत्र आढळतें. त्यामुळें ममता ही उतथ्याची बायको असें आम्ही समजतों. तशीच ती बृहस्पतीचीहि बायको असेंच आम्ही समजतों. कारण, बृहस्पति संगमोत्सुक झाला असतां ती फक्त गर्भार असल्यामुळें प्रतिकूलता दाखविते किंवा गर्भ देखील स्वतःस त्रास होतो एवढीच सबब दर्शवितो. मातृत्वामुळें किंवा बंधुपत्नीत्वामुळें म्हणजे अनैतिक संबंधामुळें नव्हे. दीर्घतमसाला मामतेय म्हणतात व क्वचित् औशिज म्हणतात, म्हणून उशिजाची बायको ममता अशी कल्पना केलेली असावी. पुढें गर्भ जन्मास आला तो जन्मांध निपजला.

दीर्घतमस् आंधळा. त्याला मामतेय कां म्हणतात ? त्याचा मुलगा दीर्घश्रवस्. याला वेदांत औशिज म्हटल्याचें आढळतें तसें त्याला मामतेय म्हटलेलें आढळतें. याचीं कारणें अनेक असूं शकतील. ( १ ) मातृकुलपरंपरा; ( २ ) दोघां भावांची एक बायको असल्याच मुलगा आईवरूनच ओळखणें प्रशस्त. या दोनहि गोष्टी म्हटल्या तरी पुढील पिढींत आढळत नाहींत. एका पिढींत इतका फेरबदल होत नाहीं. बृहस्पतीच्या शापानें हा आंधळा झाला आणि पुढें त्याला अखेर दृष्टि प्राप्त झाली अशी ही कल्पना आहे. पण दृष्टि म्हणजे प्रत्यक्ष चर्मचक्षूची कीं ज्ञानचक्षूची ? तो

सूक्तकर्ता या दृष्टीनें त्यास ज्ञानचक्षु प्राप्त झाले हें म्हणणें प्रशस्त. तसाच तो आंधळा म्हणजे प्राचीन तमोयुगाची मूर्ति. या तमोयुगमूर्तीला ( आंधळ्याला ) गावस्थितींत रतियुद्ध करण्याची आवड. गावस्थितींत म्हणजे उघड्यांत सर्व लोकांसमक्ष. परंतु ही चाल नाहींशी होऊं लागली होती; कारण जवळच्या ऋषींना ती आवडत नसे असें वर्णन आढळतें. शिवाय, आंधळ्याला एकांत काय आणि लोकांत काय सारखेंच. याची स्त्री प्रद्वेषी. हें स्त्रीचें नांव माहेरीं किंवा सासरीं कोणी ठेवणार नाहीं. अर्थात्, हें कवींनीं योजलेलें. दीर्घतमस् देखील याच पद्धतीचें नांव. या प्रत्येक नांवांत कांहीं तरी इतिहास भरलेला असावा. परंतु तो आज आपणांस सर्वस्वी कळत नाहीं; कांहीं कळतो. 'नवऱ्याचा द्वेष करी' म्हणून प्रद्वेषी किंवा दासहृदयी असें तिचें नांव कवींनीं ठेवलें. ( स्त्रिया प्राचीन कालीं फार स्वतंत्र आणि जहाल होत्या, पतीचा द्वेषहि करीत, असा इतिहास संकलित करण्याकरितांहि हें नांव असेल. ) तिला बहुत मुलें झालीं. दीर्घतमस् अंध म्हणून कुटुंबपोषणाचा भार तिजवर पडला. ती कंटाळली. प्रथम ती पुनर्विवाहाला उद्युक्त झाली होती, परंतु दीर्घतमसानें नवीन नियम करून तिचा बेत हाणून पाडला होता. तिनें अखेर दुष्ट दासांच्या मदतीनें आपल्या नवऱ्यास दोरीनें बांधून नदींत उलटें फेकून दिलें. असेंच नदींत फेकल्याची गोष्ट वसिष्ठाविषयीं वेदांत वर्णिली आहे. दैव बलवत्तर म्हणून दीर्घतमा व वसिष्ठ वांचले व दीर्घतमा अंग देशाच्या राजास सांपडला. त्यास प्रद्वेषीपासून झालेल्या संततीचा इतिहास आढळत नाहीं. कारण इतिहास सांस्कृतिक आहे. जेथें कांहीं नावीन्य किंवा वैशिष्ट्य आढळेल तेवढेंच सांगण्याचा सांस्कृतिक इतिहासाचा प्रयत्न असतो.

अंगराजास पुत्र होत नव्हता. त्यानें पुत्रप्राप्तिस्तव या ऋषीस बाळगण्याचें ठरविलें. अंगराणीनें या गोष्टीचा उघड निषेध किंवा नापसंती दाखविली नाहीं; परंतु तिला दीर्घतमसाचा तिटकारा आल्यामुळें तिनें ऋषीकडे स्वतःऐवजीं उशिजा नावाची दासी पाठविली. तिच्यापासून त्याला दोन तीन मुलगे झाले. कोणी म्हणतात उशिजेशीं त्यानें लग्न लावलें; परंतु ही हमाची गोष्ट राजास समजली नसती असें नाहीं. राजा हे

पुत्र आपले क्षेत्रज म्हणून मागूं लागला. दीर्घतमस् देईना ( मत्स्यपुराण ) तेव्हां राणीची लवाडी राजाला कळून आली व फिरून पुत्रप्राप्तीस्तव राणीची खानगी ऋषीकडे झाली. त्यापासून अंग, वंग, कलिंग इत्यादि सहा मुलगे झाले व ते अंगराजा–अनुकुलोत्पन्न बलि नामक–याला क्षेत्रज म्हणून प्राप्त झाले. परंतु त्या मुलांविषयींहि आपल्याास विशेष माहिती नाहीं. आपल्याला विशेष वेदांतून मिळते ती उशिजा व दीर्घतमस् यांच्या पुत्रांविषयीं. या पुत्रांचीं नांवें दीर्घश्रवस्, कक्षीवंत वगैरे वेदांत आढळतात. दीर्घश्रवाला ऋ. १.११२.११ यांत वणिग् असें म्हटलेलें आढळतें, तर यजुर्वेदांत कक्षीवंतालाहि वणिग् असें म्हटलें. त्यावरून ऋग्वेदांतील वरील ऋचेंत दोघांनाहि वणिग् म्हणण्याचा उद्देश असावा असें वाटतें.

> याभिः सुदानू औशिजाय वणिजे दीर्घश्रवसे मधुकोशअक्षरत् ।
> कक्षीवंतं स्तोतारं याभिरावतंताभिरूषु ऊतिभिः अश्विनागतम् ॥
>
> ऋ. १.११२.११

> नमो मंत्रिणे वाणिजाय कक्षाणां पतये
> नम उच्चैर्घोषायाक्रंदयते पत्तीनां पतये नमः ॥ रुद्राध्याय
>
> ( शुक्ल १६.१९)

वरील ऋग्वेदीय ऋचेंतील कक्षीवंत आणि खालील कृष्णयजुर्वेदाच्या रुद्राध्यायांतील कक्षपति ( कक्षाणां पति ) हे भिन्न नव्हत. यजुर्वेदांत याला मंत्रिन् आणि वणिज् अशीं दोन विशेषणें लावलेलीं आहेत, तर ऋग्वेदीय ऋचेंत ' स्तोतारं कक्षीवंतम् ' असें म्हटलें आहे. तात्पर्य एकच. आणि अखेरच्या घोषेच्या निर्देशानें निकाल लागतो. तात्पर्य, ऋग्वेदांत दीर्घश्रवस् आणि ऋग्वेदांत कक्षीवत् या दोघांना वणिज् हें विशेषण लावलेलं आढळतें. हें सांगण्याचें कारण असें कीं, दीर्घश्रवसानें दुष्काळांत वाण्याचा धंदा केला म्हणून त्याला वणिज् म्हटलें अशी जी कथा ऋग्वेदभाष्यांत दिसून येते तिचें वैयर्थ्य जाणतां यावें. दुर्गाचार्य ' कक्षे उत्पन्नः ' म्हणतात तेंहि बरोबर वाटत नाहीं.

कक्षीवंताविषयीं आपल्याला आणखी माहिती मिळते ती अशी, कीं, तो सूक्तकर्ता आणि कदाचित् 'राजा' हि असला तरी त्याचा सामाजिक दर्जा स्पृहणीय दिसत नाहीं. त्याचें लग्न बऱ्याच प्रौढपणीं एका ' अर्भे 'बरोबर

झालें ( ऋ. १.५१.१३ ). या जोडप्यापासून घोषा नांवाची एक मूक-कर्णी मुलगी झाली. तिला श्वेतकुष्ठ झालें होतें. त्यामुळें तिचें लग्न होईना. ती बापाचे घरीं अमाजू राहिली ( फार मोठ्या वयापर्यंत अविवाहित ). अखेर तिचें कुष्ठ गेल्यावर सुमारें ६० वे वर्षी तिचें वृद्धपणीं लग्न झालें. तिला एक मुलगाहि झाला असावा. कक्षीवंतालाहि मुलें असावींत. कारण, त्याच वंशांत जरासंघ झाला असें वर्णन पुराणांत येतें.

दीर्घतमा उशिजा दासीपासून किंवा उशिजा दासीशीं लग्न करून संतति उत्पन्न करतो. अंगराजाजवळ असलेली ही दासी अप्रत्य शत्रुस्थानीं असलेले जे कृष्णवर्णाचे दास त्यांपैकीं कीं सामान्य दास=गुलाम किंवा सेवक यांपैकीं ? येथें दासी=सेविका यांत शंकाच नाहीं. तथापि ती मूळची कोण होती कोणी सांगावें ? आमच्या समजुतीनें या सर्व कल्पना चुकीच्या. दीर्घतमस् हा अत्यंत प्राचीन ऋषि. लोकमान्यांच्या समजुतीनें दहाव्या युगांत किंवा महिन्यांत म्हातारा होणारा सूर्य अर्थात् आर्तिक स्थानांतला. तेथें हिंदी दास कोठून असणार ? एवढें खरें कीं, ती दासी. दीर्घतमस् हा आपल्या घरीं असतांनाहि त्याच्याजवळ दास असावेत. कारण, या दासांच्या मदतीनेंच प्रद्वेषीनें–एक दासीच–त्याला नदींत फेकून दिलें. सारांश, काल व स्थान कोणतीहि असोत राजांजवळ तसेंच एखाद्या ब्राह्मणाजवळ दास असत आणि अशा दासांपासून प्रजोत्पत्ति होत असे. खुद्द प्रद्वेषी हें नांवहि ती दासीच असावी असें दर्शवितें. तथापि अशा प्रजेचें स्थान कोणतें असा प्रश्न पडे. मुलगा कितीहि विद्वान् असो, तपोनिधि कीं द्रष्टा असो, त्याच्या समाजांतील स्थानाविषयीं निश्चय असा कीं, तो पित्याच्या वर्णाचा नव्हे आणि मातेच्याहि वर्णाचा नव्हे; तर तो आर्यांतील ( त्रैवर्णिकांतील ) अखेरच्या वर्णाचा ( वणिक् किंवा वैश्य ). तथापि, सवर्ण वैश्यांच्या संततीच्या दर्जाचा कीं त्याहून हलका ? त्याला दास म्हणत नाहींत. त्यावरून त्याचा दर्जा थोडा वाढलेला दिसतो. मनुस्मृतींत अशा मुलाला कोणी मातृसवर्ण ( क्षेत्रप्रधान ) समजतात, तर कोणी पितृसवर्ण ( बीजप्रधान ) समजतात असा वाद दर्शविला आहे. परंतु येथील ' वणिक् ' पदावरून तसें दिसत नाहीं. ही मनुपूर्वस्थिति. मूळची कल्पना ( १ ) कमी दर्जाचा मानण्याची व त्याला आपल्या वर्णांतील अखेरच्या वर्णांत घाल-

ण्याची; ( २ ) त्यानंतर मनुस्मृतींतील मातृसवर्ण वा पितृसवर्ण अशी भिन्न पद्धति; ( ३ ) त्यानंतर मातृसवर्ण मानण्याची. कक्षीवंत स्तोत्रकर्ता असतांहि त्याला विप्र व वणिक् अशा दोन प्रकारें संबोधलेलें आढळतें; पण दास म्हटलेलें आढळून येत नाहीं, म्हणजे मातृसवर्णता तत्कालीं दिसत नाहीं. त्यानंतर अशा संततींत मातृसवर्णता व पितृसवर्णता दोनहि दिसूं लागल्या. कक्षीवंताच्या बाबतींत पितृसवर्णताच आढळून आली व पुढें त्याला विप्र म्हणूं लागले. पण प्रथम जन्मतः त्याचा दर्जा हलका होता. त्यामुळें त्याच्या विवाहाला अडचण पडली. ही कथा समजेनाशी झाल्यावर किंवा विसरून गेल्यावर तो दुष्काळांत वाण्याचा धंदा करूं लागल्यामुळें त्यास वणिक् म्हटलें आहे अशी कथा उत्पन्न झाली. त्याच्या प्रजेंत कुष्ठरोग उत्पन्न झाला वगैरे अनेक दोष दाखविले आहेत. कवष ऐलुषाच्या कथेवरूनहि ( ऐतरेय ब्राह्मण ) दासीपुत्राला ब्राह्मणत्वाचा मान मिळत नसे असेंच दिसून येतें ( चापेकरांचे वैदिक निबंध, पा. १४५, आख्यायिका १४ पाहा ). दासी म्हणजे केवळ नोकर असा अर्थ नव्हे. दास, दासी या अपर वर्णाच्या समजल्या जात. कक्षीवंताला विप्र, राजा, स्तोता, मंत्रिन् अशीं विशेषणें लावलेलीं असूनहि त्याचें लग्न फार उशीरां आणि एका अर्थेंशीं होतें—जरठकुमारीविवाह करावा लागतो. हा दुसऱ्या कशाचाहि परिणाम नसून त्याला जो दासीपुत्रत्वाचा डाग लागला त्याचा हा परिणाम होय. गायस्थितींत राहण्याच्या कालांत किंवा आर्तिक मूळगृह्यांतील कालांत दासीपुत्रत्व असें भोंवतें यावरून अनुलोमविवाह किंवा कामतः विवाह किंवा अशा विवाहांची वा संगतीची संतति दूषणास्पद होती याचा विचार केल्यास चातुर्वर्ण्य व बेटीबंदपणा किती जुना आहे तें समजतें.

या वंशातल्या प्रत्येक व्यक्तीचे बाबतींत कांहींना कांहींतरी वैचित्र्य आहे. तें सहजप्रवृत्तीचें किंवा केवळ वैयक्तिक वैचित्र्य नसून सांस्कृतिक व सामाजिक वैचित्र्य आहे. ( १ ) औशिज आडनांव किंवा गोत्र असून मामतेय हें विशेषण लागणें ( मातृकुलपरंपरा ), ( २ ) दोन भावांचा एका स्त्रीशीं संबंध, ( ३ ) स्त्री गर्भवती असून—तो गर्भहि चांगला वाढ-

लेला असून—बळजबरीनें स्त्रीसंभोग, ( ४ ) अशा स्थितींत गर्भ जन्मांध निपजणें, ( ५ ) पतिद्विष्टा स्त्री—कदाचित् दासीच, ( ६ ) दासीनिकटता व पतिदर्शनेची तयारी, ( ७ ) नियोग किंवा उत्पत्तिनियुक्तता, ( ८ ) दासीपासून स्वतःस पुत्रोत्पत्ति, ( ९ ) अशा पुत्रांची जाति व क्वचित् पितृसवर्णता व क्वचित् सामान्यता, ( १० ) क्षेत्रज पुत्रांविषयीं वाद, ( ११ ) अपितुल्य पुत्र अथवा तरी सामाजिक निकृष्टता, ( १२ ) जरठकुमारीविवाह, ( १३ ) दासीसंततिजन्य कुष्ठ, ( १४ ) पुढें कदाचित् निर्वेद. इतक्या गोष्टी खच्चून भरलेल्या एका तीन चार लिव्यात आढळाव्या, हें केवळ अशक्य नसलें तरी अस्वाभाविक आहे. गेल्या पांच हजार वर्षांत असें दुसरें उदाहरण सांपडणार नाहीं, आणि म्हणून हें वस्तुतः खरें नसून सांस्कृतिक इतिहासांतील आहे. म्हणजे पूर्वयुगांतील ऐतिहासिक निष्कर्ष एका लहानशा कथेंत गोंवल्याचा भास होतो. चातुर्वर्ण्यांतील अनुलोमविवाह देखील अनिष्ट व अस्पृहणीय आहेत. त्यापासून अनेक तोटे होण्यासारखे आहेत, असें दाखविण्याकरितां हें बनविलेलें उदाहरण आहे. शूद्रा स्त्रीशीं आर्यांनीं कोणीहि व केव्हांहि विवाह करूं नये असा जो मनुस्मृतींत कटाक्ष आहे तो यामुळेंच.

असल्या विवाहाची सर्वच संतति वाईट निघते असा अभिप्राय नाहीं. संतति चांगली निघूनहि अनेक सामाजिक घोटाळे व शारीरिक व्याधि यांची यात भीति दाखविलेली आहे. वंश नष्ट होण्याची किंवा दुष्ट बनण्याचीहि शंका दाखविली आहे. दीर्घतमसाचे आणखी दोन मुलगे पुराणांतून आढळतात. ते केवळ सामान्य आहेत. आधच्या तज्ज्ञांचा अभिप्राय मागील एका भागात दाखविला आहे कीं, अखेर यांत मातृसवर्णताच दिसून येते. कांहीं गणिती तज्ज्ञांनीं त्यांचे ( मातृसवर्ण, पितृसवर्ण, व त्यांच्या दुप्पट सामान्य संतति असें प्रमाण ) $अ^2+ब^2+2अब$ असेंहि प्रमाण काढलेलें आढळतें. ऋग्वेदांतील हें उदाहरण पाहून वेदींवंद समाजाची सुरुवात अत्यंत जुनी—वेदपूर्व—असें म्हटल्यावांचून गति नाहीं. कारण, यांतील मुख्य पुरुष जो दीर्घतमा तो वेदपूर्व तमोयुगदर्शक आहे. दीर्घतमसाचे पुत्र दोनांहि वाणिज हा मिश्र जातीचा पहिला व महत्त्वाचा वैदिक उल्लेख. याशिवाय कितव, वृषल व आणखीहि कित्येक मिश्र-

जातीचे उल्लेख आहेत. वृषल ही जर मिश्र व अत्यंत हीन जाति नसेल तर त्या जातीला विटाळ कां असावा ? तसाच कितवालाहि असावा असें कितवसूक्त सांगतें. वणिक् किंवा पाणिक हे शत्रुस्थानीय लोक ॠग्वेदांत दिसतें. शत्रुस्थानीय म्हणजे दास, दस्यु, ऐहिक भोगासक्त लोक वगैरे वणिक् आहे. हा वणिक् हा आर्य आणि शत्रु यांमधला दुवा आहे. तो कधीं आर्यसम तर कधीं आर्यशत्रु आहे. आर्यसम आहे तोच विप्र किंवा वाणिक्. आर्यशत्रु तो पणि. 'पणिर्वणिक् भवति' असें यास्काचार्य म्हणतातच. हे पणिच पुढे फिनिशियन्स म्हणून इतरत्र प्रसिद्धीस आले असें अविनाशचंद्र दास म्हणतात.

सारांश, मिश्र जातीचें अस्तित्व ॠग्वेदांत आहे. त्या जातीला हीनत्व आहे. अशीं किती उदाहरणें सांपडतात हा मुद्दाच गैरलागू आहे. जेथें मिश्रणाची कल्पनाच नसावी तेथें एक उदाहरण सांपडलें तरी पुष्कळ. येथें अधिक खास आहेत. शिवाय, हा प्रश्नहि असा नव्हे, कीं यांत मिश्र जातींसंबंधानें सांगणें भाग पडावें. यांत मिश्र जातींचा—त्या असल्या तरी—अनुल्लेख संभवनीय. म्हणून अनुल्लेखाचें महत्त्व नाहीं. अर्थात्, उल्लेखाचें महत्त्व सामान्यापेक्षां अधिक. अर्थात् हा उल्लेख चातुर्वर्ण्याचें खास प्रमाण म्हणून समजण्यास हरकत नाहीं.

या मराण्यांतील स्त्रियांची स्थिति पाहा. ( १ ) बृहस्पतीची बायको एखाद्या अनार्य स्त्रीप्रमाणें सोमाकडे पळून जाते; ( २ ) सोम तिला देण्याचें नाकारतो, पण अखेर देतो; ( ३ ) ममतेशीं बृहस्पति एखाद्या अनार्याप्रमाणें किंवा पशुतुल्य निष्ठुर वर्तन करतो, किंवा त्यांतली पशुतुल्यता त्याला समजत नाहीं; ( ४ ) प्रद्वेषी पतीशीं दासांची मदत घेऊन निष्ठुरपणानें वागते; ( ५ ) दीर्घतमसाचा दासीशीं प्रत्यक्ष व उघडपणें संबंध घडतो; ( ६ ) घोषा आपल्याला पुत्राप्रमाणें दायविभाग व मुलांप्रमाणें शिक्षण मिळावें अशी प्रार्थना करते; ( ७ ) स्त्रियांवर विवाहाचें बंधन आजच्याप्रमाणें नव्हतें. पति सोडून जाणें यांत कांहींच वाटत नसे ( घटस्फोट ) किंवा पुनर्विवाह ( एक पति जिवंत असतांहि ) करण्यास हरकत वाटत नसे. दीर्घतमसानें एक पति जिवंत असतां घटस्फोट अगर पुनर्विवाह या दोहोंसहि बंदी

केली. स्त्रियांच्या स्वातंत्र्याला या कालांत मोठाच आळा बसला! अनार्य स्त्रिया नवरा सोडून जातात, कचित् त्याचा घात करतात, त्यांच्या पुत्रांना समाजांत चांगलें स्थान मिळत नाहीं, अनार्यत्व आनुवंशिक असतें, करितां विवाहसमयीं दुसऱ्या कोणत्याहि गोष्टीपेक्षां कुळ पाहणें अवश्य असें मनुस्मृति सांगते आहे.

दीर्घतमस् दहाव्या युगांत म्हातारा झाला अशी कथा आहे. या 'युग' शब्दाचा अर्थ ८ वर्षें असा करून ८० व्या वर्षी तो म्हातारा झाला असा कोणी अर्थ करतात. परंतु तो ग्राह्य वाटत नाहीं. कारण ८० व्या वर्षी म्हातारपण ही अगदीं सामान्य गोष्ट दिसते. त्यांत कौतुकास्पद असें काहींच नाहीं. लोकमान्यांनीं दीर्घतमस् = दीर्घ रात्रदर्शक सूर्य असा अर्थ बसविला व आर्क्टिक मूलस्थानांतील रात्रीशीं त्याचा संबंध जोडला! पण दीर्घ रात्र याचा अर्थ Dark Ages—तमोयुगदर्शक—कां समजूं नये! नैसर्गिक चमत्कारापेक्षां अनैतिहासिक कालांतील मानवसमाजेतिहासाच्या आद्यकालांतील कथा कां समजूं नये? हा केवळ कौटुंबिक इतिहास समजण्याकडे मन प्रवृत्त होत नाहीं.

आमच्या ग्रंथांतून कालदर्शक ( Chronological ) इतिहास नाहीं, पण सांस्कृतिक इतिहास ( Cultural ) आहे. कालदर्शक इतिहासापेक्षां सांस्कृतिक इतिहास फार थोडक्यांत लिहितां येतो. सर्व ग्रंथ सूत्रमय करण्याची जी प्रवृत्ति झाली त्याच कारणामुळें कालेतिहास जाऊन संस्कृतीतिहास लिहिण्याचा संप्रदाय पडला व अनेक कथानकें उत्पन्न झालीं. सांस्कृतिक इतिहास ही कालदर्शक इतिहासाची पुढील पायरी. उत्पातासारख्या सृष्टींत मोठमोठ्या घडामोडी झाल्यावर, हिमप्रलयासारख्या किंवा समुद्रशोषणासारख्या गोष्टी घडून देशांतर करण्याचा प्रसंग किंवा सोई उत्पन्न झाल्यावर, अतीव मोठ्या कालानंतर, कालबद्ध इतिहासापेक्षां सांस्कृतिक इतिहास लिहिण्याची आवश्यकता भासूं लागते व त्याला 'पुराणेतिहास' हें नांव प्राप्त होतें. वरील इतिहास वांशिक असेल असें म्हणवत नाहीं. व्यक्तींचीं नांवें 'सूचक' आहेत आणि पिढ्या व्यक्त्यंतरदर्शक नसून स्थित्यंतरदर्शक आहेत. कोणत्याहि एका घराण्यांत चार पिढ्यांत इतकी

स्थित्यंतरें आढळणें अशक्य ! अर्थात्, एकेक पिढी २५।३० वर्षांची नसून शेंकडों वर्षांची आहे. एकेका पुरुषाला शेंकडोंच काय सहस्रकांचें आयुष्य देण्यास हरकत नाहीं. दृद्वाच्या युगांतील स्थातारयण याचा अर्थ या दृष्टीनें बरोबर लागतो तो असा कीं, हें तमोयुग फार मोठा काल व्यापून होतें. हा इतिहासच चार पिढ्यांचा नसून ४० किंवा ४०० पिढ्यांचा आहे. या कालांत वर्णसंकर फार घातक आहे असें ठरलें.

## चातुर्वर्ण्याचें इतरत्र प्राचीन अस्तित्व व भावी प्रयत्न

(१) देवांत चातुर्वर्ण्य होतें–बृहदारण्यकोपनिषद्

(२) इजिप्तमध्यें: Whether assisted or not by archeology, Topinard says in his anthropology, history narrates that under the twelfth dynasty about *2300 B.C.* the Egyptians consisted of four races (?) — (1) the Rot (रक्त!) or the Egyptians *painted* red and similar in feature to the peasants now living *on the banks of the Nile*; (2) the Namahu *painted yellow* with acquiline nose corresponding to the population of Asia to the East of Egypt; (3) Nahasu or prognothos Negroes with wooly hair; (4) the Tamahu Whites with blue eyes. (इटालिक व प्रश्नचिन्हें आमची.) हे रंग पोषाखाचे होते हें painted—रंगित या शब्दावरून उघड होतें.

(3) Atlantis is said to have been inhabited by red, yellow, white and black races — story of Atlantis by W. Scott Elliot, p. 8 (1896) — Ethnological types. —अटलँटिस महासागरांतील हें अटलँटिस खंड पृथ्वीच्या सपाटीपासून नाहीसें झाल्यास आज किती हजार वर्षें झालीं कोणी सांगावें ? त्यांत कमी जास्ती स्थित्यंतरें होऊन अखेर जें एक बेट शिल्लक राहिलें होतें (हीं स्थित्यंतरें निरनिराळे हजार वर्षें चालू होती.)-ग्रीक लोक पॉसिडॉनिस् म्हणत तें 'समुद्रात्लुप्यंतु' खि. पू. १००० वर्षांपूर्वी झालें.

( 4 ) Social ranks were divided somewhat sharply. (i) There was a large class of nobles who were mostly *great landed proprietors* living on their estates and having under them a vast body of dependents &c. (ii) There was also a numerous *official class* which ragarded itself *as highly dignifide* and looking down on the people. Commands in the army fell to their lot. (iii) Further there was a *literary class* which was *eminently respectable* and which viewed with contempt those engaged in trade and handicrafts. (iv) Below these three classes and removed from them by a long interval *was the mass of the population* — the multitude engaged in manual labour of different kinds. ( Ancient Egypt by Rawlinson, p. 44. ) प्रयत्‍न पुढें म्हणतात : It is an entire mistake to suppose that caste existed in Egypt. The line of demarcation might be crossed. ( इंडिक आमेर. ) आश्चर्य, हे की अपरोचरता येत आमच्यासारखी. हें चातुर्वर्ण्य जन्मजात नव्हतें असें ग्रंथकार सांगत नाहीत. मूर उलट सांगतो की, पूर्वी आमच्यांत एका वर्णांतून दुसऱ्या वर्णांत जातां येत असे, तद्वतच हें. असा एक काल होता की, त्या वेळीं आमच्यांत व्यक्तिनिष्ठ गुणामुळें उच्च स्थान प्राप्त होई. तसेंच इकडे अनवस्था होऊं लागली व तें शास्त्रशुद्ध दिसेना म्हणून ही अपरोचरता बंद करण्यांत आली. हें चातुर्वर्ण्य सर्व कालीं सर्वत्र असतें असें म्हणावयाचा उद्देश असेल तर तें सांगण्याची जरूरच नाहीं. ग्रंथकाराला नीट समजून पडलेली नाहीं एून त्यानें पूर्वग्रहयुक्त शेरे सोडले आहेत.

( ५ ) पार्शी किंवा इराणी लोक : ( १ ) अथर्व (सं. अथर्वण )=पुरोहित, (२) रथेस्तवा योद्धा, (३) वास्त्रिय फुशिय=कृषीवल, व (४) हुइति (हुतोक्ष)= कारागीर ( यस्न १९६ वरेंगे ) ही व्यवस्था इतकी प्राचीन आहे की सर हेन्री रिस्ले ( सेन्सस कमिशनर ) म्हणतो का, भारतीय वर्णव्यवस्था इराणियन पद्धतीवरून घेतली असली पाहिजे. अर्थात्, दोहोंतील साम्य

वेगळें वर्णन करण्याची आवश्यकताच नाहीं. प्रो. डमीस्टटिअर म्हणतो : 'आपणांला यांत चार वर्गांचें उत्तम वर्णन आढळतें. हें वर्णन वाचीत असतां ब्राह्मणग्रंथांतील चातुर्वर्ण्यव्यवस्थेची आठवण होते. ही वर्गवारी इराणियनं लोकांनीं भारतीयांच्या वर्णव्यवस्थेवरून उचलली असली पाहिजे यांत शंका नाहीं" (सेक्रेड बुक्स् ऑफ् दि ईस्ट माला झेंद अवेस्ता, भाग १ ला, प्रकरण ४३ व प्रस्तावना पा. ३३.) रिस्लेसाहेब फिरून म्हणतोच कीं, प्राचीन इराणांतील वर्ण सर्वस्वीं धंद्यांवरून झाले होते. अर्थात्, हे सर्व शेरे दोरे पूर्वग्रहमूलक मानण्यावांचून गतीच नाहीं. वरील परस्परविरुद्ध शेऱ्यांवरून दुसरें अनुमान शक्यच नाहीं.

या चातुर्वर्ण्यांत वेथल्याप्रमाणेंच अनुक्रम आहे. यांतील अथर्व हे शेंडीवेंडीबंद राहतात. पार्श्यांत शूद्रवाचक शब्द नाहीं ही समजूत शूद्र वर्ण कारागीर नाहीं या कल्पनेवर आधारलेली चुकीची यांत शंका नाहीं.

(६) कांहीं प्रतींत मगाः किंवा मृगाः असेंहि आढळतें. विष्णुपुराणांत मशकाः चे ऐवजीं मगधाः आढळतें.

> तत्र पुण्याः जनपदाः चत्वारो लोकसंमताः ॥
> मगाश्च मशकाश्चैव मानसा मंदगास्तथा ।
> मगाब्राह्मणभूयिष्ठाः स्वकर्मनिरता नृप
> मशकेषु तु राजन्याः धार्मिकाः सर्वकामदाः ।
> मानसाश्च महाराज वैश्यधर्मोपजीविनः ।
> शूद्राश्च मंदगा नित्यं पुरुषाः धर्मशालिनः ॥ भारत–भीष्मपर्व.

मग हे पार्श्यांतील ब्राह्मण अशी आजपर्यंत समजूत, पण ही समजूत चुकीची (चापेकरांचे वैदिक निबंध अवेस्तिक देव हा निबंध पाहा). हे बहुधा इराणाजवळचे व पार्थियनांच्या इतिहासोल्लेखापूर्वीचे Medes[1]

[1] According to Herodotus the मगी or Shamans were one of the six tribes of Media. We also learn from Herodotus and later classical writers that मगी formed a *hereditary sacerdotal caste* acting an important part in the state advisers and spiritual guides to the King and so forth. Indo-Aryan Races by Chand pp. 206-7.

-मद लोक असावेत. प्रमगंद हे ऋ. ३.५३.१४ यांत आलेलें नांव यापैकींच दिसतें. मगांना दान करण्यांत श्रेष्ठ असा राजा अशा अर्थाचें हें आहे. मगध हें देशनाम 'मगा' वरूनच. हे अग्निपूजक पण आर्यविरोधी अव्रती म्हणून वरील ऋचा उत्पन्न झाली. कांहींही असो. मग–मद ( Medes ) असोत वा नसोत, आर्योच्याबाहेर चातुर्वर्ण्य–आपणांहून कांहींसें भिन्न–होतें, ही गोष्ट आर्यांना ज्ञात असल्याची ही साक्ष आहे. आमच्यांतल्या प्राचीन चालीं टाकलेल्या त्या बाहेरच्या आर्यांत म्हणजे असुरांत असावयाच्याच हें पूर्वी दाखविलेंच आहे.

( ७ ) प्राचीन ग्रीक व रोमन लोकांतहि चातुर्वर्ण्य होतेंच. असें म्हणतात कीं, तें हिंदी चातुर्वर्ण्याच्या धर्तीवर करण्याचा प्रयत्न रोमनांनीं चालविला होता, पण तो अखेर यशस्वी झाला नाहीं. रोमन लोकांत वर्णसंकर करण्याचा प्रयत्न चालू होता, त्यापुढें वरील प्रयत्न फसावा यांत नवल नाहीं. वर्णसंकर साम्राज्योपकारक असतो अशी कल्पना असते. पण जन्मजात जातींतील कणखरपणा–शाश्वत जातिधर्म–character विशिष्ट शील असतें तें वर्णसंकर नाहींसें करतें आणि परिणामीं साम्राज्यें टिकविण्याचे ऐवजीं तीं मोडलीं जातात, किंबहुना लोकक्षय होतो असें पा. १५ वर घेतलेल्या उतान्यावरून कोणाचेंहि लक्षांत आल्यावांचून राहणार नाहीं.

## आर्य चातुर्वर्ण्य-प्रयत्न—मनूच्या चातुर्वर्ण्याचा नवीन प्रसार

आज जगाची नवीन रचना चालू आहे. व अमेरिकेंत नवीन प्रयोग चालू आहेत. सर्व जिवंत राष्ट्रांत अत्युच्च शिखरावर अमेरिकेनें नुकतेंच आरोहण केलें आहे; सुबत्ता, शांति, धनसंपत्ति, व्यापार या सर्वांत अग्रेसरत्व घेऊन अमेरिका आज खरी उमेदीत आहे. कांहीं शतकें जातील तेव्हां हें ऐश्वर्य कितपत टिकाऊ आहे तें समजेल. परंतु Immigration laws अंतः-प्रवेशबंदी पोटांत उभी राहिलेली भीति दाखवीत आहे किंवा अंतःशुद्धी-करितां बहिष्काराची इष्टता सिद्ध करीत आहे. बेटीबंदपणादि सुरू झालाच आहे. आर्य शब्दांत हिंदी आर्यांचा समावेश होत नाहीं. ठराव करण्या-पर्यंत पाळी आली आहे. हिंदूंच्या exclusiveness रोटीबेटीबंदपणाला नांवें

ठेवतां ठेवतां हिंदूला बहिष्कृत करण्याची जी अफ्रिकेंत खटपट चालू आहे ती केवळ राजकीय नसून सामाजिक आहे. इंग्लंड, अमेरिका वगैरे पाश्चात्य देशांत मनुस्मृत्युक्त चातुर्वर्ण्य समाजात प्रसृत करण्याविषयीं हल्लीं खटपट चालू आहे ती याच लोकक्षयाच्या व साम्राज्यनाशाच्या भयानें. National Welfare and National Decay या मालेचीं पुस्तकें वाचील त्याला पाश्चिमात्यांच्या या चालू चळवळीचें रूप मनुस्मृतींतील चातुर्वर्ण्यास किती धरून आहे हें समजून येईल. हिंदी आर्यांनीं शूद्रांचा समावेश करून घेतल्यानें आणि आपले कडक निर्बंध न पाळल्यानें आजची नीचावस्था ओढवून घेतली अशी तिकडे समजूत झाली आहे, हें शास्त्रीय वाङ्मयावरून आणि अंतः-प्रवेशबंदी कायद्यांवरून स्पष्ट दिसून येतें. आमच्यांतील सामाजिक सुधारकांचें या गोष्टीकडे लक्ष गेलेलें नाहीं. उलट, त्यांची ती सुधारणा अंगीकारणें व आम्ही ही सुधारणा अवलंबिणें हीच स्वाभाविक व इष्टफलदायी आहे असें प्रतिपादन—शास्त्रीय असो वा नसो—चालू आहे. चातुर्वर्ण्य—जगाच्या पाठीवर सर्वत्र धंद्यांचें स्वाभाविक तत्त्वानें असलेलें—हीच जर अत्युच्चतादर्शक सुवर्णयुगीन स्थिति तर त्या ठिकठिकाणीं प्रक्षिप्तांनीं व्यापिलेल्या मनुस्मृतीचा अतीव गौरव करून नाचणारा निळो आणि सदरील शास्त्रज्ञ यांची बहुधा वेड्यांच्या इस्पितळांत रवानगी करून वेडा आणि अतिबुद्धिवान् हे अतिनिकट बांधव असतात असा जो शास्त्रीय सिद्धांत आहे, तो अमलांत आणण्याचें श्रेय आमचे आजचे स्मृतिलेखक घेणार यांत काय संशय ?

(8) The मगी were the hereditary priests of Aryan Medes and Persians from time immemorial and Zarathustra himself was a मग.

## उपसंहार

१. निबंधाचा विस्तार फार मोठा झाला असें कोणास वाटण्याचा संभव आहे, तर तो अपुरा आहे असेंहि कोणास वाटण्याचा संभव आहे. मूरखाद्देवाच्या बारीक टाइपाच्या ५०० वर पानांच्या छापील पुस्तकापुढें हा क्षुद्रच आहे. वाचकांच्या अभावीं तो कितीहि लहान असला तरी फार

मोठाच आहे. तो शक्य तितका पूर्ण असावा अशी इच्छा असल्यामुळें या चातुर्वर्ण्यासंबंधानें शक्य तितकी चिकित्सा आणि लक्षांत आले तितके आक्षेप मनांत आणून तो पुरा करण्याचा प्रयत्न केला. त्यामुळें अर्थातच तो कांहींसा मोठा होणें अपरिहार्य होतें. त्यांतून कै. राजवाडे म्हणतात त्याप्रमाणें चुकीचे गैरसमज एकदां उत्पन्न करण्यांत आले म्हणजे ते घालविण्याकरितां त्यांतील एकेक शब्दाकरितां उत्तरीं वेळीं शतपट शब्दांचा उपयोग करावा लागतो हें लक्षांत ठेवलें पाहिजे.

२. चातुर्वर्ण्य आज कोणाला पाहिजे आहे? त्याची आज आवश्यकता काय? चातुर्वर्ण्य आणि चार हजार जाति सर्वच नष्ट करून टाकण्यास आजचें जागतिक राजकारण आणि हिंदी राजकारणहि प्रवृत्त झालें आहे! चातुर्वर्ण्य एक वेळ पत्करलें पण हिंदु लोकांचें राष्ट्रीयत्व घालविणाऱ्या व शाश्वत गुलाम करणाऱ्या चार हजार जाति आहेत त्यांचा नायनाट करण्यास चातुर्वर्ण्यालाहि सो देण्यास तयार होणें हाच एक सुलभ उपाय आहे, असें आज कित्येकांस अगदीं मनापासून वाटतें हें आम्ही जाणतों. असले जे आक्षेप आहेत त्या सर्वांचा या निबंधांत विचार केला नाहीं असें म्हणण्यास हरकत नाहीं. चातुर्वर्ण्य जर जगांत सर्वत्र आहे तर तेवढ्यानें हिंदी राष्ट्रानेंहि संतुष्ट कां असूं नये? या व यांसारख्या सर्व आक्षेपांचें सर्वस्वी निरसन करण्याचा हा प्रयत्नच नव्हे. तथापि यांतून त्या प्रश्नांना अंशतः उत्तरें मिळण्यासारखीं नाहींत असेंहि नाहीं.

'जातिव्यवस्था' पुस्तकांत म्हटल्याप्रमाणें चार हजार जाति मोडण्याची घिसाडघाई करण्यापासून फायद्यापेक्षां तोटेच अधिक आहेत. अर्थात्, जाति मोडण्याऐवजीं वाढत मात्र जातात. अर्थात्, सर्वसाधारण मतपरिवर्तन शावकाश करणें हाच यावर सर्वोत्तम उपाय आहे. चार हजार जातींवरून चार वर्णांवर समाज आला तर, निदान भावी एकंकाराची प्रस्तावना म्हणून तरी या मताचे लोक ती गोष्ट मान्य करतील.तथापि चार हजार जाति मोडण्याची इच्छाहि यांत कोठें दर्शविलेली नाहीं ही गोष्ट खरी. या जगांत कोणतीच गोष्ट पूर्ण नाहीं या भगवद्वचनावर विश्वास ठेवून या चार हजार जातींचा द्वेष मोडणें एवढाच काय तो खरा उपाय पूर्वी अनेकवार केला व तोच

फिरून करावा असें लेखकाचें मत आहे. परंतु ही इच्छा योग्य वा शक्य असेल तर यापूर्वी नाहीं तरी यापुढेंहि दाखवितां येण्यास कांहीं हरकत नाहीं.

चार हजार जाति शक्य व इष्ट तर खुशाल मोडाव्या अगर मोडण्याचा प्रयत्न करावा. त्या राष्ट्रघातक ठरतील तर मोडण्यावांचून गत्यंतरच नाहीं. तत्संबंधीं प्रयत्न चालूच आहेत. सर्वंकष काल, इंग्रजी राज्य आणि परंपरा-घातक शिक्षण, अत्यंत सफाईनें भेदभंजन करीत असलेलीं प्रवासाचीं सुलभ साधनें यांमुळें जातींतील रोटीबंदपणा जातच आहे. जातींतील बेटीबंदपणा जाण्यासहि खान-पाणंदीकर-विवाहानें सुरुवात केलीच आहे. या कोणत्याहि प्रयत्नांच्या आड येण्याचें सामर्थ्य या निबंधांत निदान आज तरी नाहीं.

तथापि, राष्ट्रघातक प्रयत्न मोडतांनाच दुसरा 'राष्ट्रघात' मात्र साधूं नका, असा इशारा देण्यापुरतेंच काम करावें असा आमचा हेतु आहे. वर्णसंकर राष्ट्रघातक आहे, अशी लेखकाची पूर्ण आणि चालंचाल खात्री आहे. वर्णसंकरानें विचार व आचारदार्ढ्य—ज्याला शील असें दुसरें नांव देतात तें—नष्ट होतें. रोमन व ग्रीस साम्राज्यांत असा साम्राज्यसंरक्षक प्रयत्न म्हणून करण्यांत आला, पण तो राष्ट्रनाशक झाला हें लक्षांत ठेवून आजचे उद्धारक त्याउलट प्रयत्न करतील तर कांगावा नको आहेत ! वर्णव्यवस्थेंतील 'जन्मजातता किंवा बेटीबंदपणा म्हणजे विशिष्ट शीलाच्या आणि शरिराच्या जातींतच लग्न होऊं देणें, ही गोष्ट कोणतेंहि संकट वाटलें तरी टाकतां कामा नये. या किंवा यासम जे प्राणिशास्त्रांत किंवा वनस्पतिशास्त्रांत प्रयोगानें सिद्धांत स्थापन झाले आहेत, ते आपल्या लहरीखातर किंवा प्रेमाच्या विपरीत पडद्याआड लपून तोडा-वयाच्या मार्गास कोणी लागूं नये किंवा असल्या मार्गास कोणी प्रवृत्त करूं नये एवढा इशारा देण्याचें कार्य जर या लेखानें होत असेल तर लेखकाला पाहिजे तें मिळालें असेंच तो समजेल. वास्तविक लेखक 'सत्य तें सत्य' या प्रेरणेनें प्रवृत्त झाला आहे. पूर्वी हिंदु चातुर्वर्ण्याचे बाबतींत जो प्रचार झाला आहे तो मोडून सत्य स्थापन करावें एवढी एकच इच्छा त्यानें बाळगली होती व आहे. चातुर्वर्ण्यासंबंधानें नाहक आक्षेप घेतले जातात ते आपल्या समजुतीस आल तेवट खोडावे

एवढीच त्याची अल्प महत्त्वाकांक्षा. त्यामुळें त्या चातुर्वर्ण्याचा वास्तविक विकास कसा व केव्हां झाला हें दाखविणें त्यास भाग पडलें. चातुर्वर्ण्याची भावी आवश्यकता ही ती आजच्या शास्त्रज्ञांच्या कसोटीस उतरते यावरून सिद्ध होते, ही गोष्ट आजच्या शास्त्रज्ञांच्या दृष्टीनें सिद्ध नसती किंवा अनिष्ट ठरती तर त्यानें काय केलें असतें हा प्रश्न प्रस्तुत तरी अनावश्यक होय.

३. दोन वर्ण असतांना आर्यांनीं एक महत्त्वाचें धोरण आंखलें. तें इतकें उज्ज्वल आहे कीं, त्यापुढें आजच्या सर्व सुधारणा फोल आहेत. तें इतकें मोठें आहे कीं, त्यापुढें आजच्या सर्व राजकीय आकांक्षा कवडीमोल आहेत. त्याकरितां कराव्या लागणाऱ्या प्रयत्नांचा व्याप एवढा मोठा आहे कीं, त्यांत हिंदुस्थानांतल्या सुशिक्षित म्हणविणाऱ्या सर्वांचा हातभार लागला तरी प्रयत्न कमीच वाटणारा आहे. पूर्वीचे आर्य लोक जर खरो-खरीच हिंदुकुश खिंडींतून आलेले अल्पसंख्याक लोक असतील तर त्यांनीं केलें हें कार्य पाहून प्रत्येकास अचंबाच वाटला पाहिजे. तो काल जर तमो-युगदर्शक असेल आणि आज जर विजेच्या लखलखाटाप्रमाणें ज्ञानयुगाचा प्रसार झालेला असेल तर त्या कालच्या आर्यांनीं केलें तें खरोखर अभूत-पूर्वच काय, पण भविष्यकालीं कधीं न होणारें काम केलें असें म्हणावें लागेल. त्या खायबर घाटांतून कितीसे लोक प्रवासाच्या साधनांच्या अभावीं येऊं शकले असतील! आजच्या ब्राह्मणांची संख्या घेऊन गेल्या निदान पांच हजार वर्षांत ही चाल श्रेढीनें झाली असें समजून मूळ संख्या कोणती हें गणितानें काढतां येईल. इतक्या अल्पसंख्याकांनीं खायबर घाटापासून तों कन्याकुमारीपर्यंत किंवा सीलोनपर्यंत किती अल्प वर्षांत आपल्या संस्कृतीचा प्रसार केला याची कल्पना केवढी उद्बोधक आहे बरें! नाहीं छापखाने, नाहीं आगगाड्या, आगबोटी किंवा विमानें; किंबहुना, साधे सडकेचे रस्ते सुद्धां! सबंध अरण्य तुडवीत तुडवीत व कापत कापत जाऊन आणि दऱ्याखोऱ्यांतल्या राक्षसांनीं उत्पन्न केलेल्या ताप (malaria, consumption इ.) यांना जरूर ते बळी देऊनहि त्यांनीं 'देवा, विश्वं सर्वं आर्यं कृणुहि' ही आरोळी किंवा प्रार्थना ठोकली व आपल्या पराक्रमांनीं (कर्मोत्तेजः) आणि कर्मांनीं सत्य करून दाखविली!! त्यांजवळ किल्लेकोट

नव्हते. शत्रूजवळ लोखंडी किल्ले भरपूर होते असें म्हणतात. शत्रूचीं हत्यारेंहि फार भयंकर. शत्रु मायेंत पटाईत. शत्रु शरिरानें बळकट. संपत्तींत त्याचा हात धरण्यास कोणी नव्हता. शत्रूला धर्म नव्हता असेंहि नाहीं. परंतु धर्मा-वांचून त्याचें अडलें नव्हतें! शत्रूजवळ पिण्याची दारू किंवा बाणांची दारू यांत उणीव नव्हती. आणि कित्येक जरी शस्त्रयुद्धें झालीं म्हणतात तरी कित्येक तर म्हणतात

न धरीं शस्त्र करीं मी !

अशा बाण्यानें वागून त्यांनीं हा पराक्रम केला!! इंग्रजांनीं ५।७००० कोसांवरून हिंदुस्थान मायेनें जिंकलें खरें! आणि २५।३० कोटि लोकांत लाख दोन लाखांनीं तें आज टिकविलें! आणि आज सर्वांना निःशस्त्र करून I stand for peace म्हणून ते बोटावर खेळवीत आहेत. हा पराक्रम लहानसहान नाहीं. पण हा सर्व पराक्रम लांब पल्ल्याच्या शस्त्रास्त्रांवर, प्रवाससाधनांच्या सुलभतेवर आणि कपटसाधनांनीं केला! पण या सर्व गोष्टींच्या अभावीं कदाचित् निःशस्त्र युद्धानें अवश्यु ब्राह्मणानें कदाचित् थोड्याशा क्षत्रियाच्या साहाय्यानें हाच पराक्रम निदान निदान ५००० वर्षांपूर्वीं केला या चमत्काराच्या पासंगास सुद्धां हा पुरणार नाहीं! आम्ही म्हणतों त्यांनीं हा जो पराक्रम केला तो

यया दासानि आर्याणि करो नहुषः सुतुकानि ।

या दासांना आर्य बनविण्याच्या कृतीनें केला. त्यामुळें दास आर्य बनून आर्यांची संख्या वाढवून केला. ही जी कृति ती म्हणजे

पारलौकिक शाश्वत संपत्ति मिळविण्याची हाव ही.

हीच गोष्ट आजहि करतां येईल कीं नाहीं! हाच एक शाश्वता संपत्ति घेऊन त्यानें आर्य धर्मांचा सर्व प्रसार भरतखंडभर केला. त्या वेळीं त्याचे शत्रु कोण भेटले!

नास्तिक पाखंडी, ऐहिक लोभाच्या वृत्तीचे असुर, दास, दस्यु, इ. पण सोडून सान्यांना एका संस्कृतीचे—एका विचाराचे, आचाराचे, ग्रंथाचे, एका देवाचे–अर्थात् अपवाद सोडून–करून सोडले ना! असा हा प्रयोग एकदा दोनदा नाहीं, दहादा झाला!! त्या वेळीं आजची परिस्थिति होतीच. म्हणूनच थोडक्यांत म्हटलें तर महाराष्ट्रीय साधुसंतांनीं हीच गोष्ट केली

आहे. आजपर्यंत हिंदुस्थान हें एकच कार्यक्षेत्र असेल पण यापुढें
खरोखरच सर्वच पृथ्वी–विश्वं सर्वं

आर्य करण्याची महत्त्वाकांक्षा बाळगली पाहिजे. त्या कामांत जाति व वर्ण ठेवून त्यांतील द्वेष तेवढा काढण्याची व निपण्याची वेळ येईल आणि अखिल जगांतील राजमुगुट हिंदुस्थानच्या लोकांच्या पायतळीं पडावे अशी परिस्थिति प्राप्त होईल! अशी स्थिति–परिस्थिति–येण्याला जगडव्याळ प्रयत्न फार थोडया लोकांनीं करीत राहिल्यानें कित्येक वर्षांनीं सिद्धीस जाऊं शकेल. अधार्मिकता वाढविल्यानें ही गोष्ट साध्य नाहीं. असें कोणी म्हणेल की, हिंदुधर्म, चातुर्वर्ण्य आणि चार हजार जाति खास अघोरसत्ता आणि जाज्वल्य विषमता, स्त्रीदास्याची परमावधि, हीं घेऊन का तुम्ही सर्व जग आर्य करूं पाहणार? तुम्ही कोणी पाखंडी नसाल. भोळे आणि वेडे खास आहांत. मागल्या तमोयुगांत म्हणून हे पराक्रम तुमचे पूर्वजांनीं केले असतील! गांवढ्या गांवांतल्या त्या गोष्टी मुंबई शहरांत आणि रानावनांतल्या एरंडाच्या गोष्टी महान् अरण्यांतल्या ओकाच्या वृक्षापुढें सांगण्याचेंच तुम्हीं योजलें आहे; पण असल्या काजव्याच्या प्रकाशामुळें काहीं आजच्या अलेंहिन दिव्यांत फेरफार होणें शक्य नाहीं. आणि असल्या खुळचटपणानें कोणी फसणार नाहीं. पण आज देखील जर केवळ निःशस्त्रप्रतिकारानें इंग्रजी साम्राज्याच शस्त्रास्त्रसज्ज असें भूत जमिनींत गाडण्याचे प्रयत्नाला निरूपायानें वेडे झालेले हिंदुस्थानांतील लक्षावधि लोक लागून इंग्रजी साम्राज्याच्या मुख्य प्रधानाला तोंडांत बोट घालायला लावू शकतात आणि जगाची दृष्टि टकमकी वळवूं शकतात तर आजच्या ज्ञानयुगाची पवडी काय वंदेजावी! युगमानाप्रमाणें थोडाफार फेरफार साधनांत होईल. पण ज्ञानयुगांत अज्ञान काय थोडें असतें! समतेंत विषमता काय थोडी असते? भाऊ भाऊ काय एकमेकांचे गळे कापीत नाहींत? ज्ञानी मनुष्य काय अज्ञान्याला नागवीत नाहीं? स्वातंत्र्यांत काय पारतंत्र्याचा मागमूस राहात नाहींत? तसेंच, याउलट पारतंत्र्यात काय स्वातंत्र्य मुळींच नसतें? विषमतेंत समता कोठेंच नसते? आणि अबंधूंत बंधुप्रेम नसतेंच? कितीहि विषमभाव असो, प्रत्येक व्यक्तीस

ईश्वरभक्ति करण्यास पूर्ण मोकळीक आणि मोक्षाचा समान अधिकार ठेवतां येतो.

या गोष्टी गेल्या शतकांचे मागील ३१४ शतकांत महाराष्ट्रीयांनीं दाख-विल्या आहेत. त्यामुळें आजचे तंटे खोटे व बनावट वाटतात, असो. नवीन साधनें ठरवून

विश्वं आर्यं कृणुहि

ही महत्त्वाकांक्षा व ध्येय बाळगतां येण्यासारखें आहे आणि सर्व विषमता नष्ट करूनहि तें करतां येईल. सापाचे विषारी दांत काढल्यावर जसा तो निर्वीर्य होऊन जातो तसे विषमतेचे विषमभाव काढून ती निर्बल करतां येते. उलटपक्षीं जगांतील विषमता काढून टाकण्याला पारलौकिक किंवा तात्त्विक धर्मांत जितका निर्भय व व्यापक अवकाश सांपडतो तितका इतरत्र सांपडत नाहीं. त्यांतल्या त्यांत राजकीय बाबतींत जितकी लबाडी व विरोध चालूं शकतो त्यापेक्षां तात्त्विक धार्मिक बाबतींत कमी. चार हजार जाति राखूनहि तें शक्य आहे. चार वर्णच काय पण दोन वर्ण–आर्य आणि आर्येतर–असे म्हणवितां येतील. थिऑसॉफिकल सोसायटी जशी सर्व जगभर आजकालचे सर्व भेदभाव राखूनहि चळवळ चालवूं शकते तसें आपणांस करतां येईल. असो. हें केवळ मनोराज्य नाहीं एवढें दाखविण्यास या सोसायटीचें उदाहरण पुरे.

या ठिकाणीं दुसऱ्या एका प्रश्नाचा विचार करणें अवश्य आहे. हर-एक मनुष्याला मोक्षाचाच अधिकार द्यावयाचा तर मग सर्व कर्माधिकारच म्हणजे कर्मस्वातंत्र्य द्यावयास कोणती हरकत ? किंबहुना, व्यक्तिगत गुणां-वरून व त्यास आवडेल त्या कर्मावरून त्याची जाति ठरविण्यास काय हरकत ? व्यक्तितः कर्मप्रभाव दिसून येत नाहीं काय ? म्हणजेच शूद्रांत वा अतिशूद्रांत ब्राह्मण्य व ब्राह्मणांत शूद्रता दिसून येते त्या वेळीं त्याच्या गुणकर्माप्रमाणें त्याला जाति दिली म्हणजे द्रोहाला जागाच राहणार नाहीं. अर्थात्, यालाच आजकाल स्वतंत्रता म्हणतात तीच कां देऊं नये ?

पुढें कांहीं पाश्चात्य समाजशास्त्रज्ञांचीं मतें दिलीं आहेत. तीं या भारतांत निर्णयकारक आहेत. केसरलिंगने किंवा National Welfare and

National Decay ह्या ग्रंथमालेंत याच गोष्टीचा विचार केला आहे. अलीकडे गाईम्हशींची दुग्धोत्पादक शक्ति वाढविण्याचा प्रयत्न कसा केला गेला आहे, याचा अभ्यास केला म्हणजे typo किंवा जाति निर्माण करण्याची मानवी कला ईश्वरी नियमास कशी अनुसरून आहे हें दिसून येतें. जाति निर्माण करण्यांत जितका गुणप्रकर्ष साधतो तितका दुसऱ्या कशानेंहि साधत नाहीं. समानविवाहोत्पन्न जन्मजात जाति न मानतां व्यक्तिगत गुणकर्मानें वर्ण वर्णविन्यास गुणप्रकर्ष न साधतां नुकसान मात्र होतें अशी समाजशास्त्रज्ञांची खात्री झाली आहे. जातीमुळें standard of superiority-the one thing essential to general culture — समाजांत जी सामान्य गुणवत्ता पाहिजे असते ती उलटपक्षीं व्यक्तिगत गुणानें जाति वर्णविन्यास त्याची हानि होते. The exceptional endowment cannot be preserved as it requires as its phisiological base a state of tension which Nature cannot support as a permanent condition. ही श्रेष्ठता पुढील पिढींत संक्रांत होत नाहीं. ती केवळ अपवादात्मक असते. केसरलिंग आणखी म्हणतो, की Nature appears to produce talented people and geniuses in proportion to the amount of cultured heritage distributed in the population. तसेंच वाल्टर म्हणतो : A genius must be born of potential germ-plasm. There are no self-made men. Each has within from his ancestry the potentiality of whatever he becomes. No amount of faithful plodding application can compensate for a lack of the divine hereditary spark at the start. गुणवत्ता ही जातिजन्यच असते. आणि जर स्फुलिंग नसेल—हा स्फुलिंग जन्म किंवा वंशजातच असतो—तर केवळ संवरून परिश्रम केल्यानें मनुष्य उत्कृष्ट बनूं शकणार नाहीं. एवढेंच नव्हे तर अगदि The lower tends to pull down the higher (केसरलिंग)— कनिष्ठ गुणांचा मनुष्य वरिष्ठ गुणांच्या मनुष्याला खालीं ओढण्याचा प्रयत्न सारखा करीत असतो. It leads to personal deterioration and proves a cultural retrogression for the human race.

त्यामुळें त्या व्यक्तीचीच नव्हे तर मानव जातीची–निदान तो ज्या समाजांत उत्पन्न होतो त्या समाजाची व तो ज्या समाजांत जाऊं इच्छितो त्या समाजाची अशा दोनहि समाजांची–हानिच होते. तो ज्या समाजांत उत्पन्न झाला त्या समाजाची वाढ होण्याची जी थोडीबहुत आशा ती नष्ट होते, आणि ज्या समाजांत तो जाऊं इच्छितो त्या समाजाला–तो त्यांत समाविष्ट केला गेल्याव–खालीं ओढतो. एवंच, अशा प्रकारें दोघांचीहि हानि होते. म्हणून जातिप्रकर्ष हा व्यक्तिगत गुणप्रकर्षावर अवलंबून ठेवूं नये; निदान ५१७ पिढ्यांत सारखा गुणप्रकर्ष होईपर्यंत वाट पाहिली पाहिजे असें आमचे-कडील स्मृतिकार सांगतात तितकी तरी वाट पाहिली पाहिजे. स्मृतिकार दोन निर्बंध करतातः ( १ ) सवर्णेभ्यः सवर्णासु जायन्ते हि सजातयः। अनिं-द्येषु विवाहेषु पुत्राः संतानवर्धनाः॥ याज्ञवल्क्य ९०; ( २ ) जात्युत्कर्षो युगे ज्ञेयः सप्तमे पंचमेऽपि वा। व्यत्यये कर्मणां साम्यं पूर्ववच्च अधरोत्तरम्॥ मिता ९६. हेच नियम अद्यापहि आजच्या ज्ञान-प्रधान कालांत नवीन शास्त्रज्ञानाहि मान्य आहेत. संतानवर्धनः या शब्दांत (१) गुणप्रकर्ष आणि (२) शाश्वति या दोहोंचाहि समावेश होतो. सारांश, व्यक्तिगत गुणानें जातिश्रेष्ठता शक्य व इष्ट नाहीं.

४. साधनअल्पता: दहा पांच संशयित अर्थांच्या ऋचांवर का या चातुर्वर्ण्याचा डोलारा उभारलेला आहे, असें काकदृष्टि चिकित्सक वाचक म्हणूं लागेल. त्यानें लक्षांत ठेवावें कीं ( १ ) ऋग्वेद कांहीं चातुर्वर्ण्यावरील शास्त्रीय किंवा अशास्त्रीय ग्रंथ नव्हे. ( २ ) ऋग्वेदांत चातुर्वर्ण्याचा उल्लेखहि नसता तरी तत्कालीं चातुर्वर्ण्य नव्हतें असें म्हणतां आलें नसतें. कारण, अनुल्लेख हा तेव्हांच पुरावा होऊ शकतो, कीं ज्या वेळीं उल्लेखाची आवश्यकता सिद्ध होते. चातुर्वर्ण्याचा अभाव दाखविण्याला दलील प्रत्यक्ष वैदिक पुरावा अत्यल्प आहे असें म्यूराहि म्हणावें लागलें आहे; किंबहुना, अनुल्लेख हा या बाबतींत पुरावा नव्हे हें त्यानें कबूल केलें आहे. त्याला उल्लेख आहे तो एकच असून अर्वाचीन अशा दहाव्या मंडलांत आहे असें वाटत असून तोहि आनुवंशिक पण धंदेवाईक (hereditary professions) चातुर्वर्ण्याचा वाटतो. एथपर्यंत कोणी हरकत करणार नाहीं. पण ज्या सुन्या

मंडळींत असा कांहीं पुरावा दिसूं लागतो त्या वेळीं लगेच पगडी फिरवून 'तर मग हा पुरावा अर्वाकालचा'— पुरुषसूक्तोत्तर-असें ठरवूं पाहतो; तेव्हां त्याच्या अमर्याद हातचलाखीची व लबाडाची चीड येऊं लागते, आणि असल्या लबाडीवर आम्हीं आजवर भोळेपणानें अंधविश्वास कसा ठेवला या गोष्टीचा संताप येतो. 'पुरावा' म्हणण्याइतका उल्लेख एकदांहि पुरे होता, मग दहा आधार दाखविल्यावर पुराव्याची अल्पता असें कसें म्हणतां येईल! अनुल्लेखाच्या आधारावर मूर्ख ५०० पानांचें पुस्तक खरडतो आणि वैदिक आणि अवैदिक वचनांचा विरोध दाखवून सगळाच पत्त्यांचा बंगला ढासळला असें समजून विकट हास्य करतो! पण अशा हातचलाखीनें कोणत्याहि धार्मिक प्रथाला अभ्यर्थंग करतां येईल! नवल वाटतें तें हें कीं, त्याची ही हातचलाखी आजवर कशी खपली गेली! (१) शास्त्रीवर्ग वर्गाचें गाढ अज्ञान, (२) अशास्त्री पण विद्वान् सर्वथा 'साहेब बोले आणि दळ हाले' या वर्गांतला आणि नास्तिक बनलेला, (३) चिकित्सक विद्वान् चातुर्वर्ण्यविरोधी, (४) समाज बेफिकीर. अशा चव्हेरी कात्रींत हा प्रश्न सांपडून आजवर लाथाडला गेला. त्यांतून वैदिक वाङ्मयाची दुर्बोधता व व्यापकता, समजुतींच्या साधनांचा अभाव, असल्या निर्णयाची अनावश्यकता, आत्मविश्वासाचा अभाव, उभारून ठेवलेल्या भूताचा मोठेपणा, अशा अनेक कारणांनीं हें भूत गाडण्याचा प्रयत्न कोणींच केला नाहीं. सर्वांत महत्त्वाचें आणि मोठें कारण चातुर्वर्ण्य टाकतां येत नसलें तरी त्याची इष्टताहि विद्वानांस पटेना! तेव्हां झाला आहे त्या प्रयत्नाला हातभार लावण्याचाच विद्वानानें प्रयत्न केला. केवळ 'सत्य तें सत्य', वैदिक काळीं चातुर्वर्ण्य होतें एवढेंच सिद्ध करण्याचे मागें कोणी लागला नाहीं. 'पोटीं उमाळा' असता तर असें घडतें ना! प्रो. जिनशीवाल्यांसारख्यांनीं हा ग्रंथ लिहिला असता तर तो केव्हांच सर्वमान्य होऊन बसला असता! परंतु ग्रंथलेखनाचा कंटाळा आणि वैदिक वाङ्मय पौरुषेय असल्याची भावना यांमुळें त्यांचे हातून हें काम झालें नाहीं. माझ्यासारख्या अल्पज्ञानें हा एवढा मोठा घास घेऊन आत्मविश्वासानें जगाच्या तोंडांत घालण्याचा प्रयत्न हास्यास्पद होण्याचा संभव आहे. हें जाणूनहि मी तो प्रयत्न करीत आहें. याचें कारण एक तर (१) आनुवंशिक अपरोत्तरदर्शक चातुर्वर्ण्य

उत्तम आहे अशी समजूत, (२) वैदिक पुराण्याची वाटत असलेली खात्री, (३) सत्य तें सत्य– मग तें चांगलें असो वा वाईट ठरो– तें बाहेर पडावें ही मानसिक प्रवृत्ति, आणि (४) कोणी तरी प्रयत्नाला सुरवात करावी, जगाचें वेशीपुढें दुखणें मांडावें, चातुर्वर्ण्य सत्य व श्रेष्ठ असेल तर तें माझ्या अशा प्रयत्नानें नष्ट्लें तरी आपल्या स्वतःच्याच गुणानें श्रेष्ठ ठरेल किंवा अनुपयुक्त म्हणून मरेल; पण भगवंताबरोबर आपली क्षुद्र गोपाची सहजासहजीं कां नाहीं वर केली अशी समजूत !

चातुर्वर्ण्य आज भगवान् श्रीकृष्णापासून तरी आहेच. तें त्यापूर्वीचें किती जुनें प्राचीन एवढाच वास्तविक प्रश्न. भगवान् श्रीकृष्ण तें अत्यंत अत्यंत प्राचीन म्हणवितात. असें म्हणण्याचें धाडस कमींत कमी ३५०० वर्षांपूर्वीच्या एखाद्या अलौकिक बुद्धिमत्तेच्या माणसानें–त्याला भगवान् म्हणा वा न म्हणा–करावें आणि तें अवैदिक, त्या पुरुषानंतर सुमारें ३५०० वर्षानंतरचें, म्हणण्यास आम्ही प्रवृत्त व्हावें हा एक मोठाच बौद्धिक चमत्कार नव्हे काय ? चातुर्वर्ण्य दुष्ट, त्यानें आमच्यावर कहर केला, आम्हांला रसातळाला पोंचविण्यास तें कारण असा आज १०० वर्षे आम्ही चाहो फोडीत असतां तें चांगलें, जगाची सुस्थिति करील तर तेंच असें म्हणणारे नवीन समाजशास्त्रज्ञ निघावे हा देखील एक अलौकिक किंवा असामान्य असा चमत्कार होय. समाजशास्त्रज्ञ बोलतो तेव्हां तो कांहीं भरमसाट कल्पना बोलत नसतो, एवढी समजून आहे हें बरें. प्राचीन पौर्वात्य बोलतो तो भरमसाट कल्पना बोलतो अशी समजून आहे. प्राचीनांनीं चातुर्वर्ण्य बनवितांना कांहीं प्रयोग केले असतील, कांहीं अनुभव घेतले असतील, पायरीपायरीनें त्यानें आक्रमण केलें असेल, दुसऱ्या व आपल्या समाजांत अवलोकन करून नियम बांधले असतील, ते नियम कडक असले तरी समाजस्वास्थ्य त्यांत अखेर सापेल अशी खात्री असेल, त्या बाबतींतहि अनुभव घेतले असतील अशी विचारपरंपरा कोणाची दिसत नाहीं. यांची विचारप्रणालिका अशी कीं, चातुर्वर्ण्य आज आहे तसें पूर्वी नव्हतेंच, जें आज पाश्चात्यांत आहे तेंच पूर्वी होतें आणि तेंच उत्तम होतें. किंबहुना, भौकाय तेंच चालत आहे. विरयांताची अशाप्रकारें सर्व होत असतां गप्प बसणें हें अयोग्य वाटतें. ' पूर्वाचार्यांनीं असे प्रयोग केले व अनुभव घेतले

असतील तर ' दासबा त्यांची कोष्टकें, नाहीं तर घ्या आपले शब्द परत ' असें कोणी म्हणेल म्हणूनच चातुर्वर्ण्याचा विनाश होत गेला, हें दाखविण्याचा कांहींसा प्रयत्न केला आहे. त्याचा आणखी विस्तार करतां येण्यासारखा नाहीं असें नाहीं. चातुर्वर्ण्य जर चांगलें तर आमचा इतका अधःपात कां, असें म्हणणारांनीं त्याशिवाय इतर कारणें शोधावीं. शैववैष्णवांच्या कोरड्या भांडणापेक्षां रोमन कॅथॉलिक व प्रॉटेस्टंट आपआपसांत रक्तांनीं माखलेलीं भांडणें मांडूनहि इंग्लंड आज साम्राज्य भोगतें आणि शैववैष्णव गुलाम होऊन बसतात! तेव्हां या स्थित्यंतराचीं कारणें जातीच्या द्वेषापेक्षां इतरत्रच शोधावयास नकोत काय ? ब्राह्मणांनीं राज्य घालविलें पण मराठ्यांनीं कांहीं बांगड्या भरल्या होत्या कीं काय ? असें तात्यासाहेब केळकर 'मराठे आणि इंग्रज' या पुस्तकांत विचारतात त्याप्रमाणेंहि विचारतां येईल कीं, चातुर्वर्ण्यविरहित समाजांत अशीं स्थित्यंतरें काय थोडीं झालीं आहेत. कोठें आहेत ते इजिप्शियन, असीरीयन, रोमन, ग्रीक, कार्थेजिनय लोक ! आम्ही निदान अंगुलीनिर्देश करण्याइतके तरी जिवंत आहोंत ना ! आणि ज्या गुणांचा परिपोष व्हावा, जे लोक निर्माण व्हावे म्हणून हा अट्टाहास केला, ते गुण आजहि अंशतः अस्तित्वांत आहेत अशी साक्ष तरी देऊं शकतों ना ! चातुर्वर्ण्य चांगलें असल्यावर तें सांगण्याला एवढा खटाटोप कशाला ? गुराला ' नाठाळ ' म्हणून मारूं लागल्यावर आणि स्वतःचें दूध स्वतःच पितें म्हणून वर तक्रार करूं लागल्यावर ' अरे, दुधानें ताठलेली कास एकदां पिळून व पिऊन तरी पाहा ' असें सांगण्याची पाळी यावी तसें झालें आहे. चातुर्वर्ण्य वाईट म्हणून ख्रिस्ती पाश्चात्य विद्वानानें आणि आर्यसमाजिस्टानें त्यावर किती झोड उठविली आहे पाहा, बेटीबंद चातुर्वर्ण्यावर सुधारकचमूनें केवढें शरसंधान केलें आहे तें पाहा, सबगोलंकार करायला राष्ट्रीय सभा आणि कम्युनिस्ट कशीं टपून बसलीं आहेत पाहा, आणि इकडे हा जीर्ण म्हातारासा समाज कसा हताश होऊन गेला आहे पाहा, म्हणजे जुनें चातुर्वर्ण्य नवीन समाजशास्त्रानें चांगलें म्हटल्यानें दुधांत साखर पडल्यासारखी झाली असली तरी त्याचें वैशिष्ट्य खुलासेवार दाखवणें, त्याची उत्पत्ति, विकास व भावी परिणा-

मांनी आशा दाखविणें आवश्यक दिसूं लागलें. शास्त्रज्ञ उलट होते तेव्हां सर्वांनीच या चातुर्वर्ण्याची टवाळी केली आणि शास्त्रज्ञ तरफदारी करूं लागले तेव्हां त्या शास्त्रज्ञांचीच उलट व्यवहारज्ञानकुशल टर करूं लागले! अशा कांहीं फेन्यांत आज चातुर्वर्ण्यघटित समाज पडला आहे. चातुर्वर्ण्य प्राचीन, वैदिक व सूक्त आहे हें दाखविण्यास एकहि आधार मिळेल अशी विद्वानांना आशा नव्हती. त्या ठिकाणीं १०१२० वैदिक आधार, अवैदिक वाटेल तितके आधार आणि ते सूक्त असल्याबद्दल आजच्या शास्त्रज्ञाचे आधार इतकी सामुग्री झाल्यावर तें समाजापुढें येऊन त्यांची छाननी व्हावी अशी अपेक्षा कोण करणार नाहीं? चातुर्वर्ण्याच्या सिद्धतेसाठीं एखादा वैदिक ग्रंथ लिहिलेला नाहीं, हेंच त्याच्या प्राचीनत्वाचें एक मोठें लक्षण आहे. त्याचे गोडवे गायले असले आणि अनुभवले असले तरी त्यावर शास्त्रपद्धतीनें ग्रंथ लिहिण्याची आवश्यकता वाटलीच नाहीं. त्यामुळें मूरला निष्कारण मेहनत घ्यावी लागली आणि त्यानें जो उपद्व्याप केला तो शास्त्रीय पद्धतीनें केला नाहीं म्हणून हा खटाटोप करावा लागला. हा निबंध अगदीं काटेकोर शास्त्रीय पद्धतीवर लिहिलेला नाहीं, तथापि त्यांत ऐतिहासिक व विकासपद्धतीनें चातुर्वर्ण्यासंबंधानें आधार देण्याचा प्रयत्न केला आहे आणि अगदीं मूरचें सर्व लिखाण किंवा शब्दन् शब्द खोडण्याचा प्रयत्न केला नाहीं, तरी त्यांतील महत्त्वाचे आक्षेप खोडण्याचा प्रयत्न केला आहे. चातुर्वर्ण्याचें, पुरुषसूक्तांत अलंकारपद्धतीनें मांडणी करण्याइतकें, महत्त्व तत्कालीं ऋषिगणांस वाटलें; त्यांनीं तें एका समाजाचे आनुक्रमिक आणि अंगांगीभावसम (आनुवंशिक व शाश्वत विभाग आहेत असें) दाखविलें! त्यावरून तें त्या वेळीं सुरू केलें असा अर्थ असून त्यापूर्वीचें तें फार प्राचीन आहे असेंच सिद्ध होतें. त्यानंतर प्राचीन मंडलांतूनहि त्याचा उल्लेख आढळून येतो. असमवर्णविवाहाचे सामाजिक परिणाम व्या मिश्र जाति त्यांचीहि उत्पत्ति आणि वाढ वैदिक कालांत दिसून येते. यावेहां आणखी काय पुरावा पाहिजे?

के. वि. का. राजवाडे आणि चिंतामणराव ऊर्फ नानासाहेब वैद्य यांच्यासारख्या बड्या बड्या विद्वानांचीं मतें आमच्याविरुद्ध आहेत हें आम्ही जाणून आहों. पैकीं राजवाडे चातुर्वर्ण्य हे चार भिन्न भिन्न लोकांचें एकी-

करण समजतात, ही गोष्ट अगदींच अशक्य आहे. हिमालयाच्या पठारांवर त्रैवर्णिकांची आणि हिंदुस्थानांत आल्यावर चार वर्णांच्या किंवा चार रंगांच्या लोकांची संघटना ही गोष्ट अस्वाभाविक, अशक्य आणि परंपरेच्या विरुद्ध आहे. कालाच्या दृष्टीनें तर त्यांच्या व आमच्या मतांत जमीन-अस्मानाइतका फरक आहे. कोणीकडे बुद्ध[1] किंवा महाभाष्यकार पतंजलि आणि कोणीकडे वेदपूर्वकाल! तथापि राजवाड्यांची विचारसरणी

---

१ राजवाडे यांनी अशी दोन मतें प्रतिपादलीं आहेत. बापूराव केळकरांनी त्यांच्या पुस्तकाचें सार दिलें आहे त्यांत " जाति म्हणून ज्या म्हणतात त्यांचा उदय हिंदुस्थानांत बुद्धकालीं असा झाला. चातुर्वर्ण्याची स्थापना उत्तर कुरूंत त्रैवर्णिकांनीं केली. [ उत्तर कुरु म्हणजे पामीरचें पठार असें राजवाडे समजतात असें त्यांचे लेखावरून वाटतें. ] शूद्र स्त्रीविवाहाचें नियमन मातृमातृवर्ण्यांचे काय-द्यानें करून चातुर्वर्ण्याची जन्मभर गाजणारी (?) जातिसंस्था नर्मदोत्तर प्रदेशांत बुद्धोत्तरकालीं निर्माण केली. " ( कंस आमचा. ) परंतु इतरत्र त्यांनीं महा-भाष्यकार पतंजलि आणि पाणिनि यांजमधील फरकाचें विवेचन करतांना जाति महाभाष्यकालीन ठरविल्या आहेत. " भिन्नवंशीय वर्ण एकमेकांत मेळून मेळून चातुर्वर्ण्य पैदा झालें आहे. आर्य ब्राह्मण लोक ध्रुवापाशीं राहात (!), पामीरच्या पठारावर लाल वर्णाच्या क्षत्रियांची गांठ पडली (!) व ब्रह्मक्षत्रद्वंद्व निर्माण झालें. नंतर वाणिज्यकृषिपाशुपाल्यप्रवीण लोकांस त्यांनीं वैश्य नांव ठेवलें (!). पामीर-प्रदेशांतून दक्षिणेकडे येत असतां उत्तर मद्र व उत्तर कुरुप्रदेशांत अर्धरानटी लोकांशा गांठ पडली व त्यांना माणसाळल्यावर त्रैवर्णिकांनीं चातुर्वर्ण्यनामक त्रिखंडप्रसिद्ध संस्था निर्माण केली व याच नवीन समाजसंस्थेचें वर्णन पुरुष-सूक्तांत केलेलें आढळतें. ही चातुर्वर्ण्यपद्धति पाणिनीकालापर्यंत बहुतेक अभंग चालली. वैश्य-शूद्र यांचा योग्य व्यवहार यजुःसंहिताकालीं ब्राह्मणक्षत्रियसमा-जांत एक चर्चेचा विषय होऊन बसला होता. ( यजुःसंहिता ही पाणिन्युत्तर असें राजवाडे समजतात म्हणावयाचें!! ) पण हा कालांतरानें ब्राह्मणक्षत्रियसमाजांतहि रूढ होऊन ब्राह्मणांनीं त्रैवर्णिकांना शूद्र स्त्रियांशीं लग्न करण्याची परवानगी दिली. पाणिनीकालीं संकरजाति हा सामाजिक वर्ग स्वतंत्रपणें अस्तित्वांत आला नव्हता.

भिन्नभाषी आणि अपवादक उदाहरणांवरून नियम बांधणारी असल्यामुळें अनैतिहासिक व अयथार्थ आहे. चिंतामणराव धंदेवाईक चातुर्वर्ग्य वैदिककाळीं उत्पन्न झालें असें मानून त्याला आजच्या वर्णांचें स्वरूप महाभारतोत्तर किंबहुना महाभाष्यकाळीं प्राप्त झालें असें समजतात. औपमन्यव जें चातुर्वर्ण्य मानतात तें चातुर्वर्ग्यच असा याचा अर्थ झाला! परंतु येथवर दिलेल्या अनेक प्रमाणांपुढें नानासो वैद्यांचीं प्रमाणें टिकतात असें वाटत

मागील टीप पुढें चालू—

(!ऋग्वेदांतील मिश्र जातींचे उल्लेखहि पाणिन्युत्तर समजावे लागतील!!) इ. इ.. (कंस आमचे.) राजवाड्यांच्या या मतांचें परीक्षण त्यांचे जिवंतपणींच व्हावयास पाहिजे होतें. राजवाड्यांचीं मतें त्यांच्या काळच्या कांहीं इंग्रजी ग्रंथांवरून झालेलीं होतीं हें उघड आहे. त्यांनी वेदाभ्यास—त्यांतील शब्दाभ्यास—चालविला होता—त्याबरोबर त्यांच्या मतांत परिवर्तन खास झालें असतें. पण त्यांच्या अकालीं मृत्यूमुळें जग त्यांच्या परिपक्व विचारांस मुकलें! आणि त्यांच्या अपक्व विचारांस 'जातिभेदांचें गूढ उकलविणारे' असें समजून बापूसो यांनीं कवटाळून मनुस्मृतीवर अनैतिहासिकत्वाचा आणि बिचाऱ्या मनूवर तर 'विसंगतेचा भार वाहणाऱ्याचा' असभ्य आणि विवेकशून्य आरोप केला!! त्यांच्या अभिप्रायावर केसरींत आम्हीं उत्तर दिलें त्यावर बापूसो यांनीं असेंच शिवराळ उत्तर दिलें. केसरीकारांनीं आपल्या अधिकारांत त्यावर प्रत्युत्तर बंद करून जें सौजन्य दाखविलें तें तर अपूर्व होय! बापूसो यांच्या लेखावर केसरीकारांनीं जणुं काय सर्वमान्यतेचा हा जो शिक्कामोर्तब केला त्यावर अपील कोठलें? केसरीकारांना अत्यंत मोंवला असें प्रथम आम्हांस वाटलें. पण आतां खास समजतें कीं, बापूसो यांच्याकडे हीं मतें 'आनुवंशिकतः' आलेलीं आहेत. त्यांचे तेच जाणोत! राजवाड्यांचे भिन्न वंशांच्या व रंगांच्या चातुर्वर्ण्यांत बहुधा (१) आर्क्टिक् प्रदेशांतील शुक्ल ब्राह्मण; (२) रक्तवर्णाचे हूण, अरब किंवा रेड इंडियन; (३) पीतवर्णाचे मंगोलियन; (४) कृष्णवर्णाचे नीग्रो, यांचा समावेश झाला असावा. या असाधारण कल्पनेवर हवी तेवढी टीका करतां येईल. परंतु त्याची आवश्यकता वाटत नाहीं.

नाहीं. नानाशो यांचीं आणखी दोन प्रमाणें आहेत. तीं आम्हीं आतांपर्यंत विचारांत घेतलीं नाहींत. ( १ ) भाषाशास्त्रावरून आयर्लंडपासून हिंदुस्थानापर्यंत सर्व एकच आर्य वंश ते समजतात. तसेंच ( २ ) शरीरमापनशास्त्रावरून आर्य व आर्येतरांचीं लक्षणें ठरवून आणि त्यांवरून भिन्न लोकांची संतति हिंदुस्थानांत आहे असें ठरवून त्यावरून अनुमानें काढावयाचीं ! यांपैकीं तुलनात्मक भाषाशास्त्रावरून आर्यवंशाचे लोक कॉकेशस पर्वतावरून चोंहींकडे पसरले ही कल्पना आज पाश्चात्यांत कोणी मानीत नाहीं. खुद्द मॅक्स मुल्लरनेंहि ती स्वतःच हयातींतच सोडून दिली. ( ३ ) शरीरमापनशास्त्राचे सिद्धांत अद्याप अगदींच अपक्व आहेत. "रिस्लेनें तें अंगिकारून आपल्या 'पीपल् ऑफ् इंडिया' पुस्तकांत तज्जन्य अनुमानें काढलीं नसतीं तर शास्त्रज्ञांनीं तिकडे ढुंकूनहि पाहिलें नसतें ! " युरोपमध्यें ज्या कवट्या सांपडलेल्या आहेत त्यावरून हीं अनुमानें काढलीं. तीं व हिंदुस्थानांतील लोकांस लावण्यास–किंवा त्यांवरून हिंदु लोक अनार्य ठरविण्यास–काय आधार ! नानाशो यांनीं हे आधार प्रमाण मानावे हें आश्चर्य आहे. कांहीं शास्त्रज्ञांचीं मतें परिशिष्टांत दिलीं आहेत त्यांवरून ज्यानें त्यानें आपलें अनुमान बांधावें. हिंदुस्थानांत हजारों वर्षे प्रेतें जाळण्याची पद्धति अंमलांत असल्यामुळें येथील आर्यांच्या कवट्या कोणास सांपडणें शक्य नाहीं. आर्य भाषा बोलणारे ते सर्व आर्य नव्हत, ही गोष्ट आतां सर्वमान्य झाल्यामुळें युरोपांतील कवट्यांवरून हिंदुस्थानांतील आर्य-अनार्य ठरविण्याच्या पद्धतीचा जितका प्रतिकार करावा तितका थोडाच. अशा तर्कटांना अनुमान व शास्त्रपद्धतीचें स्वरूप यावें हेंच आश्चर्य. असल्या अनुमानांवरून मनुस्मृतींतील शास्त्रसिद्ध गोष्टींची टवाळी करण्यास कोणी अशास्त्र अल्पज्ञ पाईक सिद्ध झाला तर त्या टवाळीला सूर्यावर थुंकण्यापेक्षां अधिक किंमत येणें शक्य नाहीं. चातुर्वर्ण्याच्या हजारों जाति झाल्या. आतां आपण एक जाति बनविणें इष्ट आणि पाश्चात्यांनीं आजवर वर्णविभाग टाळले त्यानीं पाहिजे तर आजची चातुर्वर्ण्यपद्धति घेऊन आपला समाज चातुर्वर्ण्यघटित बनवून पाहावा. ही व्यावहारिक अशास्त्रीय कल्पना विचारांत घेण्यालायकीचीहि नाहीं. तथापि ती केसरीकार तात्यासो केळकर यांची खास आहे असें समजतें. तेव्हां तिचा थोडा विचार करणें अवश्य आहे.

पाश्चात्यांत वर्णकल्पना नसली तरी वर्णभेद झाले होते, ही गोष्ट केसरलिंगानें व इतर समाजशास्त्रज्ञांनीं कबूल केली आहे. त्यांनीं अलीकडे सुमारें ५०।७५ वर्षांत हा वर्णभेद मोडण्याचा प्रयत्न केला असला तरी शास्त्रज्ञांनीं–प्राणिशास्त्र, वनस्पतिशास्त्र, समाजशास्त्र व मानसशास्त्र यांतल्या तज्ज्ञांनीं–यावर शरसंधान करण्यास आरंभ केला आहे. 'नॅशनल वेल्फेअर अँड नॅशनल डीके' या पुस्तकाचा कर्ता म्रु. मॅकडुगल यानें शास्त्रज्ञ आणि व्यवहारज्ञ यांचे विचारांत किती व कशी तफावत पडली आहे हें दाखवून व्यवहारज्ञाची चांगली हजिरी घेतली आहे आणि त्यास स्वमतानुयायी बनवून एका स्वतंत्र बेटांत नवीन 'ब्राह्मणजाति' उत्पन्न करण्याची महत्त्वाकांक्षा बाळगली आहे. यापेक्षां ब्राह्मणजातीचें महत्त्व व आवश्यकता आज किती आहे तें वेगळें दाखविण्याची जरुरी नाहीं. हा ब्राह्मण उत्पन्न करून जर प्रत्येक देशांत पाठवावयाचा आहे तर तो येथेंच पैदा झालेला काय वाईट? आनुवंशिक, आनुक्रमिक, आंतर्विवाहबद्ध, व बहिष्कारपूर्वक गुणविशिष्ट जर ब्राह्मण बनवावयाचा तर तसाच क्षत्रिय व वैश्य कां बनवूं नये? आंतरविवाहानें हजारों जाति बनल्या व एकेका समाजांत ५०।७५ च व्यक्ति राहण्यापर्यंत वेळ आली म्हणून जाति मोडून सवगोलकार करावयाचा; पण सवगोलंकारानें गबाळ व गचाळ माणसें उत्पन्न होतात व समाज नष्ट होण्याच्या पथास लागतो याची वाट काय? कांहीं थोडा समाज नष्ट होण्याचा टळावा म्हणून सर्व समाज नष्ट करण्याच्या पंथास लागावें हा कुठला व्यवहारकुशलपणा? पाश्चात्यांत वर्णभेद नसतांना तो समाज उच्च पदाधिष्ठित झाला ही कल्पनाच शास्त्रज्ञ असत्य व अनैतिहासिक मानतात. त्यांनीं वर्णभेद उत्पन्न न केला तर तेहि आजपर्यंतच्या इतर समाजाप्रमाणें नष्ट होतील–कदाचित् नष्ट होण्याच्या पंथाला ते आजच लागले असतील–असें शास्त्रज्ञ ओरडूं लागले आहेत. सुधारणा–खरी सुधारणा–मानवी मनाची परिस्थिति जाणून केली पाहिजे. हजारों वर्षांत मानवी मनाची उत्क्रांति झालेली आढळत नाहीं. कदाचित् अपक्रांतीच झालेली असेल. अशा स्थितींत ही अपक्रांति वाढविणारी सुधारणा (!) पैदा करून राजकीय अधःपात वाढ-

विणार की समाजांत करारीपणा, शील, उद्यम वादविणारी संस्कृति जेणें करून वाढेल आणि हे गुण नाहींसे कां होत आहेत याचीं कारणें शोधून गुणदृष्टीचा स्पष्ट करणार ! दोन मानसिक अधःपात झालेल्या व्यक्तींचा विवाह तो अधःपात वाढवीत असतात. भिन्न विषम जातींतील विवाह गुणहीन मिश्र संतति उत्पन्न करतो. हापुस आंबा गोड असला तरी स्वजाति निर्माण करीत नाहीं; खेचर सेवाधर्मांत टणक असलें तरी प्रजोत्पादनशक्ति धारण करीत नाहीं; या गोष्टी लक्षांत घेतल्या पाहिजेत. *व्यक्तिगत गुणांवर मुळून उपयोगी नाहीं. थोरला वेताचें साम्य कधींच* येणार नाहीं. मिश्रजाति गुणोत्कर्ष कधीं कधीं साधतात; पण केव्हां ? समान भूमिकेवर असतील तेव्हां. विषम भूमिकेवर असलेल्या दोन व्यक्ति बहुधा कमअसल जाति उत्पन्न करतात हें तत्त्व खोटें ठरेपर्यंत त्याच्या नादीं लागून गुणहीनता उत्पन्न करूं लागणें म्हणजे 'अधोधो गंगेयं भवति विनिपात शतमुखः' या तत्त्वाप्रमाणें महाबलाच्या उत्तुंग शिखरावरून अवतरण करण्यास सुरवात करण्यासारखेंच असणार, हें खास.

## पंचजन व पंचवर्ण

१. चातुर्वर्ण्याचा किंवा चातुर्वर्ग्याचा आणखी एक आधार म्हणून 'पंचजनांचा' कित्येक उल्लेख करतात [भारतीय साम्राज्य भाग १ व ८]. यास्कपूर्व एक निघंटुकार 'औपमन्यव आणि शाकटायन हेहि पंचजनांत चातुर्वर्ण्याचा समावेश होतो' असें मानतात (यास्क आणि बृहद्देवता पाहा.) कोणी कोणी स्मृतिकारहि पांच वर्ण मानतात. परंतु मनुस्मृतीच्या मतानें वर्ण चारच, पांच नव्हेत. चतुर्थ एकजातिस्तु शूद्रो नास्ति पंचमः॥ म.स्मृ. याचा अर्थ असा कीं, शास्त्रीय दृष्टीनें वर्णांची व्याख्या करूं गेल्यास पांच वर्ण होऊं शकत नाहींत. असंस्कृत असा जो चवथा वर्ण त्यांत यच्चावत् सर्वांचा समावेश करावयाचा. निषाद म्हणा कीं अतिशूद्र म्हणा त्याचा समावेश या चवथ्या विभागांतच करावयाचा. उलटपक्षीं इतकी काटेकोर पद्धति न स्वीकारता कोणी पांच वर्ण समजतात. भगवद्गीतेंत दोनहि प्रकार आढळतात.

२. पंचजन किंवा त्याचे दुसरे पर्याय म्ह. पंचकृष्टयः, पंचचर्षणीः, पंचमनुष्याः, पंचजाताः हे शब्द ऋग्वेदांतील प्रत्येक मंडलांत आलेले आहेत.

असे एकंदर बावीस[1] उल्लेख आहेत. यांतील कांहीं उल्लेख केवळ देवांच्या पंचजनाचे असतील. ते वगळले तरी केवळ देवेतर असे सु. १८-१९ उल्लेख सांपडतील. त्यांपैकीं कांहींत पृथ्वीवरील सर्व (यच्चावत्) मानवजात असा अर्थ घ्यावा लागेल. बाकी ठिकाणीं वरील अर्थ मान्य केला तरी चातुर्वर्ण्याचा उल्लेख प्रत्येक मंडलांत आहे असें मानावें लागतें. तसें मानल्यास चातुर्वर्ण्य वेदपूर्व आहे, याबद्दल निराळा पुरावा देण्याचें कारण पडलें नसतें असें एक परी वाटतें. तथापि चातुर्वर्ग्य आणि चातुर्वर्ण्य यांतील भेद दाखविण्याकरिता निराळा पुरावा द्यावा लागलाच असता.असो.

२. जन, वर्ग, वर्ण, वंश, विश हे सर्वच लोकविभागसूचक शब्द आहेत.यांपैकीं जन व विश हे शब्द व्यापक अर्थाचे असून शिवाय संकुचित अर्थानेंहि त्यांचा उपयोग करण्यांत येतो.जन हा शब्द सर्वसामान्य जनवाचक असून शिवाय 'शूद्र' शब्द उत्पन्न होण्यापूर्वी त्याचा 'शेषवर्गार्थी' म्हणजे 'चवथ्या वर्णाचा' या अर्थी आर्य उपयोग करीत, आणि असुरांतील चवथ्या वर्णास 'इतरे जन' असा शब्द वापरीत, असें पूर्वी दर्शविलें आहे. यावरून असेंहि अनुमान करतां येतें कीं, जन हा शब्द आर्यासुर समाज एक असेल त्या वेळींच मूळ सामान्यतः लोकवाचक म्हणून किंवा किरकोळ लोक या अर्थी उपयोगांत आला असावा. दोन समाजांचें विभजन झाल्यावर दोघेहि त्या शब्दाचा उपयोग करूं लागले. मूळ 'ज्ञा' जन किंवा kin किंवा genus (L.).genos ( gr. )असा शब्द सर्व लोकांत व भाषांत असावा. (**स इज्जनेन स विशा**...ऋ. २.२६.३ पाहा.) वंशांच्या कथा पाश्चात्य लोक सेमेटिक, हेमेटिक, जॅफेटिक–मुख्यतः भाषेवरून विभाग करतांना–या तीन लोकांपासून करतात किंवा श्वेत ( आर्य ), रक्त ( रे. इंडियन ), पीत ( मंगोलियन ) व कृष्ण ( नीग्रो ) आणि मिश्र असा पंचवंशात्मक करतात. पौर्वात्य लोक वंश, जाति, वर्ण, जन, या शब्दांपासून

१—१-७ ९,१७६.३; २ २.१०; ३ ५३.१६,३७.९-५९.८; ४-३८.१०; ५-३५.२, ८६.८; ६-१४.१४, ४६.७; ७-१५.२, ७५.४,७९.१; ८-९.२, ३२.२२; ९-६५.२३, ९२.३,१०१.९; १०-३५.६,६०.४, १०९.६.

करतात. त्यांत जन हा शब्द प्रथम कौटुंबीय, नंतर लोकवाचक, नंतर वंशवाचक इ. झाला.

पंचजन व त्याचे पर्याय मिळून २२ वेळां हे शब्द ऋग्वेदांत येतात. पर द्विवर्ण, त्रैवर्ण्य किंवा चातुर्वर्ण्य असा एकदांहि येत नाहीं. बहुधा असें म्हणतां येईल कीं, वर्ण शब्दाचा उपयोग करूं लागल्यावर जन शब्द मागें पडून तो ब्राह्मणकाळींच समजेनासा झाला व ब्राह्मणांत त्याचें निर्वचन करणें भाग पडलें. हे दोन शब्द एकअर्थी नाहींत, यांत शंका नाहीं; तथापि त्या दोन शब्दांचा उपयोग एकअर्थींच असावा, अशी कल्पना औपमन्यव आणि बृहद्देवताकारांची दिसतेच. ती बरोबर असो वा नसो, त्यापूर्वीच चातुर्वर्ण्याचें अस्तित्व मानण्यावांचून गत्यंतरच नाहीं. यास्काचार्यांचा काल शकपूर्व ५०० (युरोपीय मत) तर ८०० ते १२०० असा आमच्या कै. राजवाडे आदि मंडळींचा कटाक्ष. औपमन्यव जर व्यासशिष्य उपमन्यूचे प्रशिष्य असतील तर त्यांचा काल शकपूर्व २-३००० वर्षांचा स्थूल मानानें. तोच काल गीतेचा. गीताकार 'मया सृष्टं' म्हणतात; अर्थात् त्या वेळीं तें फार फार प्राचीन म्हणून प्रसिद्ध. अर्थात्, वेदपूर्व असें गृहस्थास आणलें २-३००० वर्षें तरी तें मागें टकलें पाहिजेत. इतक्या प्राचीन कालापासून आजवर टिकलेली अशी ही जगांत एकच संस्था आहे. मग ती कोणाला गोड वाटो अगर कडु वाटो. गीतेंत चारच काय पण पांच वर्ण दिसतात व हे पांच वर्ण म्हणजेच पंचजन अशी त्या वेळची समजूत. याचा अर्थ असा कीं, पांच वर्णांखेरीज त्या वेळीं दुसरी अशी ज्ञात संस्था नव्हती, कीं ज्या संस्थेला हें नांव देतां येईल. म्हणून ते तो शब्द पंचवर्णांचा द्योतक समजले. परंतु त्यापूर्वी वैदिक वाङ्मयांत हा अर्थ आढळत नाहीं.

वैदिक वाङ्मयांत या शब्दाचे अर्थ तीन ठिकाणीं तरी दिलेले आढळतात :—

( १ ) अथर्ववेदांत, पंचजनांचाच उल्लेख दिसतो तो असा :

गंधर्वाप्सरसः सर्पान् देवान् पुण्यजनान् पितॄन् ॥

दृष्टान् अदृष्टान् इष्णामि यथा सेनां अमूं हनन् । अथर्व. ८.८.१५.

(२) ऐतरेय ब्राह्मण : देव, मानव, गंधर्वाप्सरस, सर्प आणि पितर

(३) इंद्र, पूषा, भग, पृथिवि, अदिति असे पंचजन ऋ. ६.५१.११ या ऋचेंत दिसतात ( श्रुतिबोध भाषांतर पाहा. ). हे केवळ देवांतले ' पंचजन ' म्हणतात ते असावे. यास्काचार्यांनी दोन तीन मतभेद सांगितले आहेत ते असे :



(१) दिव्य पंचजन. दिवीव पंचकृष्टयः ॥ ऋ. १०.६४.४

आदितिः पंचजनाः

(२) यज्ञियासः पंचजनाः अर्थात् दैवी पंचजन

ऊर्जादः उत यज्ञियासः पंचजनाः मम होत्रं जुषध्वम् ॥ ऋ.१०.५३.४

पंचजना मम होत्रं जुषंतां गोजाता उत ये यज्ञियासः ॥ ऋ.१०.५३.५

(३) द्यु अंतरिक्ष व भू पंचजनः

यद् अंतरिक्षे यद् दिवि यत् पंच मानुषा अनु नृम्णं तद्धत्तं अश्विना ॥ ऋ. ८.९.२

(४) गंधर्वा पितरो देवाः असुरा रक्षांसि इत्येके ॥

(५) चत्वारो वर्णाः निषादः पंचम । इति औपमन्यवः ॥

वर उल्लेखलेल्या पंचजनाचा एकत्र विचार केल्यास असें दिसून येतें कीं, भू, अंतरिक्ष व द्यु या तीनहि लोकांत पंचजन आहेत असें प्रत्यक्ष ऋग्वेदांतच सांगितलें आहे. यातील दैवी पचजन ' यज्ञिय ' आणि ऊर्जाद आहेत असेंहि ऋग्वेदांत म्हटलें आहे. दैवी पंचजनात इंद्र, पूषा, भग, अदिति, पृथ्वी यांचा समावेश होत असावा. यांतील पूषन् हा शूद्र आणि इंद्र हा क्षत्रिय असून भग हा वैश्य मानतात असें वाटतें. त्यात शूद्राचाच उल्लेख असून ब्राह्मणाचाच उल्लेख नसावा, ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे.

यासेरीज जे पंचजन वर्णिले आहेत ते तरी भूपृष्ठावरीलच मानव समजावयाचे कीं नाहीं यावद्दलहि शंकाच वाटते. कारण अथर्ववेदांत ते दृष्ट आणि अदृष्ट असे वर्णिले आहेत. यापैकीं दृष्ट तेवढे मानव आणि अदृष्ट तेवढे देवयोनिविशेष किंवा देव अशी कल्पना करून चालूं या. तरें मानल्यास

अथर्ववेदांतील मानव पंचजन — देव, गंधर्वाप्सरस्, पितर, सर्प आणि पुण्यजन.

ऐतरेय ब्राह्मणांतील— देव, गंधर्वाप्सरस्, पितर, सर्प आणि मानव.
यास्कोल्लिखित एक— देव, गंधर्व, पितर, असुर आणि राक्षस.
औपमन्यव— चार वर्ण आणि निषाद.

यावरून दिसून येतें कीं, औपमन्यवाचा अर्थ अगदींच एकांडा आहे. बाकीच्या तीन अर्थांत देव, गंधर्व (यांतच अप्सरांचा समावेश होऊं शकेल.), पितर हे तिघांत तीन सामान्यच आहेत. फरक आहे तो (१) सर्प, पुण्यजन, राक्षस व असुर आणि मानव यांविषयीं आहे. पैकीं सर्पांचा उल्लेख दोघे करितात. पुण्यजन आणि राक्षस एकच असें अमरकोश म्हणतो. तर पुण्यजनांत यक्षहि येतात, असें आपटेकोश सांगतो आणि अमरकोशाचे टीकाकारहि दुसऱ्या एका कोशाचा आधार देतात. यास्क ज्यांचा उल्लेख करितात, ते सर्पांचे ऐवजीं असुर आणि पुण्यजनांचे ऐवजीं राक्षस सांगतातच. ऐतरेय ब्राह्मण तेवढेंच मानवांचा उल्लेख करतें. सर्प आणि असुर एकच असले तर—आर्यांचे दृष्टीनें ते सर्व एकच आर्येतर, मग त्यांत राक्षसांचाहि समावेश व्हावा—देव, गंधर्व, पितर, असुर आणि राक्षस हे पंचजन ठरतात. असुर आणि राक्षस एकच आर्येतर असल्यामुळें बहुधा ऐतरेय ब्राह्मण सर्प चवथे आणि मानव पाचवे असें सांगतें. अर्थात्, त्याचे दृष्टीनें देव, गंधर्व, पितर, असुर आणि मानव हे पंचजन. आणि हेच पंचजन मानावे असें आम्हांस वाटतें.

जनानां पचक्षितीः मानुषीः बोधयंती उषाः॥ ऋ. ७.७९.१
या ऋचेवरून मानवांचा उल्लेख पंचजनांत केलाच पाहिजे असेंहि वाटतें. यापैकीं देवांत चातुर्वर्ण्याची कल्पना बृहदारण्यक करून देतें. इतरांत होतें कीं नाहीं सांगवत नाहीं.

अर्वाचीन लोक पंचजनांचा अर्थ याहून कांहींसा भिन्न करतात. त्यापूर्वी आणखी एक दोन गोष्टींचा विचार करणें अवश्य वाटतें.

(१) त्वां एकं नु पांचजन्यः। ऋ. ५.३२.११, (२) (इंद्रः) चर्षणीनां सम्राजम्॥ ८.१६.१, यावरून पंचजन हे सर्व इंद्रपूजकच असा-

येत असें वाटूं लागतें. पण मग वर उल्लेखलेले सर्व असुर आणि राक्षस हे इंद्रपूजकच असें समजावें लागतें. पर्शियन असुरांत 'वरेत्रेघन' (वृत्रघ्न) शब्द येतो; त्यावरून कांहीं असुर तरी इंद्रपूजक दिसतातच. अर्थात्, त्यांनीं मागून इंद्राला सोडलें. शिवाय ते जे इंद्रपूजक नाहींत असे कोणी लोक असलेच पाहिजेत. अर्थात्, पंचजन सर्वच इंद्रपूजक असल्यास इंद्रपूजक नसणारा असा जनांचा एक सहावा विभाग करावा लागतोच.

(२) इहि पंचजनान् अति ॥ ऋ. ८.३२.२२

यावरून तर पंचजनांखेरीजहि इंद्रपूजकहि असावे व त्यांत या ऋचेंतील ऋषि असावे असें अनुमान करणें प्राप्त होतें. अर्थात्, इंद्रपूजक असे सहा जन असून इंद्रपूजक नाहींत असे सातवे लोक ठरतात. तर

(३) सप्तमानुषः अग्निः। श्रितः विश्वेषु सिंधुषु ॥ ऋ.८.३९.८

ही ऋचा असें दर्शवितें कीं, सात मानव अग्निपूजक असून अग्निपूजक नसतील ते आठवे मानव. अशीहि येथें शंका येते कीं,

(४) पांच नद्यांवरचे ते पंचजन, (५) सप्तसिंधूवरचे सप्तमानुष असा मूळचा अर्थ असावा. नदी ही बहुधा एकेका देशविभागाची सीमा असते. अर्थात्, प्रत्येक नदीवरचा एकेक देश (क्षिति) आणि तेथील लोक ते एकेक जन. ती नदी ही त्याची जनि किंवा माता व पोषण करणारी. सरस्वतीला पांच नद्या मिळतात असें यजुर्वेदांत सांगितलें आहे.

पंचनद्यः सरस्वतीं अभियंति सस्रोतसः ॥ ३४·११
सरस्वती तु पंचधा सो देशेऽभवत्सरित् ॥ ११

तेव्हां कदाचित् मूळ सरस्वतीतीरावरील व तिला मिळणाऱ्या पांच नद्यांवरील लोक ते पंचजन असतील. तीनहि लोकांत असणारी सरस्वती 'पंचजाता वर्धयताम्', 'वाजे वाजे हव्याभूत' (ऋ. ६.६.१२) असें जें म्हटलें आहे त्यावरून पांच नद्यांवर उत्पन्न झालेले, राहणारे व त्यांनीं पोसले जाणारे ते पंचजन, असा अर्थ मूळचा असावा. पंचजाता शब्दावरून ते मूळचेच सरस्वतीतीरावरचे (autochthonous) असावेत, असा अर्थ होतो. यस्य त्रिधातु रस्तयोः पचक्षितीना वसुः। स्वाध्यस्व यो अस्मध्रुग् दिद्युा इव अशनिर्जहि ॥ (ऋ. १.१७६.३) यात पंचक्षितींचे धन इंद्रा-

ल्याच स्वाधीन आहे, असें म्हटलें असून त्यांत आमचे शत्रूहि (द्रुह्) आहेत असें म्हणावें लागतें. आणि त्यानंतर लोक सप्तसिंधूंत गेले ते सप्तमानुष असतील.

(५) यः पंचचर्षणीरभि ता इंद्राग्नी हवामहे ॥ ऋ.५.८६.२
यः पंचचर्षणी: अभि रयिं येन वनामहे ॥ ऋ. ९.१०१.९
यः पंचचर्षणीरभि निषसाद दमे दमे । कविर्गृहपतिर्युवा ॥
ऋ.७.१५.२

अभि हें अव्यय अभिमुखता किंवा विरोध दाखवितें (यास्क). तथापि ऋ. १.१५.२ यांत विरोध असा अर्थ असणें शक्य वाटत नाहीं. ऋ. ५.८६.२ व ९.१०१.९ यांत अभि विरोधार्थी असू शकेल वा नसेल. ऐतरेय व शतपथब्राह्मणांत भारत व पंचजन यांचें शत्रुत्व दाखविलें आहे, त्यावरून पंचजनांचा इंद्र तसाच पंचजनांविरुद्धहि इंद्र होता, असें म्हणण्यास हरकत नाहीं. अर्थात्, पंचजन हे केव्हां इंद्रपूजक असतील तसे केव्हां इंद्रविरोधीहि असतील. ऋ. ७.१५.२ मध्यें इंद्रपूजक आणि ५.८६.२ व ९.१०१.९ यांत त्यांचा व इंद्राचा विरोध मानतां येईल; तथापि मानलाच पाहिजे असें नाहीं. अभि = व्यापून राहणारे असा अर्थ घेतां येण्यासारखा आहे. तथापि वरील ब्राह्मणांत भारत व पंचजन यांत विरोध होता. अशी परंपरा असल्यामुळें तो अर्थ चुकीचा होणार नाहीं.

आतां अर्वाचीन लोकांच्या अर्थाकडे वळूं. (१) रॉथ, गेल्डनेर व न्या. मू. चापेकर (औंध हायकोर्टाचे जज्) 'पृथ्वीवरील सर्व लोक'[१] असा अर्थ घेतात (वे. इं. व चापेकरांचे वैदिक निबंध पाहा.). मध्यदेश आणि

१— पृथ्वीवरील सर्व लोक हा एका दृष्टीनें संकुचित तर एका दृष्टीनें विस्तृत अर्थ. वर्ण या दृष्टीनें चारापेक्षां अधिक वर्णांचा उल्लेख नाहीं. म्हणून वर्ण चारच असें मन्वादि स्मृतिकार म्हणतात. पंचजन हा शब्द देव, गंधर्व, पितर, मानव व असुर यांच्या पांच पांच विभागांना लावतात. त्यापुढील लोकविभागांना मानुष (सप्तमानुष) असा शब्द लावतात. पंचजात शब्दावरून पंचजन हे येथले मूळचे अग्रस्थ लोक असावेत, बाहेरून आले नाहीत. बाहेरून आले असले तर त्यांच्या अगोदर येथें दुसरी वसती नसावी.

यामीवतालच्या चार दिशांचे चार देश मिळून सर्व जग असा अर्थ घेतां येईल व त्यांतील जन ते पंचजन अशी त्याची व्युत्पत्तिहि सांगतां येईल. 'पांच दिशा' असा उल्लेख वेदांत येतो. या पांच दिशांकडील लोक ते पंचजन या दृष्टीनें पंचजन म्हणजे पृथ्वीवरील सर्व लोक असा अर्थ संभवतो. उ. ऋ. ८.९.२.

यद् अंतरिक्षे यद् दिवि यत्पंच मानुषाँ अनु नृम्णं तद्धत्तं अश्विना ऋ.८.९.२ यांत हाच अर्थ अभिप्रेत आहे. मात्र 'अंतरिक्ष व द्युलोकांतीलहि सर्व लोक' असा अर्थ घेतला पाहिजे. आणखीहि कित्येक ठिकाणीं हा अर्थ इष्ट होईल (चापेकरांचा निबंध व वेदार्थयत्नकारांचें टिपण पाहा.). (२) झिम्मरः आर्य व दास मिश्र. जन किंवा मानुष हा शब्द अनार्यांस लावतां येणार नाहीं (!). सोम पंचजनांचा व पंचजन सरस्वतीवरील (!) अर्थात्, पंचजन हे आर्य आणि त्यांतहि अनु, द्रुह्यु, यदु, तुर्वश आणि पुरु (१. १०८.) हेच पंचजन. ही विचारसरणी व हा अर्थ आम्हांस पटत नाहीं.

पंचजन या शब्दाचे अनेक अर्थ आहेत असें येथवर केलेल्या विवेचनावरून दिसून येईल. (१) पृथ्वी, अंतरिक्ष व द्यु यांतील सर्व लोक किंवा यज्ञिय लोक. (२) पृथ्वीवरील सर्व लोक, किंवा यज्ञिय लोक. (३) सरस्वती व तिला मिळणाऱ्या पांच नद्यांवरील लोक.

(४) देव, गंधर्व–अप्सरस्, पितर असुर आणि मानव, (सर्व यज्ञिय असावे). यांत सर्प, यक्ष, राक्षस, यांचाहि समावेश होतो.

(५) मानवांतले पांच वर्ण. हा अगदीं संकुचित अर्थ.

(६) सायण १.१७६... यांत देव, पितर, मनुष्य आणि पशु व पक्षि म्हणजे दिव्य मानव व तिर्यक् सृष्टि असा अर्थ देतात. पण तो चिंत्य वाटतो.

## कांहीं युरोपियन ग्रंथकारांचीं मतें

(१) एका रंगापासून चार रंगांच्या लोकांची उत्पत्ति भारतकारच वर्णितात असें नाहीं. गौरवर्ण=विनवर्णच होय.

Houston Stewart Chamberlain suggests that primitive man was probably "A variable comparatively *colour*-

*less* aggregate from which the individual types have developed with increasingly distinct individuality.

(२) स्वाभिमानामुळें मनुष्यें-विद्वान् लोकहि-यादाब चुकीचें वळण लावतात.

And to make confusion worse confounded an unfortunate element has been introduced into the discussion, particularly within the past decade, when national glorification of self and culmination of foe induced even scholars of repute to trace the ancestry of their enemies to Beliel and that of their friends to the Indo-European Prototypes of the Pátroons, Pilgrims, Puritans. Germans insist that they belong to the Nordic race and that the Nordic race is the pure Indo-European stock. French, English and American writers claim that the Germans are not Nordics or if they are then not the Nordics but the Alpines are the true Indo-Europeans.

No definite answer to this great question is as yet scientifically justified.

[ The Home of the Indo-Europeans by H. N. Bender, Professor of Indo-Germanic Philosophy in Princeton University, *1922.* ]

(३) भाषेवरून वंशवंशुत्व ठरविणें शास्त्रीय नव्हे.

Linguistic relationship is not in itself sufficient proof of racial relationship. The conquered may adopt the language of the conquerors or the conquerors that of the conquered, or there may be peaceful mingling in irregular proportions of race and language. Max Muller's oft-quoted words (Biographies of Words, p 270) have become almost an article of faith: "To me an ethnologist who speaks of Aryan race, Aryan blood, Aryan eyes and hair is as great a sinner as a linguistic who speaks of a dolichocephalic

long-headed) dictionary or a brachycephalic (short-headed) grammar". When we speak of the Indo-Europeans we mean merely the people, whoever they were, that spoke Indo-European language, and we imply nothing whatever as to race or racial characteristics. As a matter of cold fact and despite many opinions on the subject, we know very little racially about the Ancient Indo-Europeans; we do not even know whether they were one race or a mixture of types. (pp. 10-11 क्लिा.)

[1] The भिल्ल speak an Indo-Aryan language.

[2] The गोंड्स, the खंड्स, the ओरओनस (Oraons) and the jungle-tribes of S. India speak Dravidian languages.

[3] The jungle-tribes of Chota Nagpur and the शबरs and जुआंग of Orissa speak languages of the मुंड family.

(४) Anthropology and Archeology—मानुष्यकशास्त्र व पुराणवस्तुशास्त्र हीं अद्याप वंश ठरविण्यास समर्थ झालीं नाहींत.

Anthropology and archeology may in time throw a revealing light upon the culture and the geographical location of the Indo-Europeans of the Stone Age, although it will always be difficult to determine from the examination of a skull or a stone axe what language their owner spoke in life. If the skulls or the axes of the Indo-Europeans differed in form from those of other Neolithic people we do not know in what way. Here lies the great gulf which comparative philology and her two sister sciences,—a gulf that will not be completely bridged until we can identify the Indo-Europeans racially, ascribe to them definite archeological remains by their Indo-European names (P. 33-क्लिा.)

Some philologists are inclined to hand over to anthropology their main hope for a solution of the Indo-European

these considerations is added the fact that so far not a single human skull has been identified as coming from the Indo-European homeland or as belonging to an Indo-European inhabitant of that land, it will be seen how futile is all discussion of a prehistoric Indo-European 'type'.

It is of course possible that the answer to the problem will yet be dug from the Earth..... Indeed some anthropologists believe that they have discovered close relationship between the neolithic inhabitants of Europe and the Indo-Iranian type of Asia and look in this way to the designation as Indo European of the remains of the prehistoric civilisation of Central Europe.

*This achievement has not yet been* realised but such efforts represent the kind of investigation that keeps alive the *hope* of ultimate success. The philologist still trusts that the anthropologist may provide the Indo-European labels for the finds of the archeologist, *but the probability is very slight* that the racial type of the primitive Indo-Europeans will ever be ascertained. Indeed from a period so remote as to preclude identification, they may have been a conglomerate of various types and *had no racial identity*. (किंता–पा. ४०-४३. इटालिक आमचे ).

## Cycles of Civilisation

"We see a people in some favoured area of the earth's surface slowly build up a great and complex civilisation in corporating essential elements of culture which it has acquired from some older civilisation adding to them and moulding them into harmony with its own genius and

eeds—produced hardly more than savagery or barbarism, while Europe and Asia saw the rise and fall of many civilisations. Mesapotamia, Egypt and Rome that economic actors are of secondary importance. It depends upon he people occupying a country being more capable and when the natural superiority of these people is lost, nothing else will avail to save that people from decay. The anthropological theory that people grew old just as men and animals do is utterly untenable.

Prof. Petric supposes that every cycle—which he thinks of 1800 years' duration—is initiated by the biological blending of two races. It is this blending that gives it a new energy which carries it up the scale of civilisation. This effect is exausted by about 1800 years and the decline inevitably sets in. There may be some truth as regards the initiation (?) but as regards the decline, Petric's theory seems to contain less of truth. We are concerned more with the second part of the problem. Our civilisation may already have reached the climax and may be sliding down even now the curve of decline. We have obtained wonderful command over the physical energies of the world; but if we have not, individually and collectively as nations, the wisdom, the self control to direct these energies conformably to high moral ideas, our tampering with them will but hasten our end. Our knowledge has outrun our wisdom that though we have learnt to exploit the physical energies of the world, we have not the wisdom and the morality effectively to direct them for the good of mankind. As to decline my thesis is that the anthropological theory is the true one, that *the great condition of the decline of any civilization is the inadequacy of the qualities of the people who are bearers of it.*

This inadequacy may *result from the increase of complexity of the environment which accompanies the rise of civilisation which is in fact an inevitable and necessary feature of it;* just because advancing civilisation makes with every step of progress, greater demands upon its bearers. (1) Increasing control of national resources gives men leisure and opportunity to seek relaxation and amusement which are most dangerous (cf. Roman decline). (2) The increase of complexity of personal relations tends also to demand higher qualities from the persons concerned, e. g. the employer and the workmen. (3) *The most important of all the increased intercourse between peoples inevitably weakens when it does not altogether destroy the influence of the custom and moral traditions by which our lives are guided, and the harmony of the society in which and by which he lives is weakened and destroyed.* We are multiplying and improving our educational institutions. But the all-important question is—Is it possible by improved and extended education to adequately prepare the rising generations for the immense responsibilities they must bear? Lastly— Does not progressive civilisation, which makes greater demands on the qualities of its bearers, *does it tend to impair the qualities of the peoples on whom it makes these increasing demands?* History and anthropology give a positive answer to this great question. *Here then is the anthropological theory of the decline of people.*

The physical anthropologists have accumulated a vast mass of data about certain of his (man's) bodily qualities

—the proportion of his skull and other bones, &c. These data are of great value; but they can concern merely his material structure. It is the mental constitution of man, the varying sum of his mental qualities that is alone of direct importance and with which we are concerned. The bodily peculiarities are of importance chiefly in so far as they serve as indicators of mental qualities (?); mental anthropology or (rather) modern psychology is yet in a very rudimentary condition—the scene of most widely divergent views (and false dogma) In this respect debate was carried on in the total absence of the necessary basis of knowledge and naturally the participants almost inevitably were moved by strong desires other than the desire for truth; in *which judgment was distorted by strong prejudices and sentiments.* It raised the question of relative values of human races, the superiority or inferiority of this race to that, &c. The story opens with *the myth of the Aryan race. This 'race' was a phantasy erected by racial prejudice on a basis of the study of languages. Community of language was accepted in the face of all probability as evidence of the community of race* (*of the Aryans—a race which never existed*). Aryans were conceived as the race which had produced all that was most esteemed in the culture of Europe and of Asia; and *from the first the whole question was confused by the search for the lost tribes of Israel*

Most influential writers of the middle of the last century *repudiated the notion of differences of mental constitution* between the races of men. J. S. Mill declared it to be most vulgar to "attribute the diversities of conduct and character to inherent natural differences". At that time the prevailing view was against the assumption of racial

differences. The psychology of the time taught that at birth the human mind is a blank sheet and the brain structureless mass lacking all inherent organisation or tendencies to develop in this way or that; a mere mass of undefined potentialities which through experience, association and habit, through education in short, could be moulded and developed to an unlimited extent and in any manner and *direction. There prevailed at that time* a profound belief in the unlimited powers of education. Humanitarian sentiment—the natural kindliness of the normal man—worked powerfully in favour of this theory of the unlimited power of education. The opposite theory that some men and even whole races of men are born incapable of being educated beyond a very modest level of intellectual and moral achievements was thought to be cold and cruel. "One man is as good as another and a great deal better too, sometimes" (?) was the maxim of the day. This notion still prevails in the popular mind. Yet since the day of Mill *science has done much that saps this theory.* It calls us to recognise the fact *that if Nature has made men of unequal value,* the cruelty is hers, not ours, *and that we do no wrong in ascertaining and recording the facts.*

"That all men are created equal" (Declaration of Independence, U. S. A.) may mean that "all men are equal in respect of their claims for justice, for humane treatment and the kindly feeling of their fellows, for opportunities to make the best of their powers of service and of happiness". Not that all are born with equal capacities for intellectual and moral development.

The Indo-Aryan Races ( Ed.1916, Part I ) by Ram Prasad Chand, B. A. ( Hon. Secy. Varendra Research Society. )

Physical characteristics and particularly the head-index do not find recognition in certain quarters as tests of physical relationship. Mr. S. Malley writes: "Of late years, another pometry as a test of race has begun to fall out of favour. Prof. Ridgeway considers that *physical type depends far more on environment than on race.* From the evidence already to hand there is high probability that *intermarriage can do little to form a new race.* Unless the parents on both sides are of race evolved in similar environments elsewhere, he points out that, "as the physical anthropologists cannot agree upon any principles of skull measurements, the historical enquirer must not at present base any argument on this class of evidence." Another writer ( Prof. H. Omershaur Cox ) remarks :— " Neither cephalic nor nasal index is of much use in determining race. The truth is, the method on ( ? of ) indices has been *thoroughly discredited among anthropologists and* were it not employed in the 'People of India', a book published in 1908, we should have supposed it had no longer any followers...." His ( Prof. Ridgeway's ) views appear to be conformed by the recent discoveries of Walcher who has drawn attention to the changes which can be made in the shape of the skull of a newly born infant by inducing to lie constantly on the side or on the back according as it is desired to make the head long or short." (P. 62)

"The contribution to the study of environment provided by Dr. Boas in his report on the immigrants into the U. S. deserves special attention here. Two striking announcements are made in that report. In the first

place it is claimed that in regard to head-form the off-springs of immigrants *stand in distinct and even marked contrast to their parents*. Again the data are said to show that a change in every case takes place in the direction of convergence towards a common form or type *so that whether the parents themselves be of long-headed* or of the bullet-headed type these characteristics are not transmitted. *The offsping tends towards an intermediate form.* Environment is made prominent in the speculations as to the influence determining these results. The latter are extraordinary for two reasons. First on account of the acting force and again for the rapidity with which it acts...... it is clear that further support is needed before anything like complete recognition can be accorded to the conclusions."

Prof. Arther Keith has given a luminous summary in his *Presidential Address delivered to the Royal Anthropological Institute of Great Britain and Ireland* (26-1-1915). It furnishes unerring testimony of the value of head-form as a test of race. This history covers a period of 4000 to 5000 years and is thus put in a nut-shell.

In the first place, we have clear proof that at one time —some 4000 or 5000 years ago—the round-headed stock did break through and reached the western shores of Europe. It leavened England, but became submerged; it met a similar fate in Western Germany and in Holland. In the early centuries of the present era the long-heads in N. W. Europe must have undergone a recrudescence in numbers and in power. They broke eastwards in the plains of the Vistula and the Danube; *they imposed their speech on the conquered people, but the vanquished imposed on them their features of face, head and body.* *They broke*

social ( not racial however ) grades within the pale—the ऋषि or priest poet clan such as the अथर्वण्s, अंगिरस्s, भृगुs, ( जमदग्नीs ) अत्रिs, वसिष्ठs, कण्वs and. विश्वामित्रs ( कुशिकs ) and the other class included the warrior-tribes such as यदुs, तुर्वसs, पुरुs, अनुs, द्रुह्युs, तृत्सुs, भरत's, सृंजयs, रुशमs, मत्स्यs, चेदीs, कृवीs, and others. These two social grades did not form endogomous castes as yet (?); nor were the ऋषि-class collectively known as ब्राह्मणs and the warrior-tribes a क्षत्रियs. But the former constituted a regular social order with a hereditary calling—that of officiating as sacrificial priests and hymn-making though they did not eschew other occupations.

### The Origin of the Aryans by Issac Taylor, M. A., LL. D. (1892)

Comparative philology as a science dates from the publication of Bopp's Comparative Grammar in 1835. But this great achievement was not without its nemesis. When Bopp had demonstrated that the greater number of languages of Europe and some languages of Asia must be referred to a common ancestral speech there was a *tendency to assume* as a matter of course that the speakers of these languages were also themselves descended from common ancestors. From a primitive unity of speech *scholars hastily inferred a primitive unity of race.*

Prof. Max Muller owing to the charm of his style, to his unrivalled power of popular exposition and to his high authority as a Sanskrit scholar has done more than any other writer to popularise this erroneous notion among ourselves. In his lectures on the Science of Language in 1861 he speaks of "an Aryan race", "an Aryan family" and asserts that there was a time "when the first ancestors of the Indians, the Persians, the Greeks, the Slaves,

e Celts and the Germans were living together within the me enclosers, nay, under the same roof" and he argues at because the same forms of speech are "preserved by l the members of the Aryan family, it follows that be- re the ancestors of the Indians and Persians started for e South and the leaders of the Greek, Roman, Celtic eutonic and Slavonic colonies marched towards the ores of Europe, there was a small clan of Aryans, settled robably on the highest elevation of Central Asia, speak- g a language not yet Sanskrit or Greek or German but ntaining the dialectical germs of all."

*Than this picturesque paragraph more mischievous words have seldom been uttered by a great scholar......*

It cannot be insisted upon too strongly that identity of peech does not imply identity of race any more than iversity of race (examples follow).

The old assumption of the philologists that the relation- hip of language implies a relationship of race has been ecisively disproved and rejected by anthropologists.

Such rash assertions are calculated to discredit and have iscredited the whole science of comparative philology.

Broca observes that "races have frequently within the istoric period changed their language without having pparently changed the race of the type ... The ethno- ogical value of comparative philology is extremely small. ndeed it is apt to be misleading rather than otherwise.

Topinard remarks that it has been proved that the nthropological types in Europe have been continuous and f the Aryans came from Asia they can have brought with hem nothing but their language, their civilisation, and a knowledge of metals. *Their blood has disappeared.* In France we are Aryans only by speech. By race we are mainly Cymrys in the north and Celts in Central region.'

# चातुर्वर्ण्य, असवर्णविवाह आणि संततिनियमन

## समाजाची एक पाश्चात्य नवीन योजना

चातुर्वर्ण्य आणि समलोमविवाह व वर्णसंकर ( अनुलोम आणि प्रतिलोमविवाहनिषेध ) यांचा संबंध मूळ निबंधांत आलाच आहे. पुढेंहि 'स्त्रीषु दुष्टासु वार्ष्णेय जायते वर्णसंकरः' या सदराखालीं थोडे विचार प्रदर्शित केले आहेत. या भागांत सुप्रजाजननशास्त्र व संततिनियमन यांचा या चातुर्वर्ण्याशीं काय संबंध आहे तो दाखवावयाचा आहे.

चातुर्वर्ण्याचा हेतु 'गुणप्रकृष्टता' उत्पन्न करणें हा होय. हा हेतु समलोमविवाहानें साध्य होतो. आनुवंशिकतेंत त्याची गुरुकिल्ली आहे. उलट मिश्रविवाहांत त्याचा नाश होतो. मिश्रविवाहानें 'Character'—शील—आणि तेजस्वीपणा नाहींसा होऊन मवाळ स्वभाव बनतो. 'मुकीं बिचारीं कुणीहि हाका, अशीं मेंढरें बनूं नका' असें गॉगफेलोच्या काव्याचें भाषांतर करण्यांत येतें. हिंदुस्थानांत अशी प्रजा उत्पन्न झालेली आहे, असें समजून हें भाषांतर शाळेंतील मुलांना आदर्श म्हणून त्यांजपुढें ठेवण्यांत आलें ! वास्तविक हिंदु प्रजा जी भेंगी बनली आहे त्याचें कारण गेल्या दोंदोनशें किंवा कित्येक ठिकाणीं गेल्या एक हजार वर्षांतलें दास्य किंवा परराज्य होय. ५०।६० वर्षांपूर्वी कुटुंबांतले पुरुष किती करारी असत याची प्रत्येकानें चवकशी करावी. करारीपणा हा त्या आनुवंशिक तेजाचा आणि स्वतःच्या कर्तबगारीचा द्योतक असतो. इंग्रजी राज्यांत कर्तबगारीचा पारा—इंग्रजाला नको असेल तेथें—जसजसा शून्यतेवर येऊं लागला, तसतसा करारीपणा मोडला आणि तेज लोपून गेलें. हें तेज अद्याप जिवंत आहे. ही गोष्ट गतवर्षीच्या निःशस्त्र सत्याग्रह अहमहमिकेनें जीं लाखों माणसें पुढें आलीं त्यांत दिसून आलें. तीनशें वर्षांपूर्वी मावळ्यांनीं स्वराज्य संपादन केलें तें त्यांच्यांत आनुवंशिक सुप्त किंवा मुक्त तेज होतें म्हणूनच. पारतंत्र्यांत सिलवट पडल्यानें हें तेज व हा करारीपणा लुप्त किंवा सुप्त होतो;

तो नष्ट होत नाहीं. ज्याला 'भूत इतिहास' नाहीं त्याला 'भविष्य पराक्रम' नाहीं हें सुभवाक्य लक्षांत ठेवलें पाहिजे. त्यांत आनुवंशिक संस्कारांचें बीज सांठविलेलें नाहीं काय? नेल्सननें ग्रीक आणि रोमन राष्ट्रांचा नाश मिश्रविवाहानें कसा झाला हें दाखविलें आहे. त्यांत तो स्पष्ट सांगतो:
Under the shelter of Roman administration *they* (*the isolated types*) *mingled* and the result was unlimited hybridizing of types destroying the many fixed types which had existed and *giving rise to instability of disposition and culture*. This blending of many races is regarded as the most destructive agency in the downfall of Rome.
सारांश, मिश्रविवाह अतीव त्याज्य होय.

आतां दुसऱ्या मुद्याकडे वळूं. जाति बनविणें म्हणजे विशिष्ट गुणयुक्त अशा व्यक्तींचा संघ किंवा वर्ण बनवून त्यांचेमध्यें अंतर्गतविवाह सुरू करणें. त्यांतहि अतीव अंतर्गत किंवा सगोत्र विवाह तसेंच जातिबाह्य विवाह त्याज्य ठरवावयाचे. अशा विवाहानें गुणश्रेष्ठता चढत्या माजणीप्रमाणें वाढत जाते. उलट मिश्रविवाहानें उतरत्या माजणीप्रमाणें गुणकनिष्ठता उत्पन्न होते. विशिष्ट गुणवत्तेचें प्रमाण एकंदरींत नेहेमीं कमी असतें. त्यामुळें दुसरा एक हेतु नजरेसमोर नेहमीं ठेवणें जरूर असतें; तो म्हणजे 'सुप्रजा.' सुप्रजा म्हणजे गुणविशिष्ट प्रजेची वहुलता. मनुष्यानें सु (गुणयुक्त) प्रजा उत्पन्न करण्याचा प्रयत्न केला पाहिजे. एवढेंच नव्हे, तर ती संख्येनें बहु झाली पाहिजे. नाहीं तर गुणहीन प्रजेचा पगडा बसूनहि गुणयुक्त प्रजाच नष्ट होईल. म्हणून वैदिक ऋषि

आ नः प्रजां जनयतु प्रजापतिः । अजरसाय समनक्त्वर्यमा ॥

१०.४५.४३

वीरसूः देवकामा स्योना शंनो भव ।
द्विपदे शं चतुष्पदे ॥ ४४
इमां त्वां इन्द्र मीढ्वः सुपुत्रां सुभगां कृणु ।

दशास्यां पुत्रान् आधेहि, पतिमेकादशं कुरु ॥ १०८५.४५

' ही मुलगी प्रजा उत्पन्न करो, ती वीरसू व देवकामा होवो, ही दहा पुत्र धारण करो ' अशी प्रार्थना करतात. ही प्रार्थना त्या काळीं लोकसंख्या कमी असून सुप्रजा असेल म्हणून केली असें समजणें चुकीचें आहे. सुबुद्ध, सशक्त, सगुण, देवकाम प्रजा नेहेमींच थोडी असते. गुणहीन प्रजा पुष्कळ उत्पन्न होत असते. म्हणून अशी सुप्रजा वाढविणें हें आपलें कर्तव्य ठरतें. देवऋण, ऋषिऋण आणि पितृऋण अशीं तीन ऋणें घेऊन मनुष्य जन्मास येत असतो असें शास्त्रकार म्हणतात. याचा अर्थ असा कीं, देवकाम, गुणयुक्त संतति पाहिजे; आणि तीहि बहु पाहिजे. या दृष्टीनें विचार केला म्हणजे संततिनियमन करणें हें घोर पाप ठरतें. गुणवानानें संततिनियमन करण्यापासून जगाचा फायदा काय होणार असेल तो होवो, पण निदान हिंदुस्थानचें खास अहित होणार आहे आणि इंग्रजांचें हित होणार आहे. ज्या माल्थसच्या नियमावरून संततिनियमनाची कल्पना खरी वाटते, तो नियम चुकीचा आहे, हें आतां सिद्ध झालें आहे. ( ' हेरिडिटि अँड् युजिनिक्स् ' या ग्रंथांतील उतारा पाहा. ) शिवाय संततिनियमनाचे परिणाम कसे अहितकारक आहेत, तेंहि त्या ग्रंथकारानें दाखविलें आहे. सगोत्र विवाह कुटुंबीय दोष वाढवितात म्हणून तेहि नसावेत, असें त्या ग्रंथकारानें सांगितलें आहे. मिश्रविवाहानें ' जाति ' ( *type* ) नाहींशी होते आणि एकदां नष्ट झालेली जाति फिरून उत्पन्न होत नाहीं, असेंहि त्यानें दाखविलें आहे. अर्जुन तरी हेंच म्हणतो.

दोषैरेतैः कुलघ्नानां वर्णसंकरकारकैः ।
उत्साद्यन्ते जातिधर्माः कुलधर्माश्च शाश्वताः ॥ म. गीता–१.४३

वर्णसंकरानें शाश्वत कुलधर्म व जातिधर्म नष्ट होतात. कुलांत, जातींत शाश्वत धर्म असतात अशी त्याची समजूत व ते एकदां गेले म्हणजे कायमचे जातात, म्हणून अर्जुन येथें हळहळत आहे. आणि नेल्सन तरी हेंच म्हणतो कीं, Once a particular stock having exceptional qualities is lost it is very questionable whether it can ever be replaced. हीच गोष्ट बहु घोडे आणि उत्तम बैल ठेवून आम्ही करतों.

